राष्ट्रीय चरित्र माला

# व. वे. सु. अय्यर

रा. अ. पद्मनाभन

अनुवाद

अ. के. भागवत



नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया

# उपोद्घात

विसाव्या शतकातील पहिल्या दोन दशकात तमिळनाडूचे सर्वांगीण पुनरूत्थान करण्यात तीन बुध्दिमान तमिळ पुत्रांचा महत्त्वपूर्ण सहभाग आहे. कवी सुब्रम्हण्य भारती, विद्वान आणि महान क्रांतिकारी व. वे. सु. अय्यर आणि स्वदेशी आगबोटीचे प्रवर्तक व.उ. चिदंबरम् पिळ्ळै.

हे तिघेही सर्वस्वाचा त्याग केलेले देशभक्त होते. आपल्या क्षेत्रात तनमनधनाने भारतमातेच्या मुक्ततेचा प्रयत्न करीत होते.

तिघांच्याही हृदयात तमिळ भाषा, तमिळ संस्कृती आणि तमिळ लोक यांच्याविषयी उदंड प्रेम होते. तमिळी लोकांचा स्वाभिमान विकसित व्हावा म्हणून तिघांनीही पराकाष्ठेचे प्रयत्न केले.

१९७२ साली स्वतंत्र भारताने व.उ.चिदंबरम् पिळ्ळै यांची जन्मशताब्दी साजरी केली. व.वे.सु.अय्यर आणि भारती यांची जन्मशताब्दी अनुक्रमे १९८१ व १९८२ साली आहे.

सुब्रम्हण भारती आणि व.उ.चिदंबरम् पिळ्ळै यांचे नावे आधुनिक भारताला परिचयाची परंतु व.वे.सु. अय्यर यांच परिचय फारसा झालेला नाही.

अय्यर हे वकील होते. बॅरिस्टर होण्यासाठी इंग्लंडला गेले आणि क्रांतिकारी होऊन परत आले. १९०७ ते १९१० या दरम्यान लंडन येथील इंडिया हाऊसमध्ये वि.दा.सावरकर यांचे उजवे हात होते. लंडनमध्ये त्यांची बॅरिस्टर मो.क. गांधी यांच्याशी ओळख झाली. त्यांना क्रांतिकारी बनवण्याचा अय्यर यांनी प्रयत्न केला. १९१५ साली पॉंडिचरी येथे अय्यर यांची महात्मा गांधी यांच्याशी पुन्हा भेट झाली. या बैठकीत महात्माजींनी अय्यर यांचे मत परिवर्तन केले. तेव्हापासून अय्यर एक आदर्श गांधीवादी झाले.

अय्यर यांनी तमिळ व इंग्रजीत बरीच ग्रंथरचना केली. विद्वान म्हणून त्यांची कीर्ती झाली. तमिळमधील आधुनिक लघुकथेचे ते जनक आहेत. वाङमय समीक्षेचाही त्यांनी पाया घातला.

# अनुक्रमणिका

# वराहनेरी

तिरुची हे चित्ताकर्षक शहर आजच्या दक्षिण भारतातील तमिळनाडू राज्याच्या मध्यभागी आहे. तिरुचि, त्रिची, त्रिचिनापोली आणि तिरुचनापल्ली अशा विविध नावांनी ते ओळखले जात असून तमिळनाडूमधील सर्वात महत्त्वाच्या शहरापैकी एक आहे. ही पुरातन तमिळ प्रदेशातील चोल राजाची राजधानी होती. करिकल चोल (इ.स. १९० सुमारे) संगम युगातील चोल राजापैकी सर्वात विख्यात राजा हा सध्याच्या शहराच्या पश्चिमेकडील असलेल्या वरियर भागातून आपल्या साम्राज्यावर अधिपत्य गाजवीत होता. त्यावेळच्या अनेक काव्यातून त्याच्या पराक्रमाचे वर्णन आढळते. 'पट्टिनाप्पलाई' या दीर्घ काव्यात तो तुरुंगातून युक्तीने कसा सुटला आणि त्याने चोल राज्यावर स्वतःची पुनर्स्थापना कशी केली याचे चित्रण केले आहे. तंजावरजवळ वेण्णी येथे त्याने एक मोठी लढाई जिंकली. तर दुसरी तंजावरजवळ वहाई- परांदलाई येथे. अशातऱ्हेने आपल्या युध्दाने दक्षिणेच्या अभिषिक्त राज्यामध्ये त्याने महत्त्वाचे स्थान मिळविले. त्याच्या विविध पराक्रमाचे वर्णन प्राचीन काव्यामध्ये आढळते. 'शिलप्पधिकारम्' हे त्यापैकी एक आहे. कावेरीपट्टनम् हे बंदर त्यावेळी समुद्रव्यापारामुळे भरभराटीला आलेले होते. उद्योग आणि व्यापार ह्यामुळे कारिकलच्या संपन्नेत भर पडत होती. राजाने जंगल हटवून जमीन मिळविली आणि कावेरी नदीवर बांध बांधून आणि कल्लानाई नदीवर मानवी इतिहासातील सर्व प्रथम असे प्रचंड दगडविटांचे धरण बांधलेले प्रकल्प आजही आस्तित्वात आहे. ह्याच्या पूर्वीच्या अविचलित पायावरच इंग्रजांनी गेल्या शतकात स्थापत्य शास्त्रज्ञांकडून 'ग्रँडॲनिकट' ह्या नावाने ओळखले जाणारे धरण बांधविले.

तिरुचीच्या देखाव्यामध्ये रॉकफोर्ट ही अविस्मरणीय कणाश्म (ग्रॅनिट) खडकांची राशी प्रामुख्याने दिसते. २७३ फूट (२४८ मीटर) उंचीवर आहे. रॉकफोर्ट शहराच्या मध्यावर असून भोवतालच्या कित्येक मैलांवरून दिसणारे ते एक प्रमुख सीमाचिन्ह आहे. हा उघडा

बोडका खडक आकाराने एखाद्या सरड्यासारखा असून पश्चिमेकडे तोंड करून पसरला आहे. त्याच्या अर्ध्या भागाजवळ तो श्रीमातृभूतेश्वराच्या किल्लेवजा मंदिराने सुशोभित झाला आहे. वरून आच्छादित असलेल्या पायऱ्यांवरून आपल्याला देवळापर्यंत आणि अनाच्छादित पायऱ्यांवरून पल्लवगुहेकडे आणि उच्छी पिल्लायर कोयल ह्या खडकाच्या टोकावर बसलेल्या लहानशा गणपती मंदिराकडे जाता येते.

उच्छी पिलायर कोयलवरून आपल्याला खाली खूप विस्तारलेल्या शहराचे विहंगम दृश्य आणि भोवतालच्या प्रदेशाचा प्रेक्षणीय देखावा दिसतो. उत्तरेच्या बाजूस, मैलाच्या अंतरावर राजैश्वर्ययुक्त कावेरी नदी शांतपणे वाहते. ही नदी चोल प्रदेशाची जीवन आणि ऐश्वर्यदात्री असून तिरुचीजवळ तिचा विस्तार सर्वात अधिक आहेत. नदीच्या दीप्तीमय जलाशयापलिकडे उत्तरेच्या बाजूस डोळ्याला एक अल्हादायक उत्तुंग वृक्षांचा हिरावागार पडदा पलीकडच्या सर्व किनाराभर दिसतो. या हरित विस्तारापलीकडे श्रीरंगमूचे बेट, तेथील विख्यात देवालय आणि यात्रेचे ठिकाणे आहे.

गर्द, अतिमधुर आंब्याची राई आणि मधूनच डुलणाऱ्या नारळाच्या झावळ्यातून श्रीरंगम् आणि तिरुवनाई / कोयल मंदिरांची उंच उंच गोपुरे आपली मस्तके सर्व वैभवासह दाखविताना दृष्टीस पडतात. भारतातील सर्वात पुरातन आणि मोठे श्रीरंगम् मंदिर आपल्या सात तटांच्या भिंतीत संबंध श्रीरंगम् शहरास सामावून घेते. खडकाच्या माथ्यावरून पाहिले तर बस आणि लॉऱ्या, मोटारी आणि बैलगाड्या कावेरी नदीच्या पूलावरील रस्त्यावरून जाताना हालत्या खेळण्यासारख्या दिसतात. तर जवळच असलेला लोहमार्गावरील पूल अजस्त्र, सहस्रपादांची आठवण  श्रीरंगमच्या पलीकडील कावेरी नदीची कोल्लाडम्  (कौलेवरून) ही मानवनिर्मित शाखा वाहत असून ती कावेरीला पुन्हा पुढे प्रवाहाच्या दिशेस मिळते. अशा तऱ्हेने श्रीरंगमूचे बेट तयार होते.

पूर्वेच्या बाजूस मशागत केलेली अनंत शेते, भातखाचरे, केळ्यांच्या बागा आणि इतर अन्नधान्य, पिके नजरेस पडतात.

दक्षिणेकडे वळल्यास आपल्याला अगदीच विरोधात्मक असे दृश्य दिसते- तिरुची शहरातील लांबच लांब आणि वळणावळणाचा बाजारातून जाणारा रस्ता मैलच्या मैल जाताना दिसतो आणि सरते शेवटी तिरुचीप्रस्थानक या शहराच्या मुख्य लोहमार्गावरील स्थानकाकडे जातो. प्रस्थानकाकडे जात असता दाटीदाटीने बांधलेली घरे आणि चिंचोळे रस्ते, लोकवस्तीचे भाग दर्शवितात. जर पुढे दक्षिणेस रीजनल इंजिनीयरिंग कॉलेज, भारत हेवी इलेक्ट्रिकल्स आणि स्मॉल आर्मस् फॅक्टरीसारखे कित्येक आधुनिक प्रकल्प दृष्टीस पडतात. प्रस्थानकाच्या जवळील गोल्डन रॉकची विस्तीर्ण लोहमार्गीय कर्मशाळा ही एक जुनी प्रस्थापना असून तिने उत्पादनाबद्दल मिळविलेली कीर्ती हेवा वाटण्यासारखी

आहे.

खडकाच्या पश्चिमेच्या बाजूस आपल्याला काही ऐतिहासिक स्थळे दिसतात. खडकाला अगदी लागून टेप्पाकुलम् ह्या नावाने ओळखला जाणारा मंदिराचा विख्यात तलाव आहे. तलावाच्या पूर्वकिनाऱ्यावर क्लाइव्ज होस्टेल नावाची साम्राज्याचा शिल्पकार रॉबर्ट क्लाइव्ह याचे साहचर्य सांगणारी इमारत आहे. तरुणपणी क्लाइव्ह ह्या वास्तूत राहात असे. तलावाच्या पश्चिमेस तिरुची किल्ल्याचा प्रमुख संरक्षण दरवाजा आहे. त्याच्या भिंती आजही दिसतात. दि वेस्टर्न बुलवार्द हा तिरुचीचा मुख्य रहदारी रस्ता तिरुचीचे फ्रेंचांशी असलेले साहचर्य दाखवितो. तिरुची काही काळ फ्रेंचांच्या ताब्यात होती. पहाऱ्याच्या मुख्य दरवाजाजवळ सां लुईच्या रोमन कॅथलिक प्रार्थनामंदिराचे उंच शिखर दिसते. हे प्रार्थनामंदिर दक्षिण फ्रान्समधील सालुर्दच्या प्रार्थना मंदिराची (बॅसिलिका) छोटेखानी नक्कल आहे. सेंट जोसेफ्स कॉलेज ह्या दक्षिणेतील आद्य शिक्षणसंस्थेचे विस्तीर्ण आवार प्रार्थना मंदिराच्या शेजारी आहे.

तिरुचीच्या चोल अंमलाचा शेवट मुस्लिम आक्रमकांनी १४ व्या शतकात केला. नंतर मदुराईच्या नायक शासकांनी वर्चस्व गाजवले आणि काही दशकांपर्यंत तिरुची ही त्यांची राजधानी होती. मराठा युध्दात आणि इंग्रज फ्रेंच युध्दांमध्ये तिरुचीने मोठी कामगिरी बजावली. तसेच क्लाइव्हचे ते पुष्कळ दिवस प्रमुख स्थान होते. कर्नाटक युध्दांत शहराचे स्वामित्व अनेकदा नबाब, इंग्रज आणि फ्रेंच यांच्यामध्ये हस्तांतरित झाले- आर्काटच्या नबाबाचा राजवाडा आता टाऊन हॉल आणि तालुका कचेरी म्हणून वापरला जातो. एक प्रतिस्पर्धी नबाब चंदासाहेब ह्याचे शिरविहित शरीर शहरातील नादिरशहा मशिदीत पुरलेले आहे.

तिरुचीमध्ये गंगाईकोंडा, चोलापुरम् ह्यासारखी अनेक ऐतिहासिक स्थळे आहेत. चोलापुरमूही ११ व्या शतकापासून तीन शतके चोलांची राजधानी होती. पुरावस्तुशास्त्रज्ञांनी करूर येथे उकरून काढलेली रोमन नाणी इसवी सनाच्या आरंभीच्या शतकात शहराच्या रोमशी व्यापारी संबंध होता असे दर्शवितात.

औद्योगिक प्रगती असलेला कोईम्बतूर जिल्हा आणि प्रामुख्याने कृषिप्रधान असा तंजावर जिल्हा यामध्ये वसलेले तिरुची शहर उद्योग व शेती या दोन्ही बाबतीत सारखेच प्रसिध्द आहे त्याचप्रमाणे पल्लव, नायक, मुस्लमान, इंग्रज, फ्रेच आणि मराठे यांच्या अंमलाखाली आल्यामुळे तिरुचीचा दृष्टिकोन सर्वदेशीय झाला आहे. तिरुची शहर आधुनिक व प्रगतीपथावर असले तरी त्याचे पुरातन अनुबंध आजही नष्ट झालेले नाही.

ह्या चरित्राचे नायक वराहनेरी व्यंकटेश सुब्रह्मण्यम् अय्यर ह्यांची जन्मभूमी ही अशी आहे.

गेल्या शतकात एक लहानसे खेडे असलेले वराहनेरी आता तिरुची शहराचा एक अभिन्न भाग बनले आहे ते गांधीमार्केट या शहराच्या सर्वात मोठ्या भाजी मंडईजवळ वसले

आहे. वराहनेरी येथे व्यापाऱ्यांची एक समृध्द वस्ती असून अग्रहारम् स्ट्रीटवर ब्राह्मणांची छोटी वस्ती आहे. या रस्त्यावरील व.वे. सु. अय्यर यांचे पिढीजाद घर अद्याप त्यांच्या कुटुंबाच्या एका शाखेकडे आहे.

व. वे. सु. ह्यांचे वडील वराहनेरी व्यंकेटश अय्यर ह्यांचा जन्म तिरुचीच्या एका मध्यमवर्गीय कुटुंबात झाला. गेल्या शतकात इंग्रजी शिक्षण लोकप्रिय झाल्यामुळे व्यंकटेश अय्यर यांनी फारसे शालेय शिक्षण झालेले नसतानाही इंग्रजीचे ज्ञान मिळविले. नंतर ते आणि त्यांचे बंधू एफ. ए. ( फर्स्ट इयर इन आर्टस्) ची परीक्षा उत्तीर्ण झाले आणि यांचा सबंध इलाख्यामध्ये पहिल्या क्रमांक आला - त्यामुळे दोघांचीही सरकारी नोकरीसाठी निवड करण्यात आली आणि त्यांना पोस्ट खात्यात नोकरी देण्यात आली. व्यंकटेश अय्यर यांना दूरच्या रामनाथ पुरम् या गावी महिना पाच रूपये पगारावर पोस्टमास्तर म्हणून नोकरी मिळाली. काही काळानंतर त्यांनी आपल्या नोकरीचा राजीनामा दिला आणि ते तिरुची शहराच्या दुसऱ्या एका भागात राहून आपला बँकेचा व्यवसाय करू लागले. या व्यवसायाची भरभराट झाली आणि ते वराहनेरी येथे आले.

व्यंकटेश अय्यर हे शहरी पध्दतीत मुरलेले, ख्याली खुशालीत काळ कंठणारे आणि व्यापारी वर्तुळात अत्यंत वजनदार असे ग्रहस्थ होते. त्यांचा स्वतःचा 'त्रिचिनापली वार्थगसंगम मर्यादित' ह्या नावाचा व्यापारी प्रकल्प होता. ही एक सहकारी खरेदी विक्री मंडळी होती आणि तिचा धंदा जोरात होता. १८९३ पासून १९१३ पर्यंत व्यंकटेश अय्यर संगमचे संचालक होते आणि त्यांनी लेखापरीक्षा व लेखाशास्त्रात (ऑडिट आणि अकौंटस्) विशेष प्राविण्य मिळविले होते.

आपल्या उत्तर आयुष्यात व्यंकटेश अय्यर यांनी ख्रिस्ती धर्मउपदेशकाचा विषारी प्रचार आणि अनेक हिंदूंना धर्मांतर करायला लावण्याचा त्यांचा यत्न याकडे बरेच लक्ष दिले. ह्या लोकांचे पुनर्धर्मांतर करून त्यांना हिंदू समाजामध्ये आणण्यासाठी ते दारोदार फिरत. कांचीकामकोटीपीठम् च्या शंकाराचार्यांकडे त्यांनी ह्या लोकांचे शुध्दिकरण करण्यासाठी अनुमती सुध्दा विचारली. परंतु आचार्य अशी मान्यता देईनात. व्यंकटेश अय्यर निराश झाले. तरीपण त्यांनी आपले प्रयत्न आपल्या वाणीने व लेखनीने चालूच ठेवले.

व्यंकटेश अय्यर यांचा विवाह करूर जवळील चिन्नापामपट्टी या खेड्यातील कामाक्षी अम्मल ह्यांच्याशी झाला. २ एप्रिल १८८१ रोजी त्यांच्या पत्नीने पहिल्या मुलाला जन्म दिला. या मुलाचे नाव सुब्रह्मण्यम असे ठेवण्यात आले. तमिळी पंचागाप्रमाणे मुलाचा जन्म विक्रम संवत् २२ फाल्गुन या तिथीस झाला. त्याचे जन्मनक्षत्र कृत्तिका हे होते. कृत्तिका म्हणजे भगवान सुब्रह्मण्यम यांचेच नक्षत्र. मुलाला घरी मणी म्हणत असत. सुब्रह्मणम या नावाचे सर्वमान्य लघुरूप होते.

मुलाला लहान असताना हिंदू जीवन पध्दती शिकविली पाहिजे, असा व्यंकटेश अय्यर यांचा दृढ विश्वास असल्यामुळे ते शेजारपाजारची बरीचशी मुले- मुली जमवीत आणि

सणाच्या दिवशी त्यांना श्रीरंग आणि तिरुवणाई कोयल मंदिराकडे नेत. वाटेत ते त्यांना हिंदू महाकाव्य व पुराणे यातील कथा सांगत आणि अशा तऱ्हेने चार मैलाचा कंटाळवाणा प्रवास विसरायला लावीत. त्यांच्याजवळ खूपसे उकडलेले वाटाणे असत आणि मुलांची भूक जावी म्हणून त्यांना ते वाटीत असत. इतर मुलांप्रमाणे पुरेसे मोठे झाल्यावर सुब्रम्हण्यम सुध्दा या सहलीत भाग घेऊ लागले. वडिलांनी सांगितलेल्या हिंदुवीरांच्या पराक्रमाच्या कथांनी या लहान मुलाच्या वीरवृत्तीला प्रेरणा मिळाली. याबरोबरच महाकाव्यातील काही दृश्ये त्याने नाट्यरूपाने सादर केली आणि स्वतः हाताने केलेले धनुष्यबाण हाती घेऊन राम किंवा अर्जुन यांच्या भूमिका वठविल्या.

सुब्रम्हण्यमने शारीरिक व्यायामाकडे खूप लक्ष पुरविले आणि भस्की आणि दंडाल ह्यांचे व्यायाम केले. तसेच कर्लाकट्टाई म्हणजे भारतीय भाला फिरविला. अनेक खेळांची त्यांना आवड होती आणि ते पोहण्यातही निष्णात होते. ते राहात असत त्या रस्त्याच्या कडेला असलेल्या कालव्यामध्ये उड्या मारण्याची व डुंबण्याची त्यांना खूप संधी मिळाली. ते धीट होते आणि लवकरच आपल्या कंपूचे नेतृत्त्व त्यांच्याकडे आले.

बाल्यावस्थेतच त्यांच्या धाडसाची परीक्षा करणारी एक वेळ आली. आधी उल्लेख केलेल्या कालव्यापलीकडे एक कालीमंदिर होते. ते अजूनही आहे. ते झुडपांनी वेढलेले असून एकांतस्थळी आहे. सूर्यास्तानंतर तेथे साप आणि कोल्हे चिक्कार भटकत असत. या देवळापर्यंत मध्यरात्री जाण्याचे आव्हान सुब्रम्हण्यमूना कोणीतरी दिले. ह्या वेळी काळ्याकुट्ट अंधारात भुते आणि घुळी संचार करीत. आपले साहस पूर्ण केल्याची खूण म्हणून त्यांना देवळाच्या दारी असलेले कुंकू आणि देवळासमोरील बळीपीठम् आणण्यास सांगितले होते. सुब्रम्हण्यम्नी आव्हान स्वीकारले आणि देवळापर्यंत न अडखळता जाऊन त्यांनी सिध्दीची प्रमाणे घेऊन ते परत आले.

१८९५ मध्ये सुब्रम्हण्यम् मॅट्रिक्युलेशनची परीक्षा उत्तीर्ण झाले आणि त्यांचा इलाख्यामध्ये ५ वा क्रमांक आला. सेंट जोसेफस् कॉलेजमध्ये दाखल होऊन त्यांनी बी.ए. ची पदवी १८९९ मध्ये सन्मानासह मिळवली. त्यांचे विषय इतिहास, अर्थशास्त्र व लॅटिन हे होते. लॅटिनमध्ये ते सर्वप्रथम आले. त्यांना महाविद्यालयाची शिष्यवृत्ती मिळाली. खूपशी बक्षिसे मिळाली आणि वर्गमित्रांना त्यांचा हेवा वाटू लागला. प्राध्यापकांचे ते आवडते विद्यार्थी असत आणि महाविद्यालयातील 'स्वतंत्र विचार समिती' (फ्री थिंकर्स सोसायटी) च्या चर्चातून ते इतकी सहनशीलता दाखवीत की त्याचीच सर्वांना चीड येई. सर्व प्रतिटीका केवळ स्मिताने परतविण्याची त्यांची हातोटी होती.

वाङ्मयामध्येही त्यांचा अभिरुची खूप विशाल असे. व्हर्जिल, होमर, शेक्सपियर, कंबन आणि कालिदास, स्पेनर, हक्स्ले, शोपेन हॉवर आणि इमर्सन ह्यांच्या वाङ्मयामध्ये त्यांची गती होती आणि त्याच्याकडे त्यांचा विशेष कल असे. इमर्सनबद्दल त्यांना खास जिव्हाळा वाटे. इमर्सनच्या 'सेल्फ हेल्प' (स्वावलंबन) ह्या निबंधामध्ये सर्वकालीन श्रेष्ठता

आहे असे ते मानीत. उत्तर आयुष्यात ह्या निबंधाचे त्यांनी तमिळमध्ये भाषांतर केले.

बुध्दिबळे आणि ग्रहज्योतिष ह्यांच्यातही त्यांना रस असे. महाविद्यालयातील दुर्बिणीतून तारे पाहाण्यात त्यांनी अनेक रात्री खर्च केल्या.

१८९७ मध्ये सुब्रह्मण्य ह्यांचा भाग्यलक्ष्मी ह्यांच्याशी विवाह झाला. त्या त्यांच्यापेक्षा चार वर्षांनी लहान होत्या. पुढे सुब्रह्मण्यम् ह्यांच्या क्रांतिकाळातील अडचणींना तोंड देतांना भाग्यलक्ष्मी अम्मल त्यांना अनुरूप जोडीदार ठरल्या. त्यांनी असहकारितेत व इतर गांधीवादी चळवळीत भाग घेतला. त्या अय्यर ह्यांच्या पश्चात जिवंत होत्या आणि वयोवृध्द अवस्थेत ७३ व्या वर्षी मृत्यू आला.

१९०२ मध्ये सुब्रह्मण्यम् वकिलीची परीक्षा पहिल्या श्रेणीत उत्तीर्ण झाले. नंतर पहिल्या दर्जाचे वकील म्हणून तिरुचीच्या जिल्हा न्यायालयात त्यांनी नाव दाखल केले. वकिलीच्या जीवनात सुब्रह्मण्यमना जे पाहिजे होते ते सर्व मिळाले. संपत्ती, कीर्ती आणि बराचसा रिकामा वेळ, ते पुस्तके वाचण्यात व बुध्दिबळे खेळण्यात आपला फावला वेळ घालवीत. बुध्दिबळातील कूट प्रश्नांची उत्तरे ते लंडन आणि हॉलंडला पाठवीत. वडिलांप्रमाणेच ते वार्तगसंगमचे संचालक बनले.

स्वदेशी चळवळीच्या दिवसात सुब्रह्मण्यम् यांनी व्ही. ओ. चिदंबरम् पिळ्ळै आणि सुब्रह्मण्यमशिवम् ह्या दोन प्रमुख वकिलांच्या साहाय्याने एक स्वदेशी कापूस गिरणी सुरू करण्याची योजना केली. परंतु ती मूर्तस्वरुपात येऊ शकली नाही.

वकिलीच्या संथ जीवनात पाच वर्षे घालविल्यानंतर सुब्रह्मण्यमना बदल करण्याची तीव्र इच्छा झाली. आपण मद्रासला जाऊन अधिक प्रावीण्य मिळवावे आणि इतर यशस्वी वकिलांप्रमाणे हायकोर्ट- वकील म्हणून व्यवसाय करावा काय ? ह्या प्रश्नाचे उत्तर त्यांना मिळाले नाही आणि ते शोधून काढण्याच्या प्रयत्नात असता भवितव्यतेने त्यांना वेगळ्या दिशेला बोलाविले. त्यांच्या पत्नीचे एक चुलतभाऊ के.जी. पशुपती अय्यर ह्यांचा कापूस व्यापार अतिशय भरभराटीचा होता. त्यांची दुकाने रंगून, बंगलोर व पॉंडिचरी येथे होती. त्यांनी सुब्रह्मण्यमना सुचविले की तुम्ही रंगून येथे वकिली सुरू करा. तेथील भारतीय व्यापारी वर्गाला विश्वासू भारतीय वकिलाची फार गरज होती. पशुपतींनी सुब्रह्मण्यमना एका इंग्रज बॅरिस्टरकडे उमेदवारी मिळवून देण्याचीही तजवीज केली.

परंतु मार्गात खूप अडथळे उभे राहिले. समुद्र ओलांडून जाण्याला सनातन्यांची अनुमती नव्हती आणि ब्राम्हण तरुणाने करावयाची दैनंदिन व्रतवैकल्य सुब्रह्मण्यमना कशी पाळता येतील, ह्याची त्यांच्या आईला शंका वाटत होती. आपला मुलगा आपल्या आयुष्यातून कायमचा निसटतो की काय ह्याचे तिला पूर्वज्ञान झाले की काय कोण जाणे. पण हे खरेच ठरले आणि सुब्रह्मण्यमना रंगूनला गेल्यानंतर त्यांना आपली आई कधीच भेटली नाही.

पण त्यांनी रंगूनला जावे, असे त्यांच्या वडिलांचे मत होते. त्यांनी आपल्या मुलाला

बायबलमधील वचनांनी आशीर्वाद दिला, ''तू सॉल सारखा जा आणि पॉलसारखा परत ये''. १९०६ मध्ये सुब्रम्हण्यम् रंगूनला गेले.

वरिष्ठ इंग्रज बॅरिस्टरना सुब्रम्हण्यम् फारच आवडले. बॅरिस्टरांचे अनेक पक्षकार तमिळ चेट्टियार होते. त्यांचे इंग्रजी मर्यादितच असल्याने सुब्रम्हण्यम् सारखा कनिष्ठ वकील फार उपयोगी ठरला. शिवाय सुब्रम्हण्यम् स्वतः दाव्यांचे तर्जुमे करण्यात निष्णात असत. एकदा इंग्रज बॅरिस्टरशी बोलतांना पशुपती अय्यरनी आपल्या मेव्हण्याची प्रगती कशी काय आहे, असे विचारले. इंग्रजं बॅरिस्टरने सुब्रम्हण्यम् यांची स्तुती केली, एव्हढेच नव्हे तर ते इंग्लंडला जाऊन बॅरिस्टर होण्याच्या लायकीचे आहेत, असे मतही दिले. पशुपती अय्यरना फार आनंद झाला. पण सुब्रम्हण्यम्नी जेव्हा हे ऐकले तेव्हा त्यांना दुःख झाले. कारण असले साहस करण्यासाठी त्यांच्याजवळ पुरेशी साधनसामुग्री नव्हती.

रंगूनला त्यावेळी तिरुचीची काही इतर कुटुंबे होती. त्यांची सुब्रम्हण्यमना अगदी जवळची माहिती होती. डॉ. टी. एस. एस. राजन् हे तिरुचीहून आले होते. ते डॉक्टर म्हणून निष्णात होते पण शाही वैद्यकीय सेवेमधील (आय.एम.एस्.) एका उध्दट इंग्रजाने त्यांचा अपमान केला आणि त्याच्या निषेधार्थ राजन् ह्यांनी सरकारी नोकरी सोडली. त्यांनी लंडनला जाण्यापुरते पैसे जमा केले आणि भारतमार्गे लंडनला जाण्यासाठी रंगून सोडले. राजन् ह्यांच्या जाण्यामुळे सुब्रम्हण्यम् ह्यांची लंडनला जाण्याची भूक आधिकच तीव्र झाली.

सुदैवाने पशुपती अय्यर स्वतःची एक योजना घेऊन पुढे आले. ते स्वतः शेअर बाजारात उलाढाली करीत असत. त्यामुळे त्यांना वाटले की आपल्याला लंडन येथे खरेदी विक्रीत मदत करणारा कोणी मिळाला तर आपल्याला त्याचे मोठे सहाय्य होईल. स्वतःचा अभ्यास सांभाळून सुब्रम्हण्यम् ह्यांनी ह्याकडे लक्ष दिले, तर त्यांना इंग्लंडला जाण्यास मदत करण्याची राजन्नी तयारी दर्शविली; पण सुब्रम्हण्यम्ना स्टॉक्स व शेअर्सची काहीही माहिती नव्हती. पशुपती अय्यर ह्यांच्या पायाशी बसून त्यांनी स्टॉक्स आणि शअर्सचा श्रीगणेशा गिरवला आणि त्यांना खूष केले. ह्यावरून त्यांची परदेशगमनाची दृढ इच्छा दिसून आली.

अशा प्रकारे रंगूनला पोचल्यापासून दहा महिन्यांच्या आत सुब्रम्हण्यम् पुन्हा एकदा समुद्रसफरीस - ह्यावेळेला लंडनच्या - निघाले. १९०७ च्या शेवटच्या पाव वर्षात सुब्रम्हण्यम्नी इंग्लंडला प्रयाण केले. त्यावेळेस त्यांनी आपल्या नावाचा संक्षेप केला. आणि पुढे ते केवळ 'व्ही. व्ही. एस. अय्यर' ह्या नावाने ओळखले जाऊ लागले.

इंग्लंडला जाण्यासाठी रंगून सोडतांना तरुण अय्यरनी अद्ययावत युरोपीय पोषाख घातला होता. ह्यांच्या डोक्यावरील केस कापलेले असून, मधून भांग पडलेला होता. पौरुषदर्शक मिशा चेहऱ्याला शोभा देत होत्या. त्यांना युरोपीय रीतीरिवाजाचे कितीही प्रेम असले, तरी ते स्वतःच्या संस्कृतीचे चाहते होते. त्यांची पेटी इंग्रजी व लॅटिन पुस्तकां-

बरोबरच तमिळ व संस्कृत अभिजात ग्रंथांनी भरली होती. आपल्या बरोबर कंबन् ह्या कविसम्राटाच्या तमिळमधील रामायणाचा सबंध संच घेण्यास ते विसरले नव्हते. अय्यर कम्बूनचे अभ्यासक होते आणि त्यांनी ह्या विदूवत कृतीचा प्रसार करण्यासाठी पुष्कळ प्रयत्न केले आहेत.

त्यांचे जहाज एडन बंदराला पोचल्यावर दोन भारतीय प्रवासी त्यांना येऊन मिळाले. त्यांपैकी एक शीख तर दुसरे आर्यसमाजी हिंदू होते. अय्यरनी त्यांच्याशी त्यांच्या धर्माच्या वैशिष्ट्यांबद्दल तासनूतास चर्चा केली. शीख धर्मातून जातीपध्दतीची केलेली उचलबांगडी आणि शीखगुरुंची - विशेषतः गुरु गोविंदसिंगांची - जहाल देशभक्ती यांचे अय्यरना आपल्या जीवनाच्या अखेरीस मोठे आर्कषण वाटत असे. तमिळ समाजाची सुधारणा अशाच काही पध्दतीने करावी अशी योजना आखण्याचा आयुष्याच्या शेवटच्या आठवड्यात त्यांनी बेतही केला होता. दुर्दैवाने ह्या योजनेला आकार येण्याआधीच अय्यर आपल्यातून निघून गेले.

आर्यसमाजी गृहस्थांबरोबर अय्यर यांनी आपल्याला अत्यंत प्रिय असलेल्या वैदिक प्रार्थनांचे पठण केले.

पुढे यदृच्छेने काही मुसलमान प्रवासी कैरोला त्यांच्या जहाजात आले आणि त्यामुळे अय्यरना परदेशातील इस्लाम धर्माच्या वागणुकीच्या पध्दतीची माहिती मिळण्याची संधी आली. आपल्या रोजच्या प्रार्थना म्हणणे मुसलमान किती कडकपणे पाळतात आणि त्यांची स्वधर्मावर केवढी प्रगाढ श्रध्दा असते या गोष्टींनी अय्यर प्रभावित झाले.

हे सर्व अनुभव पुढे जीवनात त्यांना फार उपयोगी पडले विशेषतः लंडनमधून वेषान्तर करून त्यांना पलायन करावे लागले तेव्हा ते एकदा शीख गृहस्थाच्या वेषात तर दुसऱ्या वेळेस एका मुसलमान यात्रेकरू व्यापाऱ्याच्या वेषात होते.

लंडनमधील आपले पहिले काही महिने अय्यर यांनी परदेशाच्या वातावरणाशी समरस होण्यात आणि आपले दैनंदिन जीवन परकी लोकांची जीवन पध्दती, आचार, आणि परिस्थिती यांच्याशी जमवून घेण्यात घालविले. त्यांनी कायद्याच्या अभ्यासासाठी 'लिंकन्स इन्' ह्या कायदे शिक्षणाच्या चारांपैकी एका 'इन् ऑफ कोर्ट' मध्ये नाव दाखल केले. बॅरिस्टरचा अभ्यास करण्यासाठी कुठल्याही शाळेत अथवा महाविद्यालयात नियमित उपस्थितीची आवश्यकता नव्हती. ह्या पूर्वीच्या खाणावळीत चोवीस जेवणांना उपस्थित राहिले की परीक्षेला बसण्याची परवानगी मिळे. सर्व अभ्यास उमेदवाराला स्वतःच करावा लागे. ह्यामुळे अय्यरना खूप मोकळा वेळ मिळाला आणि त्यांनी लंडनच्या शेअरबाजाराची माहिती करून घेतली.

सुरवातीला अय्यरनी एका निवासगृहात खोली घेतली होती; परंतु शाकाहारी भोजन मिळण्याचा प्रश्नच होता. अय्यरना संगीताचा फार मोठा शौक होता. त्यांनी पाश्चिमात्य संगीत आणि बॉलनृत्य शिकण्यासाठी नाव दाखले केले. इंग्रजी समाजात नाव

मिळविण्यासाठी बॉलनृत्य हा एक अत्यंत आवश्यक गुण आहे असे त्यांना वाटे. त्यांनी ठरविले.

संगीतावरची अनेक पुस्तके वाचली होती आणि नृत्याचे काही पदन्यासही आत्मसात केले होते. परंतु हे सारे तीनच महिने टिकणार होते. कारण असे काही घडले की, ज्यामुळे ह्या साऱ्याचा आकस्मिक शेवट झाला.

अय्यर यांच्या शाकाहारी भोजनालयाच्या शोधाने त्यांना अखेरीस इंडिया हाऊसमध्ये नेले. हा पत्ता हुडकून काढण्याआधी त्यांनी त्यावेळी इंग्लंडमध्ये असलेल्या साडेसातशे भारतीय विद्यार्थ्यांपैकी- त्यापैकी सुमारे शंभर लंडनमध्ये होते- अनेकांना माहिती विचारली होती. त्यांना असा शोध लागला की त्यांच्यापैकी बहुतेकजण शाकाहाराच्या शोधात कंटाळा येऊन सामीष भोजनाला बळी पडले होते. परंतु ज्यांचे अशातऱ्हेने पतन झाले होते त्यांनासुध्दा कधीकधी शाकाहारी पदार्थांची तीव्र इच्छा होई. आपल्या प्रश्नावलीत अय्यरना उत्तर लंडनमधील 'इंडिया हाऊस' ह्या भारतीय निवासस्थानाचा पत्ता लागला. येथे भारतीय खाद्यपदार्थ सहजगत्या मिळत. अय्यरनी ह्या नव्या जागेची परीक्षा घेण्याचे आपल्याला भावितव्यता अशा एका संकेतस्थळी नेत आहे की सोत्साह स्वागत, मैत्रीपूर्ण हस्तांदोलन आणि सहजपणे केलेले संभाषण यांनी आपले जीवन आश्चर्यकारकरितीने बदलून जाणार आहे याची अय्यरना जाणीवही नव्हती.

---

# इंडिया हाऊस - लंडन

ज्या इंडिया हाऊसकडे व.वे. सु. अय्यरना पाठविण्यात आले, ते एक भोजनालय व निवासस्थान होते. त्याची स्थापना १९०५ मध्ये ६५ क्रॉम्वेल रोड, हाय गेट, उत्तर लंडन येथे शामजी कृष्ण वर्मा नावाच्या गुजराथी विद्वान क्रांतिकारी, लोकोपकारी व लंडनमध्ये स्थायिक झालेल्या एका बॅरिस्टरांनी केली.

श्यामजींचा जन्म गुजराथेतील कच्छमधील मांडली येथे १८५७ मध्ये झाला. त्यांचे शिक्षण मुंबईला झाले आणि विद्यार्थी असतानांच ते आर्य समाजाचे संस्थापक स्वामी दयानंद सरस्वती यांचे शिष्य बनले. श्यामजी संस्कृतमध्ये पारंगत होते आणि त्यांची गुणवत्ता संस्कृतमध्ये अधिकारी असणाऱ्या मॅक्सम्युलर आणि प्रा. मोनियर विल्यम्स ह्यांच्यासारख्या पाश्चिमात्य अधिकारी पंडितांनी ओळखली होती. श्यामजी इंग्लंडला गेले आणि १८७९ मध्ये केंब्रिज विद्यापीठाची बी.ए.ची परीक्षा उत्तीर्ण झाले. नंतर त्यांनी कायद्याचा अभ्यास केला व ते बॅरिस्टर झाले. रॉयल एशियाटिक सोसायटीपुढे त्यांनी 'भारतातील लेखनाचा प्रारंभ' या नावाचा निबंध वाचला आणि त्यांना सोसायटीचे सभासद निवडण्यात आले. भारताच्या राज्यसचिवांनी (सेक्रेटरी फॉर स्टेट) त्यांना १८८१ मध्ये बर्लिन येथे भारताचे प्रतिनिधित्त्व करण्यासाठी पौर्वात्य परिषदेला पाठविले.

भारतामध्ये परत येऊन श्यामजींनी रतलाम, उदेपूर आणि जुनागड या तीन संस्थानात दिवाण किंवा मंत्रालयाचे सदस्य म्हणून नौकरी केली. परंतु लवकरच ते लोकमान्य टिळकांच्या राजकीय विचारांकडे ओढले गेले आणि त्यामुळे अडचणीत आले. टिळकांना १८९७ साली अटक झाल्यावर श्यामजींनी भारत सोडला आणि ते लंडन येथे कायमचे वास्तव्य करण्यासाठी निघून गेले.

लंडन येथे त्यांनी विख्यात इंग्रज तत्त्वज्ञ हॅर्बर्ट स्पेन्सर ह्यांच्या हाताखाली समाजशास्त्राचा अभ्यास केला. आपल्या गुरूवर त्यांची इतकी भक्ती होती की, स्पेन्सर १९०३ मध्ये मरण पावल्यावर त्यांच्या उत्तर क्रियेच्या वेळी आपण गुरूच्या नावाने ऑक्सफर्ड विद्यापीठात शिष्यवृत्ती सुरू करण्यासाठी हजार पौंड देणगी देऊ असे त्यांनी

जाहीर केले. त्यांनी हर्बर्ट स्पेन्सरचा एक पुतळा लंडनमध्ये अशावेळेस उभारला की, ज्यावेळी स्पेन्सर यांच्या देशबांधवांना सुध्दा त्यांच्या मोठेपणाची किंमत कळू लागली नव्हती. ''आक्रमणाचा प्रतिकार केवळ न्याय्य नव्हे तर आवश्यक कर्तव्यच ठरतो'' हा स्पेन्सरचा आदेश श्यामजींनी सतत हृदयाशी बाळगला.

फ्रान्सप्रमाणे भारतचे स्वतंत्र लोकराज्य व्हावे अशी श्यामजी कृष्ण वर्मा यांची इच्छा होती. त्यांना फ्रान्सबद्दल फार आदर असे. त्यांनी फ्रेंच राष्ट्रगीत 'मार्सेल्स'चे संस्कृतमध्ये रूपांतर केले आणि लंडनमध्ये इंडियन होमरूल सोसायटी (भारतीय स्वराज्य समिती) स्थापन केली. 'द इंडियन सोशियालॉजिस्ट' या नावाने मुखपत्रही त्यांनी सुरू केले.

इंग्लंडमध्ये शिक्षणाची इच्छा असलेल्या भारतीय विद्यार्थ्यांसाठी श्यामजींनी सुरू केलेली 'शिवाजी शिष्यवृत्ती' हे त्यांचे दुसरे महत्त्वाचे कार्य. शिष्यवृत्तीसाठी प्राथमिक निवड टिळक किंवा 'काळ' दैनिकाचे संपादक शिवरामपंत परांजपे हे करीत.

विनायक दामोदर सावरकर इंग्लंडला आले ते 'शिवाजी शिष्यवृत्ती' घेऊनच. त्यांना खास प्रशस्तिपत्र देताना टिळकांनी श्यामजींना लिहिले, ' इतकी घाई असताना तुमच्या नजरेला कोणाची तरी शिफारस करण्यात आज अर्थ नाही. पण तरीही मला असे कळवावेसे वाटते की, अर्जदारामध्ये मुंबईचे श्री. सावरकर म्हणून आहेत ते गतवर्षी पदवीधर झाले. ते एक तडफदार तरूण असून त्यांना स्वदेशीच्या कामाबद्दल उत्साह आहे- इतका की, त्याबद्दल त्यांनी फर्ग्युसन महाविद्यालयाच्या अधिकाऱ्याची इतराजी ओढवून घेतली. - आपण कधीही सरकारी नोकरी करावी, अशी त्यांचे इच्छा नाही. त्यांचे नैतिक चारित्र्य चांगले आहे.' याचा श्यामजीवर प्रभाव पडला. सावरकरांनी टिळकांसमोर एका संमतीपत्रावर सही केली. टिळकांकडून त्यांना शिवाजी शिष्यवृत्तीचा पहिला हप्ता म्हणून ४०० रूपये मिळाले आणि ते लंडनला जाण्यासाठी जहाजात बसले.

सावरकर हे चित्पावन ब्राम्हण या नामवंत ज्ञातीतील होते. स्याच ज्ञातीत १८५७ मध्ये बंडवाले म्हणून साहेब पेशवे आणि नंतर बाळ गंगाधर टिळक जन्मले. सावकरांचा जन्म नाशिक येथे १८८३ मध्ये झाला. ते एका जहागिरदाराचे पुत्र होते. अगदी बालवयातच त्यांच्यात पुढील मोठेपणाची पूर्वचिन्हे दिसली. वयाच्या १० व्या वर्षीच पुण्याच्या वर्तमानपत्रात त्यांच्या कविता प्रसिध्द होऊ लागल्या. महाराष्ट्राची परिस्थिती यावेळी आणीबाणीचे रूप घेऊ लागली होती. दुष्काळ आणि प्लेगने अनेक बळी घेतले होते. प्लेगमुळे पुण्याची व्यवस्था प्लेग कमिशनर डब्ल्यु. सी. रॅण्ड या अरेरावी अधिकाऱ्याकडे आली होती व लोक त्यांच्या जुलमाने त्रस्त झाले होते. टिळकांनी शासनाला इशारे दिले, परंतु ते कोणी ऐकले नाहीत. स्या आपत्तीतचे शासकीय अधिकाऱ्यांनी जनतेच्या दुःखमय परिस्थितीकडे संपूर्ण कानाडोळा करून व्हिक्टोरिया राणीच्या राज्यारोहणचा हीरकमहोत्सव साजरा करण्याचे ठरविले. पुण्याचे दोन तरूण - चाफेकर बंधू- यांनी हीरकमहोत्सवाच्या दिवशी रॅण्डला आणि आयर्स्ट नावाच्या दुसऱ्या

एका इंग्रज अधिकाऱ्याला ठार केले. यात टिळकांचा हात आहे, असा सरकारला संशय आला आणि त्यांना अटक करण्यात आली. टिळकांवर राजद्रोहाचा आरोप ठेवला गेला आणि त्यांना १८ महिन्याची सक्त मजुरीची शिक्षा दिली गेली. त्यांना वरिष्ठ न्यायालयाकडे अपील करण्याची परवानागीही नाकारण्यात आली. चाफेकर बंधूना मृत्यूची शिक्षा ठोठावण्यात आली. त्यांना फाशी देण्यात आले.

चाफेकर बंधूच्या हौतात्म्याचा तरुण सावरकरांवर प्रगाट परिणाम झाला. मध्यरात्री त्यांनी आपल्या घरातील देवापुढे शपथ घेतली की, आपण ब्रिटिशांना भारतातून हाकलून देण्यासाठी झटू आणि आपले संपूर्ण आयुष्य त्यासाठी खर्च करू. आपण आपल्या निकटवर्तियांच्या आणि प्रियजनांच्या सुखाचाही त्यासाठी त्याग करू. शिवाजीने भवानी देवीपाशी घेतलेल्या शपथेप्रमाणेच ही शपथ होती.

सावरकरांनी लवकरच आपल्याभोवती एकनिष्ठ तरुण लोकांचा एक संच गोळा करण्यास सुरुवात केली. हे लोक स्वतःला 'मित्रमेळा' म्हणून घेऊ लागले. देशाला स्वतंत्र करण्यासाठी आवश्यकता वाटली तर ससस्त्र बंड करावे, असा त्यांचा विश्वास होता. १९०२ मध्ये सावरकरांनी उच्च शिक्षणासाठी फर्ग्युसन कॉलेजमध्ये नाव घातले. मित्रमेळ्याची एक गुप्त बैठ्क बोलावली. सर्व महाराष्ट्रातून या बैठ्कीस २०० च्या वर सभासद उपस्थित राहिले. संघटनेचे नाव बदलून 'अभिनव भारत' असे ठेवण्यात आले. संघटनेची क्रियाशीलता देशाच्या इतर भागात वाढविण्यात आली. आपल्या स्वंतत्र लढ्यातील अनेक उल्लेखनीय व्यक्ती कधी ना कधी 'अभिनव भारत' च्या सभासद होत्या. आचार्य कृपलानी पुण्याच्या डेकन कॉलेजचे विद्यार्थी असताना या संघटनेचे सभासद होते. सभासद असलेली दुसरी व्यक्ती म्हणजे मुंबईचे कॉंग्रेसचे पहिले मुख्यमंत्री बा. गं. खेर. पुण्याचे एक साप्ताहिक 'विहारी' हे अभिनव भारताचे मुखपत्र बनले.

ह्यावेळी सावरकरांना शिवाजी शिष्यवृत्ती मिळली. इंग्लंडला जाण्यास ते उत्सुक होते. कारण पश्चिमेकडील क्रांतिकारकाशी आपण संर्पक साधू अशी त्यांना आशा होती.

जुलै १९०६ मध्ये सावरकर लंडनला पोचले आणि इंडिया हाऊसमध्ये वास्तव्यासाठी आले. कायद्याच्या अभ्यासाठी ते ग्रेज इन मध्ये दाखल झाले. श्यामजी कृष्ण वर्मांवर सावरकरांचा इतका प्रभाव पडला की, ते सुध्दा अभिनव भारतचे सभासद झाले. १९०७ मध्ये श्यामजींनी इंडिया हाऊसची व्यवस्था सावरकरांच्या स्वाधीन केली आणि ते स्वतः पॅरिसला वास्तव्यासाठी गेले. पॅरिसमध्ये मादाम भिकाजी कामा ह्या जहाल पारशी महिला इंग्रजांना क्रांतिकारी विरोध करण्यात अग्रगण्य होत्या.

अशा क्रियाशील तरुणांच्या गटात अय्यरनी १९०७ साली प्रवेश केला. त्यांच्या पहिल्या भेटीचे वर्णन सावरकरांनी केले आहे. '१९०७ साली किंवा त्यासुमारास एक दिवस लंडनमधील इंडिया हाऊसच्या मोलकरणीने आम्ही भोजनासाठी खाली जात असता आमच्याकडे एक भेटपत्र दिले आणि सांगितले की एक सद्गृहस्थ दिवाणखान्यात

वाट पाहात आहेत. थोड्याच वेळात दार उघडले आणि अद्ययावत पध्दतीकडे कल असलेल्या, व्यवस्थित युरोपीय पोषाखातील सद्गृहस्थांनी आमच्याशी अतीव स्नेहाने हस्तांदोलन केले. आपण रंगून येथे वकील होतो आणि आता इंग्लंडला बॅरिस्टरीची उपाधी मिळविण्यासाठी आलो आहोत असे त्यांनी आम्हाला सांगितले. आपली इंग्रजी संगीत शिकण्याची इच्छा व त्याबरोबरच नृत्याचे काही पदन्यास टाकण्याची मनीषाही त्यांनी बोलून दाखविली. ते स्वतः वयाने तिशीच्या वर दिसत होते. आम्ही देखील तरूणच आहोत, हे पाहून त्यांना आश्चर्य वाटले. नेहमीप्रमाणे थोडीशी नाराजी व्यक्त करून आम्ही म्हटले, 'आपल्या अत्यंत महत्त्वाच्या कित्येक समस्या अद्याप सुटलेल्या नसताना, तारुण्याची शक्ती केवळ अशा सवंग करमणुकीत खर्च करणे योग्य नाही. सद्गृहस्थाची कांही खात्री पटली नाही, परंतु त्यांच्यावर कांहीसा प्रभाव मात्र पडलेला दिसला. आपण वरचेवर येऊ असे त्यांनी आम्हाला अभिवचन दिले- हे गृहस्थ म्हणजे श्रीयुत व. वे. सु. अय्यर.''

सावरकरांनी अय्यर ह्यांच्या वयाचा केलेला अंदाज थोडा अधिकच होता. अय्यर फक्त २६ वर्षांचे होते. परंतु त्यांच्या शरीराची बांधणी दणकट असल्यामुळे वयाने ते थोडे मोठे वाटत. सावरकर मात्र सडपातळ आणि हाडे वर आलेली असल्यामुळे अय्यर यांच्यापेक्षा केवळ दोन वर्षांनी लहान असतांना सुध्दा त्यांच्या खऱ्या वयापेक्षाही अधिक तरुण वाटत.

ह्या पहिल्या भेटीची अय्यर व सावरकर ह्या दोघांवरही मोठी छाप पडली. ते आयुष्यभर एकमेकांचे मित्र होणार होते आणि दोघेही भारतीय स्वातंत्र्याच्या कार्यासाठी आपले जीवन समर्पित करणार होते. ह्या भेटीचा पहिला परिणाम असा झाला की लौकरच अय्यर इंडिया हाऊसमध्ये कायमचे निवासी म्हणून आले. थोड्याच काळानंतर अय्यर ह्यांच्या आधी इंग्लंडला आलेले टी.एस्. एस्. राजन् इंडिया हाऊसमध्ये दाखल झाले. इंडिया हाऊसच्या सर्व कार्यक्रमाचे ते त्रिकुट मुख्य प्रेरक असे. अय्यर अभिनव भारतचे उपाध्यक्ष झाले व सावकरांचे उजवे हात बनले.

अय्यर ह्यांच्या अद्ययावत् इस्त्रीच्या पोषाखा ऐवजी आता साधेसुधे कपडे आले. पाश्चात्य संगीताच्या आणि बॉलरुम नृत्याच्या धड्यांना अर्धचंद्र देण्यात आला. किंमती मेजवान्या आणि मित्रांसाठी करण्यात येणारा खर्चिक पाहुणचाराला काट मारण्यात आली. एवढेच काय पण कायद्याच्या अभ्यासात रस घ्यायचा तर त्याला सुध्दा ह्या नव्या व्यवस्थेत दुसरा अग्रक्रम मिळाला.

इंडिया- हाऊसच्या कार्यक्रमांचे डॉ. टी.एस्.एस्. राजन् ह्यांनी असे वर्णन केले आहे. ''आमच्या मंडळाची बैठक पंधरवड्यातून एकदा भरत असे आणि त्यापैकी निदान निम्मेतरी आम्ही जे भारतीय अन्न वाढीत असू त्यासाठी येत. जेवतांना आणि सर्व रिकाम्या वेळी आम्ही भारतीय स्वातंत्र्याच्या तत्त्वज्ञानाची तसेच स्वातंत्र्य मिळविण्याचे मार्ग आणि भारतातून येणाऱ्या वर्तमानपत्रातून मिळणारी भारतीय प्रगतीची माहिती यांची चर्चा

करीत असू. आमचे कार्यक्रम वाढल्यावर आमच्या मागे इंग्रजी गुप्त हेर लागले. त्यामुळे आमच्याकडील कायम रहिवाशांची संख्या नेहमीच मर्यादित राहिली.

लंडनमधील त्यावेळचे भारतीय विद्यार्थी बहुधा श्रीमंत कुटुंबातील असत. मातृभूमीबद्दल त्यांच्या मनात कोठलाही विचार नसे, एव्हढेच नव्हे तर ब्रिटिशांची नक्कल करण्याची ते पराकाष्ठा करीत. त्यांच्या मते जीवनाचा अंतिम हेतू म्हणजे एक चांगल्या पगाराची नोकरी किंवा भरभराटीचा धंदा आणि त्याचबरोबरच ऐश्वर्ययुक्त स्वास्थपूर्ण जीवन. हा कठोर संवेदनशून्य दृष्टिकोन बदलण्याचे इंडिया हाऊसमधील तरुणांनी ठरविले. त्यांच्याजवळ पैसा नव्हता. परंतु त्यांची श्रध्दा तीव्र असल्यामुळे सर्व उणीवा दूर होत. त्यांच्या मते भारतीय वीर पुरुष हे केवळ इतिहासात जमा झालेल्या व्यक्ती नाहीत तर भारताच्या वैभवाचे जिवंत दूत होते. दिवाळी, दसरा ह्या सणांबरोबरच ते ह्या वीरपुरुषांचे जन्मदिवसही साजरे करीत. ह्या संमेलन प्रसंगांचा उपयोग व्याख्याने आयोजित करणे व चर्चा ह्यासाठी केला जाई. जे भारतीय पुढारी ह्या दिवशी इंग्लंडला भेट देत त्यांना आमंत्रण दिले जाई. परंतु त्यांपैकी फारच थोड्यांच्या उपस्थितीचा लाभ मिळे. बहुतेक भारतीय अभ्यागत पुढारी नेमस्त असत आणि ते बहुशः ईस्ट इंडिया असोसिएशन किंवा इंपीरियल इन्स्टिट्यूट ह्या सारख्यांनी बोलाविलेल्या अधिकृत सभांना जात आणि त्या ठिकाणी टिळक पंथीय, तथाकथित 'जहाल' व क्रांतिकारक ह्यांचा निंदास्पद उल्लेख करण्यात त्यांना धन्यता वाटे. इंडिया हाऊसमधील तरुण सुध्दा ह्या सभांना जात. पण ते अशा लोकांची हुर्रेवडी करण्यासाठी. कारण कुठलाही आक्षेप आव्हानाविना जाऊ देणे त्यांना मान्य नसे.

त्यांनी ब्रिटिश वृत्तपत्रसृष्टीतील पत्रकारांशी आणि विशेषतः आयरिश लोकांशी व तरुणांशी मैत्री केली. त्यांच्या मदतीने आपण स्वतः दिलेल्या काही बातम्या ते वेळोवेळी छापून आणीत. एखादवेळी ते पुस्तिका छापून त्या पार्लमेंटच्या सदस्यांना व ज्यांच्या जनमतावर प्रभाव पडतो अशा व्यक्तिसमूहांना फुकट वाटीत. ह्या बरोबरच ते भारतीयांना उद्देशून कळकळीची विनंती करीत की त्यांनी आपल्या निद्रित अवस्थेतून बाहेर पडावे आणि लोक कल्याणासाठी व भारतीय स्वातंत्र्यासाठी प्रयत्न करावा. अशा प्रकाशनांना पुष्कळ वेळा इंग्रज सत्ताधाऱ्यांकडून बंदी घालण्यात येत असे. त्यामुळे ही प्रकाशने भारतात परतणाऱ्या प्रवाशांकरवी निर्यात केली जात. नंतर त्यांचा मोठ्या प्रमाणात प्रसार केला जाई.

अभिनव भारतने - ज्या संस्थेचे व्ही.व्ही. एस्. अय्यर उपाध्यक्ष झाले होते - स्पष्ट केले की ''मातृभूमीची मुक्तता युध्दाची तयारी करूनच करावी लागणार आहे. ह्या तयारीत पुढील गोष्टींचा अंतर्भाव असेल : १) स्वदेशी, बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षण ह्यांची शिकवण, २) शेजारच्या देशांकडून हत्यारे घेऊन त्यांचा साठा करणे, ३) लहान लहान कारखाने उभारणे, ४) परदेशातून हत्यारे विकत घेणे व त्यांची भारतात चोरटी निर्यात करणे, ५) शक्य असेल तेथे गनिमी काव्याचा अवलंब करणे, ६) क्रांतिकारक उठावासाठी

योग्य संधीची वाट पाहा. युरोप एका मोठ्या युध्दाकडे वेगाने धाव घेत असल्यामुळे अशी संधी जवळ येत आहे असे त्यांना वाटत होते. जागतिक परिस्थितीचा आपण फायदा घ्यावा, इंग्रजांशी मुकाबला करावा व त्यांना भारताबाहेर हाकलून द्यावे अशी ह्या तरुणांची अपेक्षा होती.

ह्या महत्त्वाकांक्षी उद्देशाने ह्या तरुणांनी आयर्लंड, तुर्कस्थान व रशियामधील क्रांतिकारकांशी संधान बांधले, त्यांच्याकडून क्रांतिकारक संघटना बांधण्याचे तंत्र हस्तगत केले. तसेच हत्यारे व दारुगोळा ह्यांचे तंत्रही शिकून घेतले. इंडिया हाऊसच्या मागच्या खोल्यात ते गुप्तपणे बॉम्ब तयार करण्याचा प्रयत्न करीत. सावरकर अभिनव भारताच्या बैठकांना उपस्थित राहात तेव्हा कित्येक वेळा त्यांच्या हातावर पिकरिक ॲसिडचा पिवळा डाग असे. हत्यारे विकत घेणे फारसे कठीण नसे. सेनापती बापट आणि हेमचंद्र दास ह्या आपल्या दोन तेजस्वी सभासदांना अभिनव भारतने बॉम्ब तयार करण्याची विद्या शिकविण्यासाठी युरोपीय देशात पाठविले. तेथे त्यांना ती विद्या स्वतः रशियातील एका दहाशतवादी संघटनेकडून हस्तगत केली आणि एक बॉम्ब पुस्तिकाही बरोबर आणली. ही पुस्तिका चक्रमुद्रित करण्यात आली आणि बापट व आणखी दोघे अभिनव भारतच्या दोन सभासदांसह भारताकडे निघाले. पुस्तिकांचे अखिल भारतीय पातळीवर वितरण करण्यासाठी बापट, होतीलाल वर्मा आणि हेमचन्द्र दास भारतात पोचले. तेथील महत्त्वाच्या केन्द्रांवर त्यांनी पुस्तकांचे वाटप केले. ह्यांनंतर त्या वर्षातील संस्मरणीय घटना घडली. मुझफ्फरपूर, बंगाल येथील खुदिराम बोस ह्या एकोणीस वर्षांच्या तरुणाने ३० एप्रिल १९०७ रोजी पहिला बॉम्ब जिल्हा न्यायाधीश किंग्जफर्ड ह्यांजवर फेकला.

आंतरराष्ट्रीय समाजवादी महासभेचे (इंटरनॅशनल सोशलिस्ट कॉंग्रेस) अधिवेशन जर्मनीमधील स्टटगार्ट येथे ऑगस्ट १९०७ मध्ये भारतात आहे असे अभिनव भारत संघटनेला कळले तेव्हा त्यांनी दादाभाई नौरोजी पार्लमेंटचे सभासद असतांना त्यांच्या भूतपूर्व सचिव असलेल्या मादाम भिकाजी कामा आणि सिंगजी राणा ह्या आपल्या दोघा सभासदांना भारताचे प्रतिनिधित्व करण्यासाठी पाठविले. इंग्लंडचे समाजवादी प्रतिनिधी रॅम्से मॅक्डोनल्ड ह्यांचा विरोध असतांनाही मादाम कामांनी इंग्लंडच्या मॉरिस हिंडमन आणि फ्रान्सच्या ज्यँ व्हारेज ह्यांच्या मदतीने भारतीय स्वातंत्र्याचा एक प्रस्ताव मांडला व स्वतंत्र भारताचा एक झेंडा परिषदेत फडकावला. अय्यर ह्यांच्याजवळ ह्या झेंड्याची प्रतिकृती अनेक दिवसपर्यंत होती. अय्यर ह्यांचे चिरंजीव कृष्णमूर्ती ह्यांनी तो आपल्याला आपल्या पॉंडिचरीच्या घरी अगदी अलीकडे म्हणजे १९१६ ते २० पर्यंत पाहिल्याचे स्पष्टपणे आठवते. फ्रेंच ध्वजावरील पट्ट्यांप्रमाणे ह्या ध्वजावर लाल, पांढरा आणि निळा असे सारख्या रुदींचे तीन आडवे रंगीत पट्टे होते. वरच्या भागात ओळीने आठ तारे होते आणि खालच्या भागात डाव्या बाजूला सूर्य व उजव्या बाजूला चंद्र होता. आठ ताऱ्यांनी भारताचे आठ प्रांत सूचित केले होते तर सूर्य हिंदूची आणि चन्द्र मुसलमानांची प्रतिके

होती.

हा झेंडा फडकवितांना मादाम कामा म्हणाल्या, "हा झेंडा भारताच्या स्वातंत्र्याचा आहे. पहा, भारतीय स्वातंत्र्याचा जन्म झाला. हा झेंडा भारतीय तरुण हुतात्म्यांच्या रक्ताने आधीच उंच झाला आहे. सद्गृहस्थहो, मी आपणास विनंती करते की, आपण उठावे आणि भारतीय स्वातंत्र्यांच्या ह्या ध्वजाला प्रणाम करावा. ह्या ध्वजाच्या नावाने मी जगातील सर्व स्वातंत्र्य प्रेमींना विनंती करते की, आपण एक पंचमांश मानव जातीला स्वतंत्र करण्यासाठी ह्या ध्वजाशी सहकार्य करावे."

प्रतिनिधी उभे राहिले आणि त्यांनी ध्वजाला वंदन केले.

अभिनव भारताच्या क्रांतिकारकांची एक इंग्लंड विरुध्द संयुक्त फळी संघटित करायची व ब्रिटिश साम्राज्याविरुध्द सर्वांनी एकाच वेळी बंड करून उभे राहायचे अशी अभिनव भारतच्या क्रांतिकारकांची योजना होती. लंडन व पॅरिस येथे राहात असलेल्या प्रमुख इजिप्शियन पुढाऱ्यांनी भारतात सशस्त्र बंड झाले, तर आपण प्राणभूत अशा सुवेज कालव्याची नाकेबंदी करून सहाय्य करू असे आश्वासन दिले होते. सावरकर आयर्लंडमधील सिन्फिन् नेत्यांशी संधान बांधून होते आणि न्यूयॉर्कमधील 'गॅलिक अमेरिकन' ह्या ब्रिटिश विरोधी वृत्तपत्रात जोरदार राजकीय लेख लिहीत होते. ह्या लेखांची युरोपमध्ये वाचण्यासाठी इतर भाषात भाषांतरे केली जात असत. तुर्की क्रांतीचे नेते कमाल अतातुर्क हे लंडन येथे होते व ते तुर्की राजेशाही विरुध्द प्रतिकार संघटित करीत होते. त्यांच्याशी व. वे. सु. अय्यर यांनी संपर्क साधला.

इंडिया हाऊसमधील तरुण इतर देशातील देशभक्तांच्या चरित्रांवरून स्फूर्ती घेत होते. सावरकरांनी मॅझिनीचे आत्मवृत्त मराठीत अनुवादीत केले. मॅझिनी ह्या इटालियन देशभक्ताने ऑस्ट्रियन् अधिपत्याखाली असलेल्या इटलीला स्वतंत्र्य करण्यासाठी सहाय्य केले होते. त्याचप्रमाणे इटालियन जनतेची संघटना करणारा व संयुक्त इटली निर्माण करणारा गॅरिबाल्डी याचे चरित्र भारतीय भाषांत लिहिले गेले आणि भारतातील राष्ट्रीय वृत्तपत्रात छापण्यासाठी पाठवले गेले. नेपोलियनच्या चरित्राचा आणि युध्दातील डावपेचांच इंडिया हाऊसमध्ये अभ्यास केला गेला; असा की संधी येईल तेव्हा त्याचे अनुकरण व्हावे.

व. वे. सु. अय्यरनी तमिळमध्ये गॅरिबाल्डीचे चरित्र लिहिले आणि कवी सुब्रह्मण्य भारती यांनी संपादित केलेल्या व पॉंडिचरी येथे प्रकाशित होणाऱ्या 'इंडिया' ह्या तमिळ साप्ताहिकात ते क्रमशः प्रसिध्द करण्यासाठी पाठविले. हा सर्व चरित्र भाग एक वर्षपर्यंत क्रमशः प्रसिध्द होत राहिला. ह्याच पत्राला अय्यर एक साप्ताहिक 'लंडनचे बातमीपत्र' पाठवीत आणि त्यात भारताला रस असलेल्या परंतु लंडन आणि युरोपमध्ये घडणाऱ्या गोष्टींवर लक्ष केंद्रित करीत. ह्या योगे भारतीय जनतेमध्ये स्वातंत्र्याच्या हक्कांबद्दल जागृती व्हावी, असा त्यांचा हेतू असे. लंडनच्या बातमीपत्रात ब्रिटिश लोक पाशवी अत्याचारांनी आयर्लंडचे स्वतःला स्वतंत्र करण्याचे प्रयत्न कसे निर्दय रीतीने दडपून

टाकीत होते त्याची उदाहरणे असत. जागतिक संदर्भात ब्रिटिशांचा प्रभाव भारतात जितका रंगविला जातो तितका तो सार्वभौम नाही असेही त्या पत्रात स्पष्ट केले जाई.

डॉक्टर राजन् त्यांनी झांशीची राणी लक्ष्मीबाईबद्दल लिहिले आणि तिचे जीवनचरित्रही 'इंडिया' मध्ये क्रमशः प्रसिध्द केले जाई. सावरकरांनी अविरत प्रयत्न करून १८५७ च्या तथाकथित भारतीय बंडाचे मूळ आधार शोधले आणि भरीव पुराव्यानिशी असे सिध्द केले की हा उठाव म्हणजे केवळ एक बंड नव्हते, तर ते आधुनिक भारताचे पहिले स्वातंत्र्य युध्द होते. १८५७ वरील सावरकारांचे मराठी पुस्तक लंडनमधील तरुण भारतीयांच्या एका गटाने इंग्रजीत भाषांतरीत केले. त्यातील कांही विद्यार्थी मराठी जाणणारे होते आणि त्यांना व.वे. सु. अय्यर त्यांनी साहाय्य केले होते. १८५७ हे इंडिया हाऊस मधील सर्वांनाच स्फूर्तिपद ठरले.

अय्यर हे वृत्तीने अभ्यासू होते. लंडनला गेल्यानंतर काही दिवसातच त्यांनी लंडनच्या शेअरबाजाराशी परिचय करून घेतला आणि आपले मेहुणे पशुपती अय्यर त्यांच्यासाठी ते व्यवहार करू लागले. त्याशिवाय ते ब्रिटिश म्युझियममध्ये जात आणि नेपोलियनच्या चरित्राबद्दल साधने गोळा करीत. सरकारी दस्तऐवज, ऐतिहासिक कागदपत्रे आणि फ्रेंच व इंग्रजी पुस्तकात डोके खुपसून त्यांनी दिवसच्या दिवस संशोधने केले. त्या दीर्घ संशोधनाचे फलित म्हणजे त्यांनी तमिळमध्ये लिहिलेला व पुष्कळ वर्षांनंतर पाँडिचरी येथे प्रकाशित झालेला 'नेपोलियन' हा ग्रंथ. युध्दनीती त्या विषयासंबंधी भारतीय देशभक्तांना फारशी माहिती नसल्यामुळे अय्यर त्यांनी नेपोलियनच्या लष्करी डावपेचांना त्या ग्रंथात विशेष महत्त्व देण्याची काळजी घेतली होती. हेतू हा की गरज पडेल तेव्हा त्यांची भारतीय देशभक्तांना मदत व्हावी. दुर्दैवाने अय्यर त्यांचा हा प्रमुख ग्रंथ मद्रास इलाख्यातील इंग्रज सत्ताधाऱ्यांनी जप्त करून नष्ट केला. आधीच्या सर्व घालमेलीत अय्यर कुटुंबाकडे आणि त्यांच्या सर्व मित्रांकडे असेलेल्या प्रती सुध्दा शिल्लक राहिल्या नाहीत. दुःखाची गोष्ट अशी की हा ग्रंथ कायमचा नष्ट झाला.

सुदैवाने अय्यर त्यांची इतर काही पुस्तके व लंडनमधील त्यांच्या वास्तव्यासंबंधीची एक अमोल टिपणवही संपूर्ण आणि जवळजवळ क्षतहीन अवस्थेत हाती आली आहे. ही वही म्हणजे एक छोटेसे बांधलेले पुस्तक होते आणि ते अय्यर त्यांनी ब्रिटिश राजधानीत आल्याआल्या विकत घेतले होते. त्या टिपणवहीत अय्यर आणि त्यांचे इंडिया हाऊसमधील मित्र त्यांना समजावून घेण्याजोगी नाना प्रकारची अत्यंत मौल्यवान अशी माहिती आहे. ही अत्यंत जिव्हाळ्याची माहिती देणारी दैनंदिनीवजा व्यक्तिगत टाचण वही स्कॉटलंड यार्डच्या आणि अय्यर त्यांच्या विरुध्द पुरावा गोळा करीत असलेल्या गुप्तचरांच्या काकदृष्टीतून कशी निसटली हे एक महदाश्चर्य आहे. आज ही टाचणवही नव्या दिल्लीतील नेहरूस्मृती वस्तुसंग्रहालयाच्या ग्रंथालयात जपून ठेवली आहे. त्या वही बरोबरच अय्यर त्यांचे पुत्र डॉ. व्ही. व्ही. एस्. कृष्णमूर्ती त्यांनी अय्यर त्यांची अनेक

कागदपत्रे आणि वैयक्तिक पत्रे राष्ट्राला देणगी म्हणून दिली आहेत.

टाचण वहीचा एक मनोरंजक भाग म्हणजे तिचा बहुतेक भाग इंग्रजीत असून काही भाग पिटमनच्या लघुलिपीतही लिहिलेला आढळतो. काही पाने तमिळमध्ये तर काही संस्कृत व ग्रंथ लिपीतही लिहिली आहेत. पिटमन लघुपध्दती वापरतांना सुध्दा अय्यरनी मोठ्या हुषारीने स्वतः बनविलेली अनेक लघुरुपे वापरली आहेत. ही रूपे वापरण्याचा हेतू आपल्या लिखाणात प्रक्षिप्त मजकूर घालणारांचे प्रयत्न अयशस्वी व्हावेत हा असावा.

लंडन टाचणवही विकत घेण्याची तारीख अय्यर ह्यांनी स्वच्छ व फर्ड्या अक्षरात 'व्ही.व्ही. एस्. अय्यर, १५ ऑक्टोबर १९०७ अशी लिहिली आहे. अगदी सुरुवातच्याच एका नोंदीत पुढील माहिती आढळते. "लंडनला पोचलो. १० ऑक्टोबर १९०७." दुसरी एक नोंद अशी आहे, "स्वराज्य लौकरच मिळवले पाहिजे."

मुखपृष्ठाच्या आधीच्या झडपावर खालील अंक व अक्षरे आहेत. १ २ ३ ४ ५ ६ ७ ८ ९ ० / S U B R A M O N I E. सुब्रम्मणी हे अय्यर ह्यांच्या सुब्रम्मण्यम् ह्या नावाचे फ्रेंच पध्दतीने लिहिलेले रूप आहे. स्वतःच्या नावाची अक्षरे आणि अंक ह्यांच्या एककालिकतेतून गोपनीय गुप्त संदेश देण्यासाठी अय्यर ह्यांनी स्वतः तयार केलेली ही सांकेतिक लिपी आहे हे उघड आहे. अय्यर हे व्ही. व्ही. एस्. अय्यर म्हणून ओळखले जात असल्यामुळे त्यांचे संपूर्ण नाव सुब्रम्मण्यम् आहे हे फारसे कोणाला माहित नव्हते. त्यांचे फ्रेंचमध्ये केलेले स्वरूपांतर तर फारच थोड्यांना माहीत असणे शक्य होते. लिपीतील आपल्या नावाच्या दहा अक्षरांना दहा अंक दिले आणि त्याचप्रमाणे उरलेल्या अक्षरांना अधिक अथवा उणे आणि इतर चिन्हे दिली की एक सोपी पण चकवणारी सांकेतिक लिपी तयार होते. उदा. आपण पुढील स्पष्ट शब्दातला संदेश घेऊ - "एक डझन ब्राऊनिंग स्वयंचलित पिस्तुले स्वामींकडे पाठवा- अय्यर. "हा संदेश सांकेतिक लिपीत असा लिहिता येईल- "१०७ x १९८ x २ //७८० // x ८०८८३४७ - २८९८ - २ ५२ - ३७६५ - ३९ ८" इ.इ. जिज्ञासू वाचकाला हा संदेश खालील सूत्रावरून उलगडता येईल- ए५, बी ३, सी- ८, डी x १, इ ०, एल् - ७, जी x २, एच्- ६, आय् ९, जे x ३, के- ५, एल् x ४, एम् ६, एन् ८, ओ ७, पी- ४, क्यू x ५, आर् ४, एस् १, टी- ३, यू २, व्ही x ६, डब्ल्यू- २, एक्स x७ वाय्- १, जेड् x ८. अंतर सोडण्यासाठी चिन्हे //

खालील गूढ नोंदीवरून अय्यर ह्यांनी स्फोटक रसायनात आणि ती भारतात कोणच्या जागी मिळतील ह्यात किती रस होता हे कळते.

"प्रागजी सूरजी आणि कंपनी, काझी सय्यद स्ट्रीट, मुंबई- अनिलाईन, अलिझराइन, डाइज, गंधक, डायरेक्ट आणि ॲसिड रंग, व्हिक्टोरिया कमर्शिअल एजन्सी, डाक्का, बंगाल. २०० रु. व्ही. पी. पी. ने. २२ ग्रोस पुरविले. २२ डझन रु. २ ला पुरविले (जातील) - जर दोन आण्याची तिकिटे प्रथम पाठवली तर.

जवळच्याच एका पानावर दुसरी एक नोंद अशी आहे. "एका हेराच्या आठवणी. गुप्त

हेर खात्यात २५ वर्षे." प्रकाशक हाइनमान, लंडन. किं. २ शिलींग ६ पेन्स.

ह्या नोंदीचा अर्थ उघड आहे.

"हिंदू राष्ट्रीय नारा (येल) ह्या शीर्षकाखाली खालील नारा सुचविला आहे.

हिन्दु, हिन्दु हिन्दुस्थान (३ वेळा)
हिन्दुस्थान (हळू) अलिशान
पथे है निशान,
शान, शान, शान.
तेरी हिन्दुस्थान.

नारा किंवा येल हे एक खेळांच्या वेळी आपल्या संघाला उत्तेजन देण्यासाठी मारलेले आरोळीवजा ओरडणे. अशा तऱ्हेचे विशिष्ट संघाचे महाविद्यालयीन नारे पाश्चिमात्य देशात लोकप्रिय आहेत. भारतीयांना एकतेची व उत्तेजनाची जाणीव देण्यासाठी हिन्दू (भारतीय) राष्ट्रीय नारे असणे चांगले असे अय्यरंना वाटले असावे. वहीच्या दुसऱ्या एका पानावर अय्यर एक इंग्रजी कविता लिहितात. "वंदेमातरम्" ह्या नावाची ८ श्लोकांची ही कविता असून तीतील पहिला तिसरा आणि सहावा श्लोक येथे दिला आहे.

वन्दे मातरम् ।

(१) उज्ज्वल परंपरेची दीप्ती
पवित्र भूमी कीर्तिमती
भारतमाते नामेनमः ।
पुत्रा शि कवी तव मोल माउली
तू संत महात्म्यांची जननी
विश्वाला तू प्राण असशी
हृदय तुला मम अर्पियले ।।

(३) नेवोत पदमम चहू दिशांना
प्रेमदसदन परि तू माझे
मातृभूमि प्रियतू मजला
मायामय तब वारे सगळे ।
दिव्य आगळे सुंदर सारे
मोहविती मज सदा अनावर
मातृभूमी प्रिय तू मजला ।।

(६) कुणी आपल्या वेगळ्या
देवेदेवता आणू दे
कुणी आपल्या धर्मजातिचे
गीत वेगळे गाऊ दे

विशाल हृदयी तुझ्या तयांना
स्थान सुरक्षित लाभू दे
तुझी थोरवी मानिवी त्यांना
मिठीत वत्सल विसावु दे
मानववंशाची जननी तू
तव गौरव गाथा गाजू दे ।।

अय्यर ह्यांच्या लंडन टिपण वहीवरील उताऱ्यांवरून अशी समजूत होऊ नये की ते सर्ववेळ उदासीन आणि गंभीर प्रवृत्तीचे गहस्थ होते. ते चांगले आनंदी असून कोणाही इतर माणसाइतकेच त्यांनाही विनोद करणे आवडे. टिपणवहीत कांही विनोदी पुस्तकांच्या नावाचीही नोंद आहे. शिवाय अय्यर ह्यांनी काही विनोदी कथाही लिहिल्या आहेत. तमिळमधील काही विनोदी कथांचे भाषांतर करण्याची त्यांची इच्छा असावी म्हणून त्यांनी खालील तमिळ किस्सा इंग्रजी काव्यात आणला आहे.

कृपणाचे स्वप्न

तुम्ही माझ्या झाडावर का चढला राव ?
माझे चुकले वासरू शोधायला.
चुकले वासरू तिथे कसे सापडेल ?
म्हणून तर आता खाली उतरतो !

तमिळनाडूमध्ये एक जुनी कथा आहे. तिचे हे रूपांतर आहे. ह्या कथेत एका चोराला नारळीच्या झाडावर चढलेला असतांना पकडले. तू झाडावर का चढलास ? असे विचारले असता तो म्हणाला, 'गवत शोधायला.' 'मूर्खा, गवत काय नारळाच्या झाडावर उगवते काय ?' चोर म्हणाला, ' म्हणून तर मी खाली उतरतो, आहे !''

# १८५७ चा सुवर्ण महोत्सव

कांही इंग्रज लोकांनी १९०७ साली असे ठरविले की १८५७ च्या बंडखोरांवरील आपला विजय भारतात साजरा करावयचा. ब्रिटिश वर्तमानपत्रांनी ह्या संबंधी विशेषांक प्रसिध्द करण्याची जणू स्पर्धाच केली. ह्या अंकातून खास लेख लिहवून घेऊन त्यात १८५७ च्या वीरांना आत्मकेन्द्री, खुनी, लुटारू म्हणून त्यांना शिवीगाळ करून त्यांच्याबद्दल निंदास्पद उल्लेख केले होते. सहाजिकच इंडिया हाऊस चमूला ह्या गोष्टी आव्हानाशिवाय जाऊ देणे अशक्य होते.

इंग्रज उत्सवकारांनी लंडन येथे एक नाटक केले. त्यात नानासाहेब पेशवे आणि राणी लक्ष्मीबाई ह्यांची रानटी आणि विरूप खलपात्रे दाखविली होती. इंडिया हाऊसने ह्या विकृत चित्रांची दुरुस्ती करण्यासाठी आपणही १८५७ च्या वीरांचा सुवर्ण महोत्सव करण्याचे ठरविले. १० मे १९०७ ला इंडिया हाऊसमध्ये एक प्रचंड संस्मरणीय सभा भरविण्यात आली. उपास केले गेले आणि त्यागाचा एक आठवडा पाळावयाचा असे ठरविण्यात आले. 'हे हुतात्म्यांनो' ह्या नावाची एक पुस्तिका काढण्यात आली आणि तिचा खूप मोठ्या प्रमाणात प्रचार झाला. ऑक्सफर्ड आणि केंब्रिजचे तसेच इन्स ऑफ कोर्टस्‌चे भारतीय विद्यार्थी छातीवर '१८५७ च्या हुतात्म्यांच्या स्मरणार्थ' अशी पदके लावून वावरले. स्वतःचा संबंध ह्या कार्यकर्त्यांशी नाही असे लंडनमधील भारतीय पुढाऱ्यांनी घाईघाईने प्रकट केले. रेल्वे गाड्यांमध्ये आणि रस्त्यांवर आक्रमक इंग्रज आणि पदकधारी भारतीय विद्यार्थी ह्यांच्या मारामाऱ्या झाल्या. हरनामसिंग आणि आर्. एम्. खान ह्या दोन भारतीय विद्यार्थ्यांची महाविद्यालयातून हकालपट्टी करण्यात आली. इतर कांहींच्या शिष्यवृत्या काढून घेण्यात आल्या आणि त्यांना घरी परत यावे लागले.

श्यामजी कृष्ण वर्मा, वि. दा. सावरकर आणि त्यांच्या सहकाऱ्यांविरुध्द विषारी प्रचार सुरु झाला. "टाइम्स" आणि "जॉन बुल" ह्या वर्तमानपत्रांनी आपले प्रतिनिधी सावरकरांना भेटण्यास पाठविले. वृत्तपत्रकारांना उघडउघड आश्चर्य वाटले. आपल्याला

एक मध्यम वयीन बदमाष बघायला मिळेल अशी त्यांची अपेक्षा होती त्या ऐवजी एक सुशिक्षित रीतरिवाज अंगी मुरलेला तरुण त्यांना भेटला. तरी सुध्दा दोन्ही वर्तमानपत्रात हल्ले चालूच होते. फक्त 'मॅचेंस्टर गार्डियन'' आणि ''डेली न्यूज'' अधिक सौजन्याने वागत होते. पण त्यांनाही सावरकरांची मते मान्य नव्हती.

१८५७ च्या वादंगाने जे रण माजले त्यामुळे इंग्रज गुप्तहेर खात्याचे लक्ष इंडिया हाऊस आणि तेथील तरुणांकडे लागले. व.वे. सु. अय्यर लंडनला ऑक्टोबर १९०७ मध्ये पोचण्याच्या थोड्या आधी ही परिस्थिती होती. परंतु १९०८ च्या सुरुवातीला वातावरण लक्षात येण्याइतके तापले. सेनापती बापट, हेमचन्द्र दास व होतीलाल वर्मा बॉम्ब पुस्तिकेच्या प्रती घेऊन भारताला पोचले आणि त्यांनी महाराष्ट्र व बंगालमधील क्रांतिकारक पुढाऱ्यांना त्या वाटल्या. त्या कृतीचा पहिला परिणाम म्हणजे बंगालमधील मुझफ्फपूर येथे ३० एप्रिल १९०८ रोजी खुदिराम बोस ह्या जेमतेम १९ वर्षाच्या तरुणाने एक बॉम्ब फेकला. त्याचे लक्ष्य जिल्हा न्यायाधीश किंग्जफर्ड हे होते. परंतु त्यांच्या ऐवजी दोन दुर्दैवी इंग्रजी स्त्रियांना मृत्यू आला. खुदिराम आणि त्याचे साथी पकडण्यात आले. त्यांच्यापैकी एकाने, म्हणजे प्रफुल्ल चक्रवर्ती ह्याने स्वतःला पोलिसठाण्यात गोळी मारून घेऊन आत्महत्या केली आणि खुदिरामला फाशी देण्यात आले.

पोलिसांनी ज्यांना अटक केली त्यात बाबू अरविन्द घोष होते. ह्या प्रकरणामागील योजना त्यांच्या डोक्यात निघाली असा संशय होता. त्यांचे धाकटे बंधू बारिंद्रकुमार घोष हेही त्या अत्याचारी तुकडीमध्ये कार्यरत होते. माणिक तोळा (अलिपूर) बॉम्ब खटला ज्याला अलिपूर खटला असेही म्हणतात - तो चालू झाला आणि खुदिरामच्या दोन साथीदारांना फासावर लटकविण्यात आले. व्हाइसरॉय लॉर्ड मिंटो ह्यांनी गुन्हेगारी दुरुस्ती कायदा जाहीर केला. लोकमान्य टिळकांना ब्रह्मदेशामधील मंडाले येथे काळ्या पाण्यावर पाठविण्यात आले आणि 'काळ'चे संपादक शिवरामपंत परांजपे ह्यांना एकोणीस महिन्यांची शिक्षा देण्यात आली. अलिपूर खटल्यातील माफीच्या साक्षीदारांनी सेनापती बापटांचे आणि बंगाली क्रांतिकारकांचे संबंध जाहीर केले. बापट स्वतः होऊन अज्ञातवासात गेले परंतु ह्या रहस्यस्फोटाने सावरकरांवर दाट संशय धरला गेला आणि आपण ह्यांना कसे का होईना पण तुरुंगात डांबू शकू अशी अशा ब्रिटिश पोलिसांना वाटू लागली. सावरकरांचे प्रमुख साह्यकारी अय्यर ह्यांच्या भोवतीही आता संशय पटल जमा झाले.

नेमस्त पुढारी गोखले हे ह्यावेळी मोर्लेमिंटो सुधारणांच्या संदर्भात लंडनला होते. भूतपूर्व आय्. सी. एस्. इतिहासकार, अभ्यासक आणि राजकारणी रमेशचनद्र दत्त हेही लंडनला आले होते. सावरकर, अय्यर आणि डॉ. राजन्, गोखले आणि दत्त ह्यांना जाऊन भेटले. त्यांनी गोखल्यांना विनंती केली की त्यांनी टिळकांच्या काळ्या पाण्याच्या शिक्षेच्या निषेधसभेचे अध्यक्षपद स्वीकारावे. गोखल्यांनी ह्याला नकार दिला. ह्या तरुणांनी नंतर

कांही इतर गोष्टींची चर्चा केली आणि मग १८५७ च्या घडामोडींबद्दल बोलणे निघाले. १८५७ चा इतिहास भारतीय राष्ट्रीय दृष्टिकोनातून पुन्हा लिहिणे जरूर आहे असा आग्रह सावरकरांनी धरला. गोखल्यांना हे अमान्य होते. पण इतिहासकार दत्त ह्यांनी ह्या कल्पनेचे मनापासून स्वागत केले.

गोखल्यांनी अध्यक्षपद स्वीकारण्याचे नाकारले तरी कॅक्स्टन हॉल येथे टिळकांची अटक व हद्दपारी ह्या विरुध्द निषेधसभा झाली.

ह्याचा एक अधिक भरीव परिणाम म्हणजे सावरकरांना १८५७ चा राष्ट्रीय इतिहास लिहिण्याची मिळालेली प्रेरणा. ह्या आधीच काही काळ ते १८५७ वर एक मराठी पुस्तक लिहिण्यात मग्न होते. आता त्यांचा उत्साह दुणावला आणि पुस्तक पुरे करण्याच्या ते मागे लागले. "आपल्या लोकात ज्वलंत ईर्षा निर्माण होऊन ते मातृभूमीच्या स्वातंत्र्यासाठी दुसरे व यशस्वी युध्द करतील," हा पुस्तकामागील हेतू होता. क्रांतिकारकांपुढे संघटनेची व कृतीच्या कार्यक्रमाची रूपरेषा ठेवून त्यांच्या करवी राष्ट्राला एका भावी मुक्ति लढ्यासाठी सिध्द करणे ही सुध्दा पुस्तकापासून अपेक्षा होती. सबंध भारतभर क्रांतिशास्त्राचा जाहीरपणे प्रचार करणे कदापी शक्य झाले नसते. किंवा अगदी अलिकडच्या भूतकाळात जे काही घडले त्यापासून कोणती कृती करता येईल ह्याबद्दल लोकांची खात्रीही पटवता आली असती.

सावरकरांचे मराठी पुस्तक गुप्तपणे भारतात पाठविण्यात आले. परंतु महाराष्ट्रातील प्रमुख मुद्रकांनी ते छापण्याचे धाडस केले नाही. अखेर शेवटी स्वतः मुद्रक असणारे अभिनव भारतचे एक सभासद पुढे आले परंतु पोलिसांना सुगावा लागला आणि त्यांनी छापखान्याची झडती घेतली. सुदैवाने आधीच सूचना मिळाल्यामुळे मुद्रकांनी सर्व मुद्रित मजकुर नष्ट केला आणि हस्तलिखित पुन्हा एकदा सावरकरांकडे लंडनला परत पाठवले गेले.

मग असा निर्णय घेण्यात आला की पुस्तकांचे इंग्रजी भाषांतर करावे आणि ते युरोपमध्ये प्रसिध्द करावे. व. वे. सु. अय्यर ह्यांच्याकडे हे काम सोपविण्यात आले. त्यांनी कायद्याचा अभ्यास करणाच्या आणि आय्. सी. एस्. ची तयारी करणाच्या एका गटाला एकत्र केले व त्यांच्याकडून प्राथमिक भाषांतर करवून घेऊन त्यातील इंग्रजीची कसून सुधारणा केली. ह्याचा अंतिम परिणाम म्हणजे पुऱ्या झालेल्या पुस्तकाची भाषा मुख्यतः अय्यर यांची होती. पुस्तकाला "१८५७ चे भारतीय स्वतंत्र युध्द" असे नावे देण्यात आले.

पुस्तकाच्या इंग्रजी आवृत्तीच्या मुद्रणातही अडचणी आल्या. मुद्रणासाठी पुस्तक जेव्हा फ्रान्सला पाठविण्यात आले तेव्हा ब्रिटिशांच्या दबावामुळे फ्रान्समधील कोणीही मुद्रक त्याचा स्वीकार करीनात. नंतर ते गुप्तपणे हॉलंडमध्ये पाठविण्यात आले. हॉलंड त्यावेळी मुद्रणाची राजधानी मानले जात असे. हे सारे करीत असता असा बनाव कायम ठेवला होता

की सावरकर अद्याप फ्रान्सला मुद्रकांच्या शोधात आहेत. शेवटी पुस्तकाचे मुद्रण झाले आणि त्याच्या शेकडो प्रती भारतात "पिकविक् पेपर्स," "डॉन क्विझोट" आणि "वॉल्टर स्कॉटच्या कादंबऱ्या ह्यासारखी निरागस नावे मलपृष्ठावर घालून भारतात पाठविण्यात आल्या. सार्वजनिक क्षेत्रातील अनेक लोक, राजकारणी महाविद्यालयीन ग्रंथालये आणि लष्करी छावण्यांशी ज्यांचा संबंध आहे अशा अभिनव भारतच्या अनेक सभासदांना पुस्तकांच्या प्रती मिळाल्या.

अशा तऱ्हेने हे पुस्तक भारतामध्ये गाजावाजा न करता वाटले गेल्यावर ते फ्रान्समध्ये उघडपणे प्रसृत केले गेले आणि इंग्रजी सांस्कृतिक जीवनातील प्रमुख व्यक्तींना त्याच्या प्रती मोफत पाठवण्यात आल्या. इंग्रज इतिहासतज्ञ तसेच आयर्लंड, फ्रान्स, रशिया, तुर्कस्तान आणि जर्मनीमधील क्रांतिकारी वर्तुळांना १८५७ च्या खऱ्या खुऱ्या घटनांची ओळख झाली.

नंतरच्या वर्षात इंग्रजी पुस्तकाच्या इतर आवृत्त्या निघाल्या आणि ते गदर पक्षाच्या शीख क्रांतिकारकांचे एक मार्गदर्शक बनले. ह्या क्रांतिकारकांनी कॅनडाला देशांतरासाठी जहाजातून जाण्याचा प्रयत्न केला परंतु त्यांना तेथे उतरण्यास बंदी करण्यात आली. पंजाबचे क्रांतिवीर भगतसिंग यांनी भारतात एक आवृत्ती प्रसिध्द केली. सुभास चंद्र बोस यांनी आपल्या इंडियन नॅशनल आर्मीच्या दिवसात त्या सैन्याच्या सैनिकांसाठी एक आवृत्ती करवून घेतली. तिची उर्दू, पंजाबी, हिंदी आणि तमिळमध्ये भाषांतरेही केली गेली.

अशा तऱ्हेने इंग्रजी आणि इतर भाषांतील आवृत्तींचा जोरदार प्रचार होत असता मूळ मराठी प्रत दीर्घ काळपर्यंत जवळजवळ हरवल्यासारखीच होती. सावरकरांना लंडन येथे १९१० मध्ये अटक झाल्यावर ही मूळ मराठी प्रत पॅरिसला मादाम कामाच्या हवाली करण्यात आली आणि त्यांनी ती सुरक्षितपणे बँक ऑफ पॅरिसच्या कडीकुलपात ठेवली. परंतु हिटलरच्या सैन्याने १९४० साली फ्रानसवर हल्ला केल्यावर हे हस्तलिखित चुकून कोठेतरी गेले आणि ते हरवले असे वाटू लागले. सुदैवाने १९६८ मध्ये पुन्हा शोध लागला.

मूळ इंग्रजी "प्रतीला सुध्दा वेगवेगळ्या अवस्थातून जावे लागले पुस्तकाची जुळणी करून ते मुद्रित केल्यावर त्याचे हस्तलिखित अभिनव भारतचे एक सभासद, पोर्तुगीज् भारतातील श्री. डी. व्ही. कुटिनो, ह्यांच्या ताब्यात देण्यात आले. लंडनचे वातावरण तापल्यावर कुटिनो यांनी हस्तलिखितासह पोर्तुगालला पलायन केले. शाल् एन् फेलिशिया, इस्टोरिल, पोतुगल येथे मित्रांकडे राहून कुटिनो यांनी अय्यरना मोठ्या आनंदाने मदत केली.

युरोपमध्ये निर्वासित अवस्थेतील भारतीय क्रांतिकारक म्हणून अडतीस वर्षे निरनिराळ्या दिव्यांना आणि प्रसंगाना तोंड देत कुटिनो यांनी हे हस्तलिखित सुरक्षित ठेवले आणि शेवटी त्यांनी ते सावरकरांना १९४७ मध्ये परत केले. तोपर्यंत त्यावरील बंदी उठविण्यात आली होती. अय्यर यांच्या सुधारणांच्या बारीक खुणा असलेले हे हस्तलिखित

सावरकरांच्या पुण्यामधील कागदपत्रात समाविष्ट केले गेले.

ब्रिटिश राजधानीत १९०८ चे शेवटचे कांही महिने भारताच्या दृष्टीने मोठे गडबडीचे गेले. लंडनमध्ये अनेक कार्ये चालू होती आणि विविध प्रवृत्तीच्या भारतीय पुढाऱ्यांची शहरात एकच गर्दी झाली होती. टिळकांचे मित्र खापर्डे आणि करंदीकर टिळकांच्या शिक्षेविरुध्द प्रीव्ही कौन्सिलमध्ये केलेल्या अपिलाच्या कामासंबंधी आले होते. तसेच व्ही.ओ. चिंदंबरम् पिळ्ळै ह्यांचे कायदेशीर सल्लागारही प्रिव्ही कौन्सिलमध्ये अपिलाची तयारी करण्यासाठी आले होते. चिदंबरमूना चाळीस वर्षांची दुहेरी जन्मठेपेची शिक्षा देण्यात आली होती. वरिष्ठ कोर्टात ती कमी करून सहा वर्षांची काळ्या पाण्याची करण्यात आली होती. लजपतराय आणि सरदार अजितसिंग ह्यांना बंगाल अधिनियमांप्रमाणे भारतातून हद्दपार केले होते. त्यापैकी लजपतराय लंडनमध्ये होते.

१९०८ हे वर्ष ब्रिटिश साम्राज्याने भारताला अंकित केल्यानंतरचे ५० वे वर्ष होते. इंग्रज बादशहा सातवे एडवर्ड ह्यांनी एक जाहिरनामा काढून ते साजरे केले. मोर्लेमिंटो सुधारणा त्यावेळी लागू होण्याच्या बेतात होत्या आणि सुधारणांची वाट मोकळी व्हावी म्हणून बादशहा अनेकांशी चर्चा करण्याची तयारी करीत होते. ब्रिटिश मंत्रिमंडळाशी विचारविनिमय करण्यासाठी सेक्रेटरी ऑफ स्टेट मोर्ले ह्यांनी गोखले ह्यांना बोलावले होते आणि नुकतेच तुरूंगातून सुटलेले जहाल पुढारी बिपिनचंद्र पाल हेही काही खाजगी कामासाठी लंडनला आले होते.

१९०५ ची बंगालची फाळणी हा अद्यापही एक ज्वलंत प्रश्न होता आणि नव्या सुधारणा ही दुर्दैवी फाळणी रद्द करतील अशी अपेक्षा होती. लंडनमध्येही ह्यासाठी आंदोलन चालू होते. १६ ऑक्टोबर १९०८ रोजी एक सभा भरवून एक फाळणीविरोधी दिन साजरा करण्यात आला. ह्या सभेचे अध्यक्षस्थान लाला लजपतराय ह्यांनी स्वीकारले आणि बिपिनचंद्र पाल, खापर्डे आणि करंदीकर ह्यांनी सभेत भाषणे केली.

त्याचदिवशी, त्याच दिवाणखान्यात दुसरी एक सभा इंडिया हाऊस चमूने भरवली. खापर्डे ह्यांनी अध्यक्षपद स्वीकारले आणि मादाम कामा ह्यांनी 'बहिष्कार' ह्या विषयावर भाषण केले. तुर्कस्तान प्रजासत्ताक झाल्याबद्दल ठराव अय्यर ह्यांनी भाषण करून मांडला आणि त्याला सर आगाखान ह्यांनी अनुमोदन दिले. जहालांच्या सभेतील आगाखानांचे अस्तित्व आश्चर्यकारक होते. भारताला पूर्ण स्वातंत्र्य मिळावे असा सभेतील मुख्य प्रस्ताव होता आणि आगामी सुधारणांबद्दल जबरदस्त शंका उपस्थित केल्या होत्या.

ह्या राष्ट्रीय परिषदेनंतर नऊ दिवसांनी इंडिया हाऊस चमूने दुसरी एक सभा घेतली. गुरू गोविंदसिंगांचा जन्म दिवस साजरा करणे, हा ह्या सभेचा हेतू होता. बिपिन पाल अध्यक्षस्थानी होते आणि लजपतराय आणि सावरकर ह्यांनी भाषणे करून गुरू गोविंदसिंगांनी परकीय अधिसत्तेशी जो लढा दिला त्याचा संदर्भ देऊन तरुण भारतीयांनी त्यांचे अनुकरण करावे असा सल्ला दिला.

आपल्या देशात लोकशाही शासन आले ते हिंसक मार्गानेच ह्याचा ब्रिटिश वृत्तपत्रांना विसर पडला आणि त्यांनी इंडिया हाऊसच्या तरुणांबद्दल शत्रुत्वाची भावना धरली. ''जहालांना चिरडा' हा कांही साम्राज्यवादी वृत्तपत्रात नारा प्रकटला.

शासनाने अधिकृतपणे आयोजित केलेल्या एका सभेत घडलेल्या एका प्रसंगाने आगीत तेल ओतले गेले. ह्या सभेत भारतीय संस्थानिकांचे एक कर्दनकाळ सर ली वॉर्नर ह्यांनी भारतीय पुढारी कुंजविहारी भट्टाचार्य याच्याबद्दल 'घाणेरडा निग्रो' (डर्टि निगर) असा उल्लेख केला. काही काळ 'युगांतर' या क्रांतिकारी पत्राचे संपादक असलेले वासुदेव भट्टाचार्य तात्काळ उठले आणि त्यांनी ली वॉर्नरच्या तोंडावर एक गुद्दा मारला. या प्रसंगाने मोठीच खळबळ माजली. वासुदेवांना साधारण २० रूपये भरतील [illegible]का दंड देण्यात आला. वासुदेव यांचा संबंध असल्यामुळे लंडन हाऊसबद्दल शहरात मोठा बोलबाला झाला. 'लंडन टाईम्स' सारख्या सौम्य प्रकृती वर्तमान पत्राने सुध्दा सरकारने शिक्षणावर फार काळजीपूर्वक नियंत्रण ठेवावे व भारतात शिक्षक आपण कोणाला पाठवतो हे डोळ्यात तेल घालून पाहावे असा सल्ला दिल्ला - ''स्टॅण्डर्ड'' या दुसऱ्या वृत्तपत्राने म्हटले, ''आपल्या विद्यापीठात शिकणारे आणि कायद्याचा अभ्यास करणारे अत्यंत बुध्दिमान विद्यार्थी भारतातील तरुण पिढीला सशस्त्र उठाव करण्याबद्दल प्रेरणा देत आहेत. यात शंका नाही''.

स्कॉटलंड यार्ड ने इंडिया हाऊसवरील आपला पहारा अधिक तीव्र केला. ह्या तरुणाचा केवळ पिच्छा पुरवल्याने काही साधन नाही असे पाहून इंडिया हाऊस मध्ये आपला एक मनुष्य गुप्तपणे पेरण्याचे स्कॉटलंड यार्डने ठरविले. यापैकी पहिला माणूस कीर्तिकर या नावाचा महाराष्ट्रीय होता. त्याने सावरकरांचा विश्वास हळूहळू संपादन केला आणि जवळजवळ सर्व गुप्त गोष्टी स्कॉटलंड यार्डला पुरविण्यास सुरवात केली.

कीर्तिकरची निवड तो मराठी असल्यामुळे सावरकरांचा विश्वास संपादन करील या कारणाने झाली होती. मुंबई वरिष्ठ न्यायालयात तो भाषांतराचे काम करीत असे आणि त्याला चार पाच भारतीय भाषा अवगत होत्या. आपला हा गुण त्याने इंडिया हाऊसच्या चर्चेच्या वेळी वापरावा अशी अपेक्षा होती कारण हा गुण असलेली दुसरी कोणीही व्यक्ती ब्रिटिश गुप्त पोलिसात नव्हती. १९०९ च्या उन्हाळ्यात कुठलाही गाजावाजा न करता कीर्तीकर इंडिया हाऊसमध्ये आला. त्याचे आगमन बाडबिस्तारा घेऊन झाले आणि त्याने सावरकरांशी मराठीत बोलायला सुरवात केली. त्याच्याजवळ ओळखपत्र नव्हते पण आपण एका महाराष्ट्रीय खानदानी कुटुंबातले असून लंडनमध्ये दंतवैद्यकीय शिकण्यास आलो आहोत असे त्यांने सांगितले. खरी गोष्ट अशी होती की भारतातील अधिकाऱ्यांनी त्याला एक वर्षाची रजा दिली होती आणि आपण इंग्लंडमध्ये एक वर्षासाठी दंतशल्यचिकित्सा शिकण्यासाठी आलो आहोत, अशी त्याने बतावणी करावी असा त्याला सल्ला देण्यात आला होता. सावरकरांशी बोलून कीर्तीकरने इंडिया हाऊसमध्ये कायमचा निवासी म्हणून

प्रवेश करून घेतला. दुसऱ्या दिवशी लंडनमधील एका इस्पितळात त्याने दंतचिकित्सा अभ्यासासाठी नाव नोंदविले.

कीर्तिकरासंबंधी आठवण सांगताना डॉ. टी.एस्. राजन् म्हणाले की कीर्तिकराची कुठल्याही प्रकारे मनावर छाप पडत नसे. राजन् याच्याबरोबर न्याहारी करून तो त्याच्या बरोबरच बाहेर पडे आणि प्रत्येकजण आपआपल्या इस्पितळात जात असे. पण जसजसे दिवस गेले तसतसा कीर्तीकर अंथरूणात लोळत पडू लागला, न्याहरीला उशीर करू लागला आणि इस्पितळातील आपली उपस्थितीही चुकवू लागला. हे जणू काही थोडे आहे म्हणूनच की काय तो संध्याकाळी गैरहजर राहून रात्रीही उशिरा येऊ लागला. इंडिया हाऊसच्या इंग्रज मोलकरणीचा विश्वास संपादन करण्यासही त्याने सुरुवात केली !

कीर्तिकराला या मुलीविषयी जे आर्कषण वाटत होते ते कधीच कमी झाले नाही. त्याने इंडिया हाऊसजवळ एक खोली घेऊन तेथे तिला स्वखर्चाने ठेवून दिले. स्वतः तो हाऊसमध्ये राहत असे आणि आता हाऊसच्या कार्यक्रमात तो अधिकाधिक भाग घेऊ लागला. तो भारत स्वतंत्र समिती (फ्री इंडिया सोसायटी) चा सभासद झाला. कांहीवेळेस तो भाषणे करी आणि स्वतःच्या शुल्का व्यतिरिक्त एक पौंडाची देणगीही देत असे.

कांही महिने गेली डॉ.राजनूनी एकदा सहज लंडन इस्पितळात कीर्तिकर बद्दल चौकशी केली, त्यांना धक्काच बसला. त्यांना असे कळले की, नाव दाखल केल्यानंतर कीर्तिकर फक्त पहिल्या आठवड्यातच इस्पितळात आला आणि नंतर आलाच नाही. हे सर्व गूढ होते आणि ते राजनूनी अय्यरना सांगितले. कीर्तिकर अभ्यासासाठी आला नव्हता हे आता उघड दिसत होते. अधिक तपास केल्यावर असे दिसले की स्कॉटलंड यार्ड इतरांचा पिच्छा काळजीपूर्वक पुरवित होते, पण कीर्तिकरच्या मागे मात्र जात नव्हते.

एक दिवस आपल्या इंग्रज मैत्रिणीसह कीर्तिकर एका नाटकाला गेला या संधीचा फायदा घेऊन अय्यरने एक बनावट किल्ली लावून त्याचे दार उघडले आणि कसोशीने तपास केला. कीर्तिकरच्या पेटीत एक अहवाल सापडला. तो कीर्तिकरने ब्रिटिश पोलिसांना पाठवण्यासाठी तयार केला होता, हे उघड होते. अहवालात त्या आठवड्यातील इंडिया हाऊसमधील बैठकीबद्दल संपूर्ण माहिती होती. अय्यरने अहवाल आपल्या ताब्यात घेतला आणि खोलीला कुलूप लावले. राजन आणि सावरकर यांना त्यांनी अहवाल दाखवला. कीर्तिकर हा पोलिस हेर असून त्याला इंडिया हाऊसच्या गुप्त गोष्टीचा सुगावा घेण्यासाठी आणि स्कॉटलंड यार्डला कळविण्यासाठी पेरले होते हे आता स्पष्ट झाले. सावरकर, अय्यर वगैरे मंडळींनी आपण त्याच्याबद्दल काय करावे याची चर्चा केली. त्याची तडकाफडकी विल्हेवाट लावण्यापासून तो त्याला फक्त हाकून देण्यापर्यंत अनेक उपयांचा विचार करण्यात आला. कीर्तिकरची हाकलपट्टी केली असती, तरी स्कॉटलंड यार्डने त्याच्या जागी दुसरा माणूस नक्कीच योजला असता आणि त्याला ओळखून काढण्यास खूप वेळ लागला असता. म्हणून कीर्तिकरला इंडिया हाऊसमध्ये तसेच राहू द्यायचे, त्याचे

अहवालही स्कॉटलंड यार्डला जाऊ द्यायचे परंतु ते पाठविण्यापूर्वी त्याने ते तपासणीसाठी, संमतीसाठी किंवा फेरफार करण्यासाठी अय्यर यांच्याकडे द्यावेत असे ठरले.

त्या रात्री कीर्तिकर इंडिया हाऊसमध्ये आल्यावर खिशात भरलेले पिस्तूल ठेवून अय्यर त्याच्या खोलीत शिरले. संध्याकाळच्या नाटकाबद्दल काही त्रोटक प्रश्न विचारून अय्यरनी संभाषणाला सुरुवात केली आणि नंतर ते कीर्तिकरच्या लंडनमधील कामाकडे वळले. कीर्तिकरने आपली बतावणी चालूच ठेवली पण अय्यरने आपल्याला त्याच्याबद्दल सर्व खरीखुरी माहिती कळली आहे असे एकदम सांगून खबऱ्याच्या जीवनासंबंधी तिरस्काराने उद्‌गार काढले. तरीही कीर्तिकरने आपले ढोंग चालूच ठेवले आणि पोलिसांचा आपल्याशी संबंध असल्याचा इन्कार केला. खबऱ्या होण्याइतके आपल्याला धैर्यच नाही असेही त्याने सांगितले !

अय्यरनी दाराला कडी लावली. खिशातून पिस्तूल काढले आणि कीर्तिकरवर रोखून ते म्हणाले, '' हे साधे पिस्तुल नाही एकदा भरले की त्यात सात गोळ्या भरल्या जातात आणि त्यात पुरेशी ताकदही आहे. तू खरे सांगितले नाहीस तर तुझा निकाल लावण्यासाठी मी आलो आहेत. खरे बोललास तर मी तुला कुठलीही इजा करणार नाही.

हे सर्व होत असता डॉक्टर राजन् कडी लावलेल्या दाराबाहेर उभे राहिले होते आणि आकस्मिक काही घडले तर त्याच्या तयारीत होते.

अय्यरनी कीर्तिकरचा अहवाल स्वतःच्या खिशातून बाहेर काढला आणि म्हटले, ''हे तुझे अक्षर आहे हे मला माहीत आहे. पोलिसांना पाठविण्यासाठी हे तू तयार केले आहेस. तुझी पेटी उघडून मी हे काढून घेतले आहे. आता तुझे म्हणणे काय आहे ? तू स्वतःची बतावणी चालूच ठेवशील तर येथे अगदी ताबडतोब माझ्या हाताने तुझा शेवट ओढवेल, हे तु नक्की समज.'' आपण पेचात सापडलो आहोत हे कीर्तिकरने ओळखले. त्याने अय्यर यांचे पाय धरले आणि जीवितयाचना केली. अय्यरने त्याला वाचवण्याची तयारी दर्शविली पण ती एका अटीवर. कीर्तिकरने आतासारखे इंडिया हाऊसमध्येच राहवयाचे. पोलिसांकडे अहवालही पाठवावयाचे. परंतु प्रत्येक अहवाल पाठविण्यापूर्वी तो आपल्याला दाखवायचा म्हणजे आपणाला त्याची योग्य ती तपासणी करता येईल.याशिवाय लंडनमध्ये असेपर्यंत प्रत्येक महिन्याला कीर्तिकरने फ्री इंडिया सोसायटीला दोन पौंडाची देणगी द्यायची.

कीर्तिकर पुढे प्रश्न पडला. आपण कबूल झालो नाही, तर आपले आयुष्य धोक्यात येऊ शकेल आणि आपण अहवाल पाठवले नाहीत तर आपण लंडनसारख्या दूर ठिकाणी निराधारपणे लटकत राहू. एव्हढेच नव्हे तर ब्रिटिश पोलिस अधिकाऱ्यांशी आणि इतरांशी अहवाल पाठवण्याची बतावणी करीत राहाणे हाच अडचणीतून बाहेर पडण्याचा एक मार्ग आहे हेही त्याला स्पष्ट दिसले.

कीर्तिकर त्यानंतर इंडिया हाऊसमध्ये कित्येक महिने राहिला आणि त्याने ठरावातील सर्व अटी कसोशीने पाळल्या.

कीर्तिकर प्रकरणानंतर एक दिवस दुसरा एक तरुण आधी कुठलीही सूचना न देता अवतरला. त्यानेही बरोबर आपले सर्व सामान, एक पेटी आणि एक बिछाना आणले होते. तो रोड आणि खप्पड दिसत होता. चेहऱ्यावर बुध्दिमत्तेचे तेज होते आणि त्याची नजर तीक्ष्ण होती. तो सुमारे वीस वर्षांचा असावा. आपण तमिळी असून मद्रास शहरातील ट्रिपलिकीन भागात राहतो, आपल्याला कुठलेही निश्चित उत्पन्न नाही आणि नोकरीची गरज आहे असेही त्याने सांगितले. आपण 'इंडिया' ह्या तमिळ साप्ताहिकाचे व्यवस्थापक म्हणून मद्रास व पाँडिचरी येथे काम करीत होतो, वर्तमानपत्रांतून आपल्या इंडिया हाऊसच्या देशभक्तांबद्दल कळले असेही त्याने सांगितले. त्यांना येऊन मिळण्याची आपली इच्छाही त्याने प्रकट केली.

तिरुमलाचारी खराखुरा पाहुणा होता की दुसरा पोलिस हेरच होता ? डॉ. राजन् आणि अय्यर ह्यांना काळजी घेणे भाग होते. त्याने स्वतःबद्दल जे सांगितले होते ते खरेच होते. पण डॉ. राजन् आणि अय्यर ह्यांना त्याची माहिती नव्हती. 'इंडिया' साप्ताहिकाचा पाँडिचरीला चांगला जम बसल्यावर एस्. एम्. तिरुमलाचारी आणि श्रीनिवासाचारी ह्यांनी नियतकालिकांचे संपादक कवी भारती ह्यांच्यासह लंडनला भेट देण्याचा बेत केला होता. 'इंडिया' साप्ताहिकाच्या संपादकत्वाची धुरा ते एम्. पी. तिरुमलाचारीकडे संपर्णपणे सोपवणार होते. एम्. पी. ला वाटले की आपण ह्यातून वगळले जाणार आणि त्यामुळे त्याच्या मनाला दुःख झाले. इतरांनी आपले बेत नक्की करण्याआधीच त्याने आपल्या जागेचा राजीनामा दिला आणि जेवढा पैसा वाचवता येईल तेवढा गोळा करून सर्वात अधी जे जहाज मिळाले त्यात बसून त्याने लंडनला प्रयाण केले. श्यामजी कृष्ण वर्मा ह्यांच्या औदार्याबद्दल त्याने वाचले होते. श्यामजींनी भारतीय देशभक्तांना सहाय्य करण्याबद्दल मोठा निधी निर्माण केला असून आपण लंडनमध्ये गेल्यावर आपल्यालाही त्यातून सहाय्य मिळेल असे त्याला वाटले.

एम्. पी. तिरुमलाचारीच्या अनपेक्षित गमनामुळे भारतींचे आणि इतरांचे बेत गडगडले. त्यांनी इंग्लंडची किंवा युरोपची फेरी कधीच केली नाही. एम्. पी. तिरुमपलाचारी ह्याने डॉ. राजन्ना सांगितले की आपण कोणतेही काम करण्यास तयार आहो- अगदी स्वयंपाक करण्यापासून तो घरकाम करण्यापर्यंत. आपल्याला अपेक्षा आहे ती फक्त जेवण व राहायला जागा मिळावी ह्याची. स्वयंपाक आणि बाजारहाट, इमारतीची देखरेख व व्यवस्था ह्यांसारखी कामे करण्यासाठी इंडिया हाऊसमध्ये एका माणसाची गरज होतीच. तेव्हा काळजीपूर्वक लक्ष ठेवून त्याची परीक्षा घेण्याचे ठरविले. जरी समजा तो दुसरा पोलिस हेर निघाला, तरी त्याला आपल्या दृष्टिपथात ठेवणे अधिक सोयीचे असा त्यांनी विचार केला.

दोन महिने उमेदवारी केल्यावर तिरुमलाचारी खराखुरा निःस्वार्थी आणि पुरोगामी देशभक्त हे स्पष्ट झाले. त्याने सांगितल्यापेक्षाही अधिक कामे केली. स्वैपाकघरात मदत, बाजारहाट आणि व्यवस्था ह्या कामांशिवाय त्याने फ्री इंडिया सोसायटीच्या कार्यासही

हातभार लावला. इंडिया हाऊसला त्याची मोठीच मदत झाली. त्याचा निर्वाह मात्र इंडिया हाऊस मधील सात कायम निवासियांच्या वर्गणीतून भागवावा लागत असल्याने कांहीतरी दुसरी सोय करणे अवश्य होते. अय्यरना लौकरच दुसरा मार्ग सापडला.

ब्रिटिश अधिकारी कीर्तिकरावर खूप पैसे खर्च करायला तयार होते. ह्यावरून इंडिया हाऊस बद्दल अधिक माहिती मिळविण्यासाठी कितीही खर्च करण्यास ते मागेपुढे पहाणार नव्हते हे उघड होते. कीर्तिकरच्या अहवालाला पुष्टी देणारा अहवाल दुसऱ्या कुठल्या तरी मार्गाने मिळविण्याचाही त्यांना प्रयत्न करावयाचा होता, कारण कीर्तिकरावर किती विश्वास ठेवावा हेही त्यांना ठरवायचे होते. असा विचार करून अय्यर ह्यांनी तिरुमलाचारीने स्कॉटलंट यार्डच्या अधिकाऱ्यांना भेटावे आणि आपण त्यांना सहाय्य करण्यास तयार आहोत असे सांगावे असे ठरवले. चाणाक्ष तिरुमलाचारीने स्कॉटलंडमधील वरिष्ठांची गाठ घेऊन, आपण इंडिया हाऊसमध्ये काय काय चालते हे कळविण्यास तयार आहोत, आपण एक गरीब स्वयंपाकी असून आपल्याला उत्पन्नाचे दुसरे काही साधन नाही म्हणून आपल्याला महिना ५ पौंड मिळावेत अशीही अपेक्षा व्यक्त केली. आपली माहिती उपयुक्त वाटली तर दुप्पट पगार मिळावा असेही त्याने सांगितले.

स्कॉटलंड यार्ड ह्या जाळ्यात अडकले. आठवड्यामागून आठवडे तिरुमलाचारी स्कॉटलंड यार्डच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांना भेटून अय्यर ह्यांनी त्यांना जे काही सांगावयाचे ठरविले ते सांगू लागला. कीर्तिकरला जे सांगण्याची अनुमती दिली जाई त्याला पुष्टी देणारे असेच हे निवेदन असे. आपण काहीतरी एक चांगली गोष्ट करतो, असे वाटावे म्हणून भारतीय वृत्तपत्रातील काही पत्रे आणि निरुपद्रवी कात्रणे कापून तिरुमलाचारी ती स्कॉटलंड यार्डच्या लोकांना देई.

कीर्तिकरचा अहवाल आणि तिरुमलाचारीची पत्रके आणि साधने ह्याबद्दलची सर्व प्राथमिक तयारी अय्यर करीत असत. सर्वांच्या दृष्टीने ही सारी व्यवस्था मोठी समाधानकारक होती. इंडिया हाऊसला पैसे मिळत आणि स्कॉटलंड यार्डला मोठ्यात मोठे समाधान की आपल्याला पूर्णपणे पुष्टी मिळालेली 'माहिती' मिळते आहे ! खोटे धागेदोरे तयार करणे ही अय्यर ह्यांची हातोटी होती. त्या जोरावर ते स्कॉटलंड यार्डला चकवून चुकीच्या मार्गावर नेण्यासाठी कीर्तिकरच्या अहवालात आणि तिरुमलाचारीच्या 'रहस्यस्फोटात' खूपसा मालमसाला भरीत असत. देशभक्तीने प्रेरित झालेला तिरुमलाचारी स्कॉटलंड यार्डकडून आपल्याला जे जे मिळाले ते सर्व इंडिया हाऊसला देई. त्यामुळे त्याच्या भोजन निवासाचा खर्च तर भागतच असे पण फ्री इंडिया सोसायटीला आपले ध्येय साधण्यासाठी काही जादा मदतही मिळत असे.

---

# मदनलाल धिंग्रा

दिवस वेगाने जात होते. इंडिया हाऊसमधील तरुणांना वाटू लागले की क्रांतिकारी म्हणून आपण जी भूमिका पत्करली आहे ती साठी आपण अधिक चांगली तयारी करायला हवी. एक दिवस डॉ. राजन् व. वे. सु. अय्यरना म्हणाले, ''आपण सतत आपल्या देशातील परकी सत्तेचा शेवट जरूर पडली तर सशस्त्र क्रान्तीच्या सहाय्याने सुध्दा करावा, असे बोलतो. आपण गनिमी काव्याच्या युध्दतंत्राबद्दलही बोलत असतो आणि दुसऱ्या देशातील स्वातंत्र्यवीरांची उदाहरणे देतो. आता दुसऱ्या आपणही काही व्यवहारी पाऊले उचलण्याची वेळ आलेली नाही का ?''

''उदारणार्थ ?'' अय्यरनी विचारले.

लष्करी शिक्षण. ''डॉ. राजन् म्हणाले'' आपण आधुनिक युध्दपध्दती आणि हत्यारे ह्यांची ओळख करून घेतली पाहिजे.''

अय्यरनी स्मित केले आणि विचार करून ते म्हणाले, ''आपण येथे इंग्लंडमध्ये असेपर्यंत शस्त्रांचा उपयोग कसा करायचा हे शिकणे आवश्यक आहे, याबद्दल मी सहमत आहे. युध्द करणे आणि हत्यारे वापरणे आपल्या देशात नवे नाही. परंतु आपले देशभक्तीचे आणि शसस्त्र क्रांतीचे झरे अपरिहार्य ऐतिहासिक अडचणीमुळे आटले आहेत. आपल्याकडे वीरवृत्तीचे बेडर आणि धारिष्टवान लोक होते. परंतु त्याच्यात एकीचा आणि देशभक्तीच्या भावनेचा अभाव होता. ती एकत्वाची आणि देशभक्तीच्या गाढ प्रेमाची भावना आपण लोकांच्या मनावर बिंबवली पाहिजे. परकीय सत्तेचा मुकाबला सशस्त्र क्रांतीने करण्यासाठी आपण आपल्या लोकांना लष्करी शिक्षण दिले पाहिजे. पण हे कसे करायचे ? नागरिकांना हत्यारांचे शिक्षण देण्यासाठी इंग्लंडमध्ये अनेक संस्था आहे पण आपण काळे असल्याने आपल्याला मात्र प्रवेश नकारला जातो. आपल्या इंग्लंड हाऊसच्या जवळ असलेल्या नेमबाजीच्या मैदानावर वर्गणीदार म्हणून नाव दाखल करण्याचा सावरकरांनी आणि मी प्रयत्न केला पण आम्हाला प्रवेश दिला गेला नाही, म्हणून मग

आम्ही जुगारी अड्ड्यांवर पिस्तुलाची नेमबाजी शिकलो. तेथे लक्ष्यावर नेम मारण्याला बक्षिसे आहेत. आमचा खर्च खूप झाला पण आपल्या गुलामीच्या बंधनांमुळे आपल्याला ही किंमत द्यावी लागत आहे.''

''मला प्रयत्न करू द्या''. डॉ. राजन् म्हणाले - ''जेथे तुम्हाला अपयश आले तेथे मी यशस्वी होऊ शकेल.'' दुसऱ्या दिवशी डॉ. राजन् नेमबाजीच्या मैदानात गेले. कांहीतरी करून त्यांनी प्रवेश शुल्क भरले आणि एकतासभर नेमबाजीचा सराव केला. या घटनेबद्दल त्यांनी रात्री प्रौढीही मारली. अय्यरनाही आनंद झाला.

पण तिसऱ्या दिवशी राजन्ना एक मनिऑर्डर मिळाली. तीत त्यांनी भरलेली प्रवेश फी एक दिवसाचे शुल्क कमी करून परत केली होती. आपल्याला सभासद म्हणून नोंदवून घेता येत नाही. कारण नम्रपणे आणि खेदपूर्वक सांगण्यात आले होते. कोठलीही कारणे दिली गेली नव्हती. भारतीय आणि विशेषतः इंडिया हाऊसशी संबंधित असलेले सर्व बहिष्कृत ठरले होते.

डॉ. राजन् क्रुध्द झाले थोडा विचार करून त्यांनी एक पर्यायी योजना आखली . लंडनला अनेक तंत्रशाळा होत्या. त्यापैकी एक लंडनच्या कौंटी कौन्सिलने चालविली होती आणि तिचा हेतू शहरातील गरीब लोकांना सर्व तऱ्हेचे तांत्रिक विषय शिकविणे हा होता. पाकक्रिया, केशकर्तन, कपडे धुणे हे तेथे शिकविण्यात येणारे काही विषय होते. नेमबाजीही तेथे शिकवली जाई. आपल्या प्रवेशाचा गाजावाजा होऊ नये, असे राजन्ना वाटत असल्यामुळे त्यांनी छायाचित्रणाच्या वर्गात नाव दाखल केले. शुल्क कमी होते आणि वर्ग संध्याकाळी सोयीच्या वेळी भरत असे. काही काळानंतर राजन् ह्यांनी छायचित्रणाचे विद्यार्थी म्हणून नेमबाजीच्या वर्गातही प्रवेश मिळविण्यासाठी अर्ज केला. आधीच संस्थेचे विद्यार्थी असल्यामुळे त्यांना कोठलीही हरकत घेण्यात आली नाही. लौकरच ते कॅमेऱ्यापेक्षा पिस्तूल वापरण्यात अधिक प्रवीण झाले.

परंतु पिस्तूल उडवण्याने युध्दे जिंकता येत नाहीत त्यासाठी प्राणघातक हत्यारे कशी चालवायची हे शिकावे लागते. कवायतीचा सराव करावा लागतो तसेच इतर शारीरिक प्रशिक्षणही घ्यावे लागते. ह्याशिवाय प्लॅटून, बटॅलियन, आर्मी आणि डिव्हिजन ह्या सैन्याच्या विभागांचा पुरेपूर अभ्यास करावा लागतो. ह्या विभागाचे संचलन, त्यांना होणारा पुरवठा, शस्त्रास्त्रे व इतर दळणवळण तसेच त्यांच्या दारूगोळ्याची शक्ती डावपेच आणि युध्दनीती ही सुध्दा आत्मसात करावी लागतात. प्रत्यक्ष युध्द कसे लढले जाते हे माहीत असल्याशिवाय भारताच्या मुक्तीची लढाई कशी खेळता आली असती ? युध्द कलेचे प्रत्यक्ष शिक्षण आपण मिळविले पाहिजे असा त्यांनी निश्चय केला.

१९०९ ला त्यांना एक संधी मिळाली. मोरोक्को येथील मूर लोक येथील स्पॅनिश सत्ताधाऱ्यांशी लढत होते. इंडिया हाऊसमधील तीन तरुणांना मोरोक्कोला पाठवायचे आणि त्यांनी स्पॅनिश किंवा मूर ह्यांच्यापैकी जे सैन्य आपणास लष्करी शिक्षण देण्यास

तयार होईल त्यात दाखल व्हायचे असे ठरले. पैसे जमविण्यात आले. आणि तीन तरुणांची प्रशिक्षणासाठी निवड करण्यात आली. हे तीन तरुण म्हणजे एम्. पी. टी. आचार्य, छोटा दत्त, (अलिपूर बॉम्ब खटल्यामधील उल्हासकर दत्त ह्यांचे बंधू) आणि अभिनव भारतचे एक मुसलमान सभासद खान. खूप खर्च करून त्यांच्यासाठी गणवेष शिवण्यात आले आणि त्यांना हार्दिक निरोप देण्यात आला.

आशादायी असे सात महिने निघून गेले. एका संध्याकाळी दोन 'सेनापती' परत आले. त्यांचा चेहरा मोहरा खिन्न दिसत होता. ते खप्पड आणि थकले भागलेले वाटत होते. त्यांना बंदूक उचलण्याचीही शक्ती नव्हती. त्यांचे गणवेष चुरगळेले आणि फाटलेलेही होते. त्यांनी एक दारुण कथा सांगितली. दोन्हीपैकी कोणताच पक्ष त्यांची सेवा पत्करण्यास तयार नव्हता कारण प्रत्येकाच्या मनात शंका अशी की हे शत्रूने पेरलेले हेर असावेत. मूर किंवा स्पॅनिश त्यांना साधे सैनिक म्हणूनही आपल्या सैन्यात भरती करून घ्यायला तयार नव्हते. ह्याचा परिणाम एकच झाला की सात महिने निघून गेले तीनशे पौंडाइतकी मोलाची रक्कम खर्च झाली शिवाय ह्या तीन स्वयंसेवकांना जे शारीरिक कष्ट झाले ते वेगळेच.

अशा तऱ्हेने इंडिया हाऊसमधील तरुण, भारतात लष्करी उठाव व्हावा म्हणून स्वतःची तयारी करण्यासाठी एका मागून एक गोष्टीचा पडताळा घेत होते. त्याचवेळी त्यांचा रहस्यभेद करण्याचे ब्रिटिश पोलिसांचे प्रयत्नही चालूच होते. १९०८ मध्ये लंडनमध्ये दोन भारतीय आले. सावरकरांना तुरुंगात डांबण्यास आणि अय्यरना विजनवासात पाठविण्यास ह्या दोघांचाही पोलिसांना मोठा उपयोग झाला.

ह्यापैकी एकाचे नाव होते रामराव. तो स्वच्छता पर्यवेक्षक (सॅनिटरी इन्स्पेक्टर) होता. तो रंगूनचा असून स्वतःच्या क्षेत्रातील उच्च शिक्षणासाठी आला होता. दुसरा हरिश्चंद्र गोरेगावकर ग्वाल्हेर संस्थानातून आला होता. त्याला स्थापत्यशास्त्राचा अभ्यास करण्यासाठी ३० पौंड महेनताना मिळत होता. डॉ. राजन् रामरावला रंगूनपासून ओळखत होते. गोरेगावकर मात्र अनोळखी होता. रामराव डॉ. राजनूना भेटला आणि त्यांनी त्याची अय्यर ह्यांच्याशी ओळख करून दिली. अय्यर ह्यांच्या स्फूर्तिदायक मैत्रीने रामराव देशभक्त बनला आणि तो इंडिया हाऊसच्या बैठकींना नियमितपणे उपस्थित राहू लागला. गोरेगावकर ही एक बुटकी, काळी २३ वर्षांची व्यक्ती होती. त्याचे डोळे चमकदार होते आणि त्यावर जाड भिंगांचा चष्मा असे. तो महाराष्ट्रीय होता. कीर्तिकराप्रमाणेच त्याने लौकरच सावरकरांशी जिव्हाळ्याचा संबंध जोडला. त्याचे बोलणे प्रभावी असे. शिवाजीचे चरित्र तो अशा तऱ्हेने सांगे की विद्यार्थ्यांच्या डोळ्यात अश्रू उभे राहात. सावरकरांशी त्याने दीर्घ काळ बोलणी केली आणि आपणास मिळणाऱ्या ३० पौंडापैकी बरीचशी रक्कम तो दरमहा इंडिया हाऊसला देऊ लागला.

ह्यावेळेस ब्रिटिश वृत्तपत्रे श्यामजी कृष्ण वर्मांवर टीकेचा भडीमार करीत होती. कारण

इंडिया हाऊसमागे प्रमुख सूत्रधार श्यामजीच आहेत असे त्यांना वाटे. टाइम्सपत्राने ह्यात पुढाकार घेतला आणि श्यामजींवर हल्ले करण्यास सुरुवात केली. जी राजकीय मते श्यामजी व्यक्त करीत ती इनरटेंपलच्या बॅरिस्टरला न शोभण्यासारखी आहेत असा प्रचार करून श्यामजींचे नाव बॅरिस्टरांच्या यादीतून रद्द करावे असे ह्या पत्राने सुचविले.

इनरटेंपलची कार्यकारिणी ३० एप्रिल १९०८ ला भरली आणि तिने एक ठराव संमत केला. श्यामजींचे लेख आक्षेपार्ह असून त्यांचे नाव आपल्या यादीतून काढून टाकण्याचा कार्यकारिणीने निर्णय घेतला. सर्व न्यायालयांना हा निर्णय कळविण्यात आला.

पंडित श्यामजी आपल्या निर्वाहासाठी वकिलीवर अवलंबून नव्हते. परंतु ह्यात एक तत्त्व गोवले होते. त्यांनी ''टाइम्स''ला एक लांबलचक पत्र लिहिले आणि म्हटले की हा निर्णय आरोप करणारे आणि आरोपी ह्या दोघांनाही आनंददायक असा आहे. परंतु त्याने मतस्वातंत्र्य आणि विचारस्वातंत्र्य ह्यावर घाला घातला जातो. आपल्या लिखाणातील कोणता भाग हरकत घेण्याजोगा आहे. हे कोणीही सांगितलेले नाही त्याअर्थी आपल्यावरील आरोप हे इंडिया हाऊस संबंधीच्या पूर्वग्रहाणी दूषित झालेले आहेत असे त्यांनी लिहिले.

''म्हणून माझी विनंती एकच आहे की, इंग्लंडला जर एखाद्या परकी आक्रमकाने जिंकून घेतले तर आपल्या स्वातंत्र्यासाठी बंड करणे हे जसे इंग्लंडचे कर्तव्य ठरेल त्याचप्रमाणे आपल्या स्वातंत्र्यासाठी उठाव करणे हे भारतीयांचेही कर्तव्य राहील अशी माझी अपेक्षा आहे. माझ्या ह्या मताला एडमंड बर्कसारख्या बॅरिस्टरांनीही पुस्ती दिलेली आहे.''

भारताला अंकित ठेवले आहे ते केवळ सैन्य बळावर. तसेच भारताचे अस्तित्व केवळ इंग्लंडच्या हितासाठीच आहे. आपले गुरु हर्बर्ट स्पेन्सर ह्यांचे मत श्यामजींनी उद्धृत केले. दुसरे एक बॅरिस्टर व पार्लमेंटचे सदस्य परलोकवासी रॉबर्ट वॉलेस ह्यांना असे धडधडीत म्हटले की जोपर्यंत भारतीय लोक इंग्रजांना घालवून देत नाहीत, तोपर्यंत त्यांच्याकडे सुसंस्कृत व्यक्ती म्हणूनही पाहिले जाणार नाही, हेही श्यामजींनी दाखवून दिले. दक्षिण आफ्रिकेतील बोअर बॅरिस्टरांनी बोअर युध्दाच्या वेळी बंडखोर बोअर लोकांना पूर्णतया पाठिंबा दिला असतांनासुध्दा त्यांची नावे बॅरिस्टरांच्या यादीतून काढून टाकली नव्हती ह्याकडेही श्यामजींनी लक्ष वेधले.

श्यामजींनी पुढे म्हटले, ''रोमन कवी होरेस ह्याने म्हटल्याप्रमाणे स्वदेशासाठी मरणे ही गोष्ट उदात्त आणि मधूर आहे. इनरटेंपलने माझ्याविरुध्द जे कृत्य केले आहे तो माझा मोठा गौरव आहे असे मी मानतो.''

इंडिया हाऊस ह्या भारतीय विद्यार्थ्यांच्या हितासाठी झटणाऱ्या व नफेखोरी न करणाऱ्या संस्थेचे लंडनमधून पॅरिसला स्थलान्तर करण्याचा विचारही करावा लागेल असेही त्यांनी सरतेशेवटी म्हटले.

वरील घटना १९०९ च्या मध्यावर घडून आलेल्या आणीबाणीची पार्श्वभूमी ठरते.

१ जुलै १९०९ ला लंडनला जणू विजेचा धक्का बसला. शहारच्या अगदी मध्यभागी एक धाडसी राजकीय हत्या घडून आली.

लेफ्ट. कर्नल सर कर्झन - वायली भारताचे सेक्रेटरी ऑफ स्टेट ह्यांना मदनलाल धिंग्रा ह्या तरुण भारतीय विद्यार्थ्याने गोळी मारून ठार केले. भारताच्या वैद्यकीय सेवेतील कै. कावस लाल काका ह्यांनी हल्लेखोराशी मुकाबला करण्याचा प्रयत्न केला, पण त्यांनाही गोळी मारण्यात आली आणि इस्पितळात नेत असता त्यांना मृत्यू आला.

जेथे शेकडो लोक जमले होते अशा एका सार्वजनिक इमारती बाहेर ही घटना घटली. तीत कोठेही चोरटेपणा नव्हता. ज्या धाडसाने हे सर्व घडून आले होते त्याने सर्वांनाच थक्क केले.

इंपिरियल इन्स्टिट्यूट ह्या संस्थेच्या जहांगीर हॉलमध्ये ही घटना घडली. लंडन इंडियन असोसिएशनने येथे एक थाटाचे संमेलन घडविले होते. त्यात भोजनाबरोबर संगीताचा जलसाही होता. भारतीय विद्यार्थ्यांच्या हिताची कळकळ बाळगणारे महत्त्वाचे पुढारी आणि भारतीय विद्यार्थ्यांचे युरोपीय व ॲंग्लोइंडियन मित्र त्या ठिकाणी हजर होते.

रात्रीचे अकरा वाजले होते. भोजनाची व्यवस्था शेजारीच असलेल्या सव्हाय हॉटेलमध्ये केली होती. भोजन संपले. सर कर्झन - वायली हे एक महत्त्वाचे पाहुणे होते. ते पत्नीसह घरी जाण्यास निघाले. जिन्याच्या पायऱ्या उतरत असतांना आपण काही विसरल्याची त्यांच्या पत्नींना आठवण झाली आणि त्या आत गेल्या.

सर कर्झन - वायली एकटेच पायऱ्या उतरत असता त्यांच्या चांगल्या ओळखीचा एक तरुण भारतीय विद्यार्थी जणू काही त्यांच्याशी बोलण्यासाठी आला. ते जवळ आल्यावर मदनलालने आपल्या हातातील पिस्तुलाच्या पाच गोळ्या त्यांच्यावर झाडल्या. पहिल्या चारीचा काही परिणाम झाला नाही पण पाचवी वायलींच्या मस्तकावर लागली आणि त्यांच्या मस्तकाच्या चिंधड्या झाल्या. ते गतप्राण होऊन खाली पडले.

सर कर्झन- वायली ह्यांच्याबरोबर कॅप्टन कावसलाल काका होते. ते हल्लेखोरावर धावून गेले. पिस्तुलातील सहावी गोळी त्यांच्या छातीवर लागली.

भोजनाला आलेले एक पाहुणे थॉरबर्न ह्यांनी दुसऱ्या एका माणसाच्या मदतीने मदनलालला एका खुर्चीवर दाबून धरले. मदनलालने आपला उजवा हात सोडवून घेतला आणि त्यांच्या डोक्यावर नेम धरून पिस्तूल उडवले. परंतु आता हत्यार रिकामे असल्याने गोळी उडाली नाही. ह्या गडबडीत मदनलालचा चष्मा खाली पडला. त्याच्या विनंतीवरून तो त्याला परत देण्यात आला. आत्मघाताचा प्रयत्न असफल झाल्यावर मदनलालने प्रतिकार थांबवला आणि तो शांत आणि स्तब्ध झाला. त्याने चष्मा घालण्यासाठी आपला उजवा हात सोडविण्याची विनंती केली. त्याप्रमाणे उजवा हात सोडवला गेला. त्याने चष्मा नीट लावला पण सुटण्याचा किंवा कोणाला मारण्याचा प्रयत्न केला नाही. थॉरबर्नने त्याची

नाडी पाहिली आणि आश्चर्याची गोष्ट म्हणजे ती अगदी नेहमीसारखी होती. भोवतालचे सारे जण क्षुब्ध झाले होते. पण मदनलाल हा एकटाच शांत व कुठलाही क्षोभ नसलेला दिसत होता.

गोळ्यांचा आवाज ऐकून एक उंच इंग्रज स्त्री काय चालले आहे हे पाहण्यासाठी बाहेर आली. एका इंग्रज गृहस्थाचे शिरविरहीत धड जमिनीवर पडलेले पाहून "किती करुण दृष्य हे !" असे उद्‌गार तिने काढले. मृत व्यक्ती हे आपले पतीच आहेत हे कळायला तिला थोडा वेळ लागला. लेडी कर्झन- वायलीचे हुंदके हृदयविदारक होते.

पोलिस घटनास्थळी आले आणि त्यांनी मदनलालला ताब्यात घेतले. त्याच्याजवळ आणखी एक पिस्तूल, सुरी आणि एक कट्यारही सापडली. त्याला वॉल्डन स्ट्रीटवरील पोलिस ठाण्यावर नेण्यात आले.

मदनलाल धिंग्रा हा तरुण भारतीय सव्वीस वर्षांचा होता आणि त्याने काही महिन्यापूर्वीच स्थापत्य शास्त्राचा अभ्यासक्रम युनिव्हर्सिटी कॉलेज लंडन येथून पहिल्या श्रेणीत पुरा केला होता. त्याचा जन्म अमृतसरच्या एक पंजाबी क्षत्रिय कुटुंबात झाला होता. त्याचे वडील एक धनिक जमिनदार असून ते राजनिष्ठ होते. मदनलालला दोन वडील भाऊ होते. त्यांच्यापैकी एक लाहोरला बॅरिस्टर होता आणि तो नुकताच लंडनला आला होता. दुसरा भाऊ भारतात डॉक्टर होता.

लंडनला अभ्यासासाठी येण्यापूर्वी मदनलाल हॉंगकॉंग, सिंगापूर आणि मलायाला जाऊन आला होता. लंडनला तो आदर्श विद्यार्थी होता. परंतु मातृभूमीचे प्रेम आणि आपला हिंदू वारसा ह्यांची मुळे त्याच्या अंतःकरणात खोल रुजली होती. १८५७ च्या सुवर्ण महोत्सवाच्यावेळी त्याने '१८५७ चे हुतामे' हा बिल्ला लावला होता आणि त्यामुळे आपल्या महाविद्यालयातील इंग्रज विद्यार्थ्यांशी त्याचा संघर्ष झाला होता.

मदनलाल ही मोठी धीराची व्यक्ती होती. तो नेहमी इंडिया हाऊसमध्ये येत असे. एक दिवस कोणीतरी त्याला सांगितले की आशियामध्ये जपानी लोक सर्वात शूर आहेत. मदनलाल उसळला आणि म्हणाला, "हिंदू राष्ट्रही काही कमी शूर नाही." डॉ. टी.एस.एस्. राजन् म्हणाले, "जपानी लोक तोफांच्या तोंडात सहजपणे चालत जातात- आणि बेऑनेटचा हल्ला न डरता परतवतात. नुसती शौर्याची प्रौढी मारण्यात अर्थ नाही. तू स्वतः तुझ्या तळ हातात कोणी टाचणी घातली, तर न भिता सहन करशील का ?" क्षणाचाही विलंब न लावता मदनलाल म्हणाला, "होय", मग ही परीक्षा घेण्याची पाळी अय्यर ह्यांच्यावर आली. मदनलालने आपला हात टेबलावर उताणा ठेवला. अय्यरनी एक सुई घेतली आणि तिचा टेबलाला स्पर्श होईपर्यंत त्याच्या तळ हातातून ती आरपार घातली. मदनलालने एकदाही हूं की चूं सुध्दा केले नाही. पॉंडिचरी येथील कवी भारती ह्यांच्या संपादकत्वाखाली निघणाऱ्या इंडिया साप्ताहिकाला अय्यर बातमीपत्रे पाठवीत; त्यातील एका बातमीपत्रात हा प्रसंग वर्णन केला आहे.

कर्झन- वायलीच्या खुनाआधी काही दिवस "हौतात्म्याची वेळ आली आहे काय" असे मदनलालने सावरकरांना विचारले होते. "हुतात्मा तयार असेल तर वेळ आलेली आहे असे ध्वनित होते" असे सावरकरांनी उत्तर दिले. हे बोलणे म्हणजे आपल्याला हिरवा कंदील आहे असे मदनलालने मानले. त्यानंतर त्याने आपले नाव एका खानदानी इंग्रजी क्लबमध्ये दाखल केले आणि वरिष्ठ अधिकारावर असलेल्या इंग्रजांशी मैत्री केली. अरेरावी व्हाइसरॉय लॉर्ड कर्झन ह्यांचा काटा काढावा असे मदनलालला वाटत होते. कर्झन बंगालच्या फाळणीस जबाबदार होते आणि आता लंडनला भेट देण्यासाठी आले होते. परंतु मदनलालला संधी मिळालीच नाही आणि त्याने सर कर्झन- वायली ह्या तिरस्करणीय इंग्रजास मार्गातून दूर करण्याचे ठरविले. लेड बरी स्ट्रीटमधील त्याच्या बिऱ्हाडातील मदनलालचे सामान तपासण्यात आले तेव्हा त्याची एक व्यक्तिगत नोंदवही सापडली. तीत हत्यारांनी गोळ्या मारणे कसे उपयोगी आहे हे लिहिले होते. पोलिसांनी ह्याची नोंद घेतली आणि ते वही घेऊन गेले. त्यांनी इंडिया हाऊसचाही झाडा घेतला आणि तेथून मोठ्या प्रमाणात राष्ट्रीय पुस्तिका आणि काही पत्रके जप्त केली. श्यामजी कृष्ण वर्मा ह्यांचे नियतकालिक "दि इंडियन सोशियालाजिस्ट" ज्या मुद्रणालयात छापले जाई त्याचीही झडती घेण्यात आली.

श्यामजी पॅरिस येथे राहात होते तेथून त्यांनी "टाइम्सकडे" एक पत्र पाठविले आणि त्यात आपला ह्या गोळीबाराशी काही संबंध नाही असे बजावले. परंतु पुढे त्यांनी असेही लिहिले की आपण मदनलाल धिंग्रा ह्याला स्वदेशाच्या कामकाजासाठी आत्मयज्ञ करणारा हुतात्मा मानतो. त्यांनी पुढे असाही इशारा दिला की इंग्रज लोक भारतावरील अन्याय जर चालूच ठेवतील तर दुसराही एखादा भयानक प्रसंग घडून येईल आणि त्याचा सर्व जगाला धक्का बसेल.

"पेलमेल- गॅझेट" चा एक बातमीदार इंडिया हाऊसकडे आला पण त्याला ती संस्था जवळजवळ बंद आढळली. तेथे एकटाच एक भारतीय विद्यार्थी होता. त्याचे नाव देण्यात आले नाही. पण सांगितले की मदनलाल नऊ महिन्यापूर्वी तेथे निवासी होता आणि नंतर तो निघून गेला- त्यावेळेस त्याला राजकारणात काही रस होता असे दिसले नाही.

२ जुलैला मदनलालला वेस्ट मिनिस्टर पोलिस न्यायालयात नेण्यात आले आणि त्याच्यावर आरोप ठेवला गेला. पोलिसांनी स्वतःची जबानी दिल्यावर मदनलालला न्यायाधीशांनी विचारले, "तुम्हाला ह्यांची फेरतपासणी करायची आहे का ?" मदनलालने नकारार्थी मान हालवली आणि सांगितले की आपल्याला कै. लालकाकांना मारण्याची इच्छा नव्हती. परंतु आत्मसंरक्षणासाठी त्यांना मारणे भाग पडले," खटला एक आठवड्यापर्यंत स्थगित करण्यात आला.

दुसऱ्या दिवशी ३ जुलैला लंडनमधील भारतीय समाजाची एक सभा भरली. बाबू सुरेंद्रनाथ बानर्जी अध्यक्षस्थानी होते. सभेतील वक्त्यांनी गुन्ह्याशी आपला संबंध नाही

असे सांगितले आणि गुन्ह्याचा निषेध करणारा एक ठरावही संमत केला. ५ जुलैला त्यापेक्षाही एक मोठी सभा कॅक्स्टन हॉल येथे भरली. आगाखान त्यांनी तिचे अध्यक्षस्थान स्वीकारले होते. पूर्वीप्रमाणेच अनेक वक्त्यांनी मदनलालचा निषेध केला. अध्यक्षांनी ही सभा मदनलालचा एकमुखाने निषेध करते अशा अर्थाचा ठराव मांडला. हॉलमधील गर्दीमधून एक मोठा आवाज आला ''नाही, एक मुखाने नाही.'' आगाखानांनी विचारले, ''कोण ते नाही म्हणते ?'' ''मी म्हणतो'' असे उत्तर आले. ''कृपया तुमचे नाव सांगा'' अध्यक्षांनी म्हटले. काही लोकांची डोके फिरली आणि ते ओरडू लागले, ''त्याला खाली फेका. त्याला बाहेर काढा, '' तो एकटा मनुष्य एवढ्या गोधळातही स्वतःच्या जागी शांत राह्यला आणि आव्हानपूर्वक म्हणाला ''माझे नाव सावरकर !''

तेथे जमलेल्या गर्दीला हा जणू वादळाचा इशारा होता. क्रांतिकारकांनी त्या ठिकाणी येऊन एखाद दुसरा बॉम्ब फेकण्याची तयारी केली होती की काय ? सर्वांच्या भावना क्षुब्ध झाल्या. गोंधळ निर्माण झाला आणि पामर नावाच्या एका युरेशिअन माणसाने सावरकरांच्या डोक्याजवळ ठोसा मारला. त्यांचा चष्मा तुटला आणि वाहात्या रक्ताने त्यांचे कपडे माखले. सावरकर पुन्हा म्हणाले, ''तरीही मी अजूनसुध्दा ठरावाच्या विरुध्द आहे.''

सावकरांच्या जवळ एम्. पी. टी. आचार्य उभे होते. त्यांनी पामरला बडवून काढले आणि शेवटी तो खाली पडला. अय्यरही जवळच होते. ते पामरला गोळी मारण्याच्या तयारीत होते पण सावरकरांनी त्यांना डोळ्याचा इशारा केला व थांबविले. सावरकरांनी ''टाइम्स''ला एक पत्र लिहिले, धिंग्राचा निषेध करण्याच्या ठरावाला आपण हरकत घेतली कारण धिंग्रा अजून खटल्यातील एक आरोपी होता, शिवाय हे प्रकरण न्यायप्रविष्ट होते.

सर कर्झन- वायली ह्याच्या खुनाचा सर्व शहरभर बोलबाला झाला. क्लब, सभा, आगगाड्या आणि पार्लमेंट ह्या सर्व ठिकाणी प्रत्येक जण त्याची चर्चा करीत होता. सत्ताधारी इंग्रजांच्या रागाला भिऊन राजनिष्ठ भारतीय थरथर कापू लागले. मदनलालच्या वडिलांनी व वडील भावाने आपण त्याच्याशी संबंध तोडल्याचे जाहीर केले आणि इंग्रजांशी आपली राजनिष्ठा व्यक्त केली !

पण मदनलाल अविचलित राहिला. प्राथमिक तपासणीच्या वेळी त्याने अशी अशा व्यक्त केली की आपल्याला देहान्ताची शिक्षा व्हावी. तिच्यामुळे आपल्या देशबांधवांची सूडाची भावना अधिक तीव्र होईल. वेडाचा बहाणा करावा हा अनेकांनी दिलेला सल्ला तिरस्कारपूर्वक बाजूला सारून मदनलालने आयत्यावेळी एक निवेदन केले, ''जर्मनीला ज्या प्रमाणे हा देश पादाक्रान्त करण्याचा अधिकार नाही, त्याचप्रमाणे इंग्रजांनाही भारत पादाक्रान्त करण्याचा अधिकार नाही. आमच्या पवित्र भूमीला भ्रष्ट करणाऱ्या इंग्रजांना ठार करणे पूर्णपणे समर्थनीय ठरते. इंग्रज लोकांच्या भयानक ढोंगीपणाबद्दल, त्यांच्या निष्ठूर विनादाबद्दल आणि क्रूर चेष्टेबद्दल मला आश्चर्य वाटते.''

मदलालने एक लेखी निवेदन तयार केले होते. ते त्याने खुनाच्या वेळी आपल्या खिशात ठेवले होते. पण पोलिसांनी ते दाबून ठेवले. ह्या निवेदनाची आपल्याला माहिती असल्याचे पोलिसांनी कधीही कबूल केले नाही. न्यायालयाने मदनलालला मृत्यूची शिक्षा ठोठावली.

शिक्षा दिली गेल्यावर मदनलाल म्हणाला, ''महाराज, मी आपला आभारी आहे. माझे क्षूद्र जीवित माझ्या देशाच्या हितासाठी मी देत आहे, त्याबद्दल मला अभिमान वाटतो.''

सावरकरांनी मदनलालची ब्रिस्टल तुरुंगात भेट घेतली. आपल्यावर हिंदू विधीप्रमाणे अग्निसंस्कार व्हावा आणि कोणाही अहिंदूचा आपल्या शरीराला स्पर्श होऊ नये, अशी आपली शेवटची इच्छा मदनलालने व्यक्त केली. आपले कपडे आणि सामानसुमान विकावे आणि आलेले पैसे देशकार्यासाठी खर्च करावेत असेही त्याने सांगितले.

मदनलाल शिक्षेप्रमाणे फाशीची वाट पाहात असतांना लंडनमधील प्रमुख वृत्तपत्रांनी त्यांच्यावरील खटल्याची चर्चा केली. एक वजनदार मासिक 'रिव्ह्यू ऑफ रिव्ह्यूज्'' आणि ''लंडन इव्हनिंग गॅझेट'' यांनी देहान्तापेक्षा जन्मठेपेची शिक्षा अधिक योग्य झाली असती असे म्हटले. शिक्षा अंमलात आणणे लांबवावे असे त्यांनी सुचवले. ''टाइम्स'' पत्र मात्र विरोधी होते आणि त्याने सावरकरांचा मेंदू ह्या कटकटींच्यामागे आहे असे म्हटले आणि त्यांना दोष दिला.

अय्यर, सावरकर, डॉ. राजन् आणि इंडिया हाऊसमधील इतरांच्या जीवनावर मदनलाल प्रकरणाचा मोठाच परिणाम झाला. सावरकर ग्रेज इन मधून बॅरिस्टरीची अखेरची परीक्षा उत्तीर्ण झाले. परंतु इन्‌च्या सभासदांनी त्यांना पदवी देण्याचे नाकारले. त्यांनी विनंती अर्ज केल्यानंतर त्यांना सांगण्यात आले की आपण राजकारणात भाग घेणार नाही असे त्यांनी लिहून दिले तर त्यांना पदवी देण्यात येईल. ह्याला सावरकरांनी साहजिकच नकार दिला आणि त्यांना पदवी केव्हाच मिळाली नाही. अय्यर यांना सुध्दा पुढे अशाच परिस्थितीला तोंड द्यावे लागले.

कर्झन- वायली खुनानंतर इंडिया हाऊस तात्पुरते बंद करण्यात आले. कारण विरोधकांचे त्यावर हल्ले होण्याची भीती होती. काही दिवस सावरकर, अय्यर आणि राजन् आपल्या मित्रांकडे राहिले. त्यांना आसरा दिल्याबद्दल मित्रांवरही टीका झाली. यामुळे त्यांना निवासाच्या सोयीसाठी दुसरीकडे शोध घ्यावा लागला अनेक दिवस त्यांनी हॉटिलामागून हॉटिले आणि निवासस्थानामागून निवासस्थाने धुंडाळली पण त्यांना यश आले नाही. धिंग्रा प्रकरणामुळे हॉटेल आणि निवासस्थाने भारतीयांच्या निवासाची सोय करण्यास घाबरू लागली.

अय्यर आणि सावरकर लंडनमध्येच इतर काही मित्रांकडे राहिले. परंतु सावरकरांना विश्रांतीची फार जरूर असल्याने ते ब्रायटन् ह्या समुद्रकाठच्या प्रसिध्दस्थळी गेले. तेथेही ते स्वस्थ राहिले नाहीत. त्यांनी मदनलाल धिंग्राचे दाबून टाकलेले निवेदन छापून त्याच्या प्रती इंग्लंड, आयर्लंड व अमेरिकामधील वृत्तपत्रांकडे पाठवल्या. इंग्लंडच्या वृत्तपत्रांनी

त्याला प्रसिध्दी नाकारली; परंतु लंडनच्या सुप्रसिध्द "डेली न्यूज" च्या भारतीय स्वातंत्र्याबद्दल सहानुभूती असलेल्या आयरिश सहसंपादकाने रात्रपाळीच्या वेळी ते आपल्या पत्रात छापून काढले. धिंग्राला फाशी दिल्याच्या दुसऱ्या दिवशी ते छापून आले.

१७ ऑगस्ट १९०९ ला मदनलाल आनंदाने फासावर चढला. 'डेली न्यूज' ने वृत्तांत देताना म्हटले, "पेंटोव्हील तुरुंगाच्या बाहेर, धिंग्राच्या फाशीच्या आधी, मोठी गर्दी जमली होती. विशेष लक्षणीय गोष्ट म्हणजे, ह्यात भारतीय विद्यार्थी मुठभर सुध्दा नव्हते. नवाचे ठोके पडले आणि अंडर शेरीफ तुरुंगाच्या बाहेर आले. शिक्षा कशी देण्यात आली असे विचारल्यावर त्यांनी सांगितले, 'सर्व अगदी ठीक झाले. मृत्यू ताबडतोब घडून आला. दहनासाठी पार्थिव देह मिळावा म्हणून केलेला अर्ज फेटाळला गेला. धिंग्राचे शरीर नेहमीच्या पध्दतीने तुरुंगाच्या आवारात पुरले जाईल."

मदनलालचे लेखी निवेदनही ह्या वृत्तपत्राने संपूर्ण छापले, "तरुण भारतीय देशभक्तांना अमानूषपणे फाशी दिल्याबद्दल किंवा हद्दपार केल्याबद्दल एक विनम्र सूड म्हणून आपण इंग्रजी रक्त सांडण्याचा प्रयत्न केला" हे निवेदनात मान्य केले होते. आपण ह्याबाबत कोणाचाही सल्ला घेतला नव्हता तर आपण स्वतःचे आपले एक कर्तव्य म्हणून हे कृत्य तडीस नेले. कोणतेही पाशबध्द राष्ट्र सतत युध्दाच्या परिस्थितीत असते. शस्त्रविहीन मानववंश प्रकट संग्राम करू शकत नाही, म्हणून आपण आकस्मिक हल्ला करून लोकांना चकित केले. बंदुका नाकाराल्यामुळे पिस्तुलाचा वापर करावा लागला. "मी हिंदू असल्याने मायभूमीवरील अन्याय म्हणजे ईश्वराचा अवमान, स्वदेशकार्य म्हणजे श्रीरामाचे कार्य, स्वदेश सेवा म्हणजे श्रीकृष्णाची सेवा अशी माझी श्रध्दा. संपत्तीने आणि बुध्दीने दारिद्री असा माझ्यासारखा मायभूमीचा पुत्र मातेला स्वतःच्या रक्ताशिवाय दुसरे कोठले अर्घ्य देणार ? कसे मरावे हा धडा भारताने शिकणे अवश्य आहे आणि स्वतः मरणे हे तो शिकण्याचा एकमेव मार्ग. म्हणून मी मृत्यू पत्करला आणि माझ्या हौतात्म्यात विजय मानला. भारत व इंग्लंड यांच्यातील अनैसर्गिक संबंध जोपर्यंत चालू राहतील तोपर्यंत भारतीय स्वातंत्र्ययुध्द चालूच राहील." आपल्या निवेदनाचा शेवट करताना मदनलालने म्हटले, "माझी ईश्वराला एकच प्रार्थना आहे की त्याच मातेच्या पोटी मला पुनर्जन्म यावा आणि तिच्या पवित्र कार्यात मला पुन्हा मुत्यू यावा. तिचे कार्य यशस्वी होऊन मानवतेच्या कल्याणासाठी आणि परमेश्वराच्या गौरवासाठी ती स्वंतत्र म्हणून उभी राहीपर्यंत हे पुनः पुन्हा व्हावे. वंदे मातरम्"

मदनलालच्या समर्पणाचा अय्यर यांच्या जीवनावर शाश्वत ठसा उमटला. त्यांनीही आपले सर्वस्व मातृभूमीला अर्पण करण्याचा निश्चिय केला. त्यांच्या आयुष्याला क्रांतिकारक वळण देणारी ही आणखी एक घटना होती.

---

# अय्यर यांची लंडनमधील पत्रे

सावरकर आणि अय्यर ह्यांनी चालविलेल्या फ्री इंडिया सोसायटीच्या कार्यांपैकी एक कार्य म्हणजे भारतीय स्वातंत्र्याचा वर्तमानपत्रात प्रचार करणे सभासदांनी देशासाठी दररोज एक तरी सत्कृत्य करावे अशी अपेक्षा होती. त्यांनी दररोजची दैनंदिनी ठेवावी आणि सोसायटीच्या ज्येष्ठ सभासदांनी ती मधून मधून तपासावी असे ठरले होते. इंग्लंड आणि इतर देशातील वृत्तपत्रांच्या संपादकांना पत्र लिहिणे, भारतातील वृत्तपत्रांनी बातमी पत्र पाठविणे आणि जगातील भारतीय स्वातंत्र्याला सहानुभूती असणाऱ्या सर्व देशभक्तांशी पत्राद्वारे संपर्क साधणे ही सोसायटीच्या सभासदांची काही कामे होती. व्यायाम, घोड्यावर बसणे, मोटर चालविणे, मुष्टियुध्द, कुस्ती आणि नेमबाजीचा सराव ह्या सर्व गोष्टी म्हणजे देशसेवा असे सोसायटीकडून मानले जाई.

सोसायटीमधील आपल्या कर्तव्याचा एक भाग म्हणून व्ही. व्ही. एस्. अय्यर ह्यांनी स्वतःला इंग्रजी आणि तमिळमधील वृत्तपत्र लिखाणाला वाहून घेतले. आपल्या विचार भावनांचा अविष्कार ते तमिळमध्ये प्रसिध्द होणाऱ्या फ्रेंच भारतातील पाँडेचरी येथील ''इंडिया'' साप्ताहिकात करीत असत. ह्या साप्ताहिकाचे संपादक विद्रोही कवी भारती हे होते. अय्यर ह्यांनी लंडनच्या साप्ताहिक बातमीपत्राशिवाय गॅरीबाल्डीच्या जीवनासंबंधी आणि इतर विषयांवर लिखाण पाठविले होते हे आपण आधी पाहिलेच आहे. कर्झन- वायलीच्या खुनानंतर लंडनच्या साप्ताहिक बातमीपत्राला अधिकाधिक महत्त्व चढू लागले. बातमी पत्राच्या निमित्ताने सर्व प्रकारच्या बातम्या आणि माहिती देता येत असे आणि आपल्या स्वार्थी इंग्रज सत्ताधाऱ्यांच्या स्वार्थी हेतूंचे अधिक चांगले स्पष्टीकरण देता येत असे.

कर्झन- वायली प्रकरणामध्ये लंडनच्या वृत्तपत्रांनी जो रस घेतला त्याची अय्यर ह्यांनी नोंद घेतली आणि ब्रिटिश वृत्तपत्रात जी टीका टिप्पणी येत असे त्यातील उतारे विस्ताराने दिले, आणि त्यात स्वतःच्या निरीक्षणची भर टाकली. भारतातील तरुणांनी मदनलालचे उज्ज्वल उदाहरण आपल्यापुढे ठेवून त्याचे अनुकरण करावे असेही त्यांनी म्हटले.

परंतु भारतातील राजकीय वातावरण अद्याप ब्रिटिशांशी सशस्त्र मुकाबला करावा ह्या मताचे नव्हते. सनदशीर मार्गांना अद्याप पाठिंबा मिळत होता. ''इंडियाचे'' संपादक भारती हिंसेचा तिरस्कार करीत. राजकीय खुनाला क्षम्य मानीत नसत आणि सशस्त्र बंडाला त्यांचा उघड पाठिंबा

नव्हता. धिंग्राला देशभक्त म्हणून भारती मान देत असत. परंतु धिंग्राच्या मार्गाशी ते सहमत नव्हते. धिंग्राबद्दलच्या बातम्यांना भारतींनी आपल्या साप्ताहिकात पुष्कळशी जागा दिली आणि धिंग्रा संबंधीच्या घटनेच्या विविध बाजूंचे विस्ताराने विवरण करण्यात भारतींचा बराच काळ खर्च होई. परंतु एक वेळ अशी आली की संपादक आणि लेखक ह्यांच्यामधील मतभेद उघड झाला. ह्याचा परिणाम म्हणून भारतींना हे वृत्तपत्र सोडावे लागले. पत्राचे मालक लेखकांच्या बाजूचे आणि धिंग्राच्या कृतीचे समर्थक होते.

**जे झाले ते असे**

कर्झन- वायलींच्या खुनानंतर नऊ दिवसांनी भारतींनी धिंग्रावर टीका करणारे एक संपादकीय लिहिले व त्यात म्हटले ''सर कर्झन- वायली आणि डॉ. लाल काका ह्यांच्या खुनाची वार्ता ऐकून आम्हास फार खेद झाला. इंग्लंड आणि भारत ह्या दोन्ही देशातील राजकीय पक्ष ह्या प्रसंगाबद्दल एकमेकास दोष देत आहेत. परंतु आशा माथेफिरूपणामुळे देशाच्या आशा परिपूर्ण होतील असे मानणारा कोणी मूर्ख कोठेही सापडणार नाही.''

तरीही भारतींनी आपल्या बातम्यांच्या स्तंभात अय्यर ह्यांच्या लंडन येथील बातमीपत्राला संपूर्णसंधी दिली. ही बातमीपत्रे 'आमचे लंडनचे बतमीपत्र' ह्या मथळ्याखाली प्रसिध्द होत असत. २८ ऑगस्ट १९०९ च्या ''इंडिया'' च्या अंकामध्यें जे बातमीपत्र प्रसिध्द झाले ते धिंग्राचा उल्लेख करणाऱ्या बातमीपत्रापैकी एक होते. त्यात म्हटले होते ''येथे लंडनमधील लोकांच्या मनातून धिंग्रा अद्याप विसरून गेलेले नाही. ''पेलानेल गॅझेट'' आणि ''इव्हनिंग स्टॅंटर्ड'' ह्या दोन्ही पत्रांनी मोठे मथळे परवा दिले होते. एकाने म्हटले होते, 'धिंग्राचे डोके फिरले आहे काय ?' आणि दुसऱ्याने 'धिंग्राच्या वडिलांचे पत्र' असा मथळा दिला होता. दोन्ही नियतकालिकांच्या त्यादिवशी प्रती जास्त खपल्या.

''धिंग्राच्या भावांनी पंजाबच्या नायब राज्यपालांना लिहिलेले पत्र आणि त्याच्या वडिलांनी भारताच्या सेक्रेटरी ऑफ स्टेटना लिहिलेले दुसरे पत्र ही दोन्ही येथे प्रसिध्द करण्यात आली आहेत. दोन्ही पत्रात धिंग्राचा संबंध आपण तोडल्याचे जाहीर केले आहे. पहिल्या पत्रात प्रगट झालेल्या बंधुप्रेमाचा असंस्कृत द्रोह व सत्ताधाऱ्यांच्या बद्दलची निर्लज्ज भीती ह्यांची इंग्लंड व भारतातील लोकांना सारखीच घृणा आलेली आहे. धिंग्राच्या वडिलांच्या पत्रात धिंग्राचे डोके फिरले आहे असे सिध्द करण्याचा प्रयत्न केला आहे. ह्याची कारणे म्हणून तो घरातून पळून गेला आणि लहानपणाच्या खोड्यांमध्ये त्याने मांजराच्या मिशा कापल्या ही उदाहरणे दिली आहेत. परंतु ज्यांनी त्याचे ह्या प्रसंगानंतर बाहेरचे आणि न्यायालयातले वर्तन पाहिले आहे, ते तो वेडा आहे असे कसे मानतील ?''

ह्यानंतर खटल्याचा अहवाल विस्ताराने देण्यात आला आहे. त्यात धिंग्राने केलेल्या उत्स्फूर्त निवेदनाला प्राधान्य देण्यात आले आहे. आपल्याला मृत्यूची शिक्षा दिल्यानतंर मदनलालने शांतपणे न्यायाधीशांचे आभार मानले, ह्याचा उल्लेख करून बातमीपत्रात पुढे

म्हटले आहे, ''जो मनुष्य अशा तऱ्हेने बोलतो आणि इतक्या प्रतिष्ठितपणे वागतो तो वेडा असू शकेल काय ? त्याला जर वेडा म्हटले तर त्याचे वेड भगवान कृष्णाने कंसाला मारले त्यासारखे किंवा शिवाजीने अफझलखानाचा वध केला त्यासमान किंवा विल्यम टेलने ऑस्ट्रियन राज्यपालाचा वध केला त्याप्रकारचे मानले पाहिजे.

धिंग्राला फाशी दिल्यानंतर त्याच २८ ऑगस्टच्या अंकामध्ये दुसरे एक पत्र छापले होते. त्यात लिहिले होते,

''धिंग्राने आपल्या देहावर अग्निसंस्कार व्हावा अशी अधिकाऱ्यांना विनंती केली होती. परंतु त्यांनी त्याच्या अखेरच्या इच्छेला मान देण्याचे नाकारले. इंग्लंडमध्ये मृतांना पुरतात, तर हिन्दू पध्दतीने अग्निसंस्कार केला जातो. आपला देह आपल्या धार्मिक प्रथेप्रमाणे अग्नीला अर्पण करावा, एवढेच धिंग्राचे म्हणणे होते. अधिकाऱ्यांनी त्याचा आव्हेर केला. भारताच्या ह्या देवतुल्य पुत्राच्या शरीराची आहुती स्वीकारण्यास अग्निदेव तयार होता पण हे नाकारले गेल्यामुळे अग्नीला क्रोध आला आणि त्याने ग्लासगो येथील एक कापसाची गिरणी जाळून भस्मसात केली. ह्यात दोन लाख पन्नास हजार पौंडाचे सामान सुमान अग्नीने स्वाहा केले. कदाचित अग्नीदेवाच्या मते धिंग्राच्या देहाचे मूल्यही तेवढे होते.''

ग्लासगोच्या आगीबद्दल असे दुष्ट बुध्दीने आनंद मानणे भारतींना रुचले नाही. पुढील आठवड्यातील एक संपादकीय टिपणात भारतींनी लिहिले, ''गेल्या आठवड्यात आमच्या एका बातमीदाराने मदनलाल धिंग्राबद्दल लिहिले होते त्याच्या मतांचा पुरस्कार करू शकत नाही. आपल्या पत्रात ह्या बातमीदाराने काहीतरी हिशोब करून मदनलालच्या जीविताची किंमत अडीच लाख पौंडाइतकी केली होती. शिवाय त्याने ग्लासगो येथील मोठ्या आगीबद्दल आनंद व्यक्त केला होता.

''ग्लासगोच्या गिरण्या जाळून टाकल्या तर धिंग्रा जिंवत होऊन परत येतील का ? भारतीय लोकांना ह्या आगीचा काय उपयोग ? धिंग्राच्या फाशीचा अग्निदेवाने घेतलेला हा बदला होता, असे आपण का मानायचे ? अशा क्षुद्र गोष्टींबद्दल आर्य लोक दुष्ट बुध्दीने आनंद मानीत नाहीत. त्या सर्व असंस्कृत आहेत. ब्रिटिश साम्राज्यवाद्यांच्या सरंजामशाही कायद्यांचा आणि कृतींचा हा परिणाम आहे. धिंग्राच्या अखरेच्या इच्छेला अनुग्रहाने मान न दिल्याबद्दल सर्व जग इंग्रजांचा तीव्र निषेध करते.''

संपादकांच्या ह्या सडेतोड टीकेने संपादक आणि पत्राचे मालक ह्यांच्या मधील धुमसणारे मतभेद प्रामुख्याने प्रगट झाले. सैध्दान्तिक मतभेदासंबंधी वादविवाद झाले आणि भारतींनी ''इंडिया'' ह्या तमिळ साप्ताहिकाचे संपादकत्व सोडले. राष्ट्रकार्याच्या दृष्टीने ही एक शोकांतिका होती, कारण त्यांच्या जागी सामान्य माणसे आली आणि ह्या पत्राची त्याने इंग्रजांविरुध्द केलेल्या हिंसक हल्ल्यांबद्दल कीर्ती झाली, तरी त्यातील उमदेपणाचा अंशमात्र नष्ट झाला नाही.

आपण अजाणतेपणाने जे चहाच्या पेल्यातले वादळ निर्माण केले त्याची लंडन येथे दूरवर

राहणाऱ्या अय्यर ह्यांना काहीच माहिती नव्हती. ते आपली साप्तहिक पत्रे आता नव्या स्वरूपात आणि नव्या मथळ्याखाली पाठवीतच राहिले. आता सुध्दा ही पत्रे देशबंधूना (देशप्रेमींना) उद्देशून लिहिलेली असत आणि त्या खाली देशभक्त, देशसेवक, भारतप्रिय अशी एखादी सही असे. 'स्वातंत्र्यलक्ष्मी प्रसन्न' असे पत्रांचे शीर्षक असे.

नव्या स्वरुपातील पहिले पत्र इंडिया पत्रात ११ सप्टेंबर १९०९ ला प्रसिध्द झाले. त्यात मदनलाल धिंग्राचा अखेरचा दिवस वर्णन केला होता. तुरुंगाधिकाऱ्याच्या मते धिंग्रा इतका उत्तम वागणुकीचा दुसरा कैदी त्यांच्या पाहाण्यात नव्हता. त्याने आपले अखेरचे दिवस पुस्तकांच्या वाचनात घालवले. आपला शेवट निश्चितपणे होणारच आहे. त्याबद्दल त्याने यत्किंचितही काळजी केली नाही. उलट तो आपल्या मातृभूमीबद्दलच बोलत असे. त्याची भेट घेऊन त्याला आपण हिंदू पध्दतीप्रमाणे शेवटीच्याक्षणी त्याचे अध्यात्मिक सांत्वन करू अशी त्याच्या एका मित्राने केलेली विनंती फेटळण्यात आली.

ह्या पत्रात आणखी दोन वेधक घटनांचा उल्लेख होता. एक म्हणजे फाशीपूर्वी चार पाच दिवस आधी पोलिसांनी दडपून टाकलेले धिंग्राचे अखेरचे निवेदन एका परिपत्रकाद्वारा 'चॅलेंज' (आव्हान) ह्या मथळ्याखाली छापून काढून त्याचा इंग्लंड व अमेरिकेमध्ये मोठ्या प्रमाणात प्रचार केला गेला. हे सावरकरांचे काम होते हे उघडच होते. दुसरी घटना धिंग्रानी आपल्या तळहातात टाचणी टोचवून कशी घेतली आणि आपले दुर्दम्य धारिष्ट्य कसे दाखवले ह्याबद्दल होते.

नंतरच्या आठवड्यातील अय्यर ह्यांच्या पत्रात लंडनमधील ज्या घडामोडींचा इंडिया हाऊसशी संबंध आला त्या संबंधी वार्ता असे.

एका पत्रात इंडिया हाऊसचा ताबा पोलिसांनी घेतला असून तेथे कोणीही भारतीय विद्यार्थी राहात नाही ह्या गोष्टींचा इन्कार केला होता व असे म्हटले होते की, भारतीय विद्यार्थी अद्याप तेथे राहात असून इंडिया हाऊसचा ताबा श्यामजी कृष्ण वर्मा ह्यांच्या सौभग्यवतींकडे आहे. श्यामजींवर पॅरिसमध्ये हल्ले होण्याचा संभव आहे अशा तऱ्हेचे निनावी इशारे त्यांना मिळाले होते असेही पत्रात म्हटले होते.

धिंग्राच्या फाशीनंतर श्यामजींच्या "दि इंडियन सोशालॉजिस्ट' ह्या पत्रकाचे मुद्रक गाय अल्ड्रेड ह्यांना पकडण्यात आले. आल्ड्रेड ह्यांचे वय अवघे बावीस वर्षांचे होते आपण अराज्यवादी कम्युनिस्ट आहोत असे त्यांनी उघडपणे जाहीर केले होते. पूर्वीच्या मुद्रकांना तुरुंगात टाकले होते हे माहीत असूनही त्यांनी पत्राचे मुद्रण करण्याचे मान्य केले होते. समाजवाद्यांनी आल्ड्रेडच्या अटकेची नोंद घेतली होती आणि आल्ड्रेडचा खटला मुद्रण स्वातंत्र्यासंबंधी असल्याने तो लढवायचा असे त्यांनी ठरविले होते.

ह्या सगळ्याचा उल्लेख करून अय्यरनी आपल्या बातमीपत्रात लिहिले, "सरकराचा कारभार नीट चालावा म्हणून मुद्रणस्वातंत्र्याचे रक्षण करणे हा एक अमोल असा हक्क आहे. त्याचे संपूर्ण रक्षण केल्याशिवाय जनतेला आपली स्वतःची सुरक्षितता टिकवता

येणार नाही आणि त्यामुळे सरकारला कोठलेही अघोर कृत्य करता येईल. सरकारने केलेल्या कृत्यांची अथवा त्यांनी वासलात लावलेल्या बाबींची बिनधास्त चौकशी करण्याचे संपूर्ण स्वातंत्र्य असल्याशिवाय सरकार दिवसेंदिवस अधिकाधिक जुलमी होऊ शकेल. नोकरशाहीच्या हाती सर्व सत्ता असते. आपल्या चुका जाहीर झाल्यावर त्यांची जबाबदारी दुसऱ्यावर ढकलणे नोकरशाहीला नेहमीच शक्य असते. नोकरशाहीच्या कृत्यांची निर्भय चौकशी करणाऱ्या व्यक्ती आणि वृत्तपत्रे अस्तित्वात असल्याशिवाय शासनाचे सुकाणू नोकरशाहीकडून अन्याय्य मार्गाला जाऊ शकेल म्हणून इंग्लंड आणि अमेरिकेमध्ये मुद्रण स्वातंत्र्याचे डोळ्यात तेल घालून रक्षण केले जाते.''

अय्यरनी असेही दाखवून दिले की भारताला मुद्रणस्वातंत्र्य ही काही नवी गोष्ट नाही. हे म्हणणे सिध्द करण्यासाठी त्यांनी प्राचीन तमिळ कवी तिरुवल्लवर ह्यांचे उदाहरण दिले. पहिल्या इसवी सनातील ह्या कवीने आपल्या 'कुरल' ह्या उपदेशापर काव्यात राजाच्या आवश्यक गुणांबद्दल बोलतांना म्हटले, ''पहा हा राजा, ज्याच्या कानाला कडू असलेले शब्द सहन करण्याचा गुण आहे. त्याची प्रजा त्याच्या रक्षणाच्या छायेचा केव्हाही त्याग करणार नाही.'' २५ सप्टेंबर १९०९ च्या पत्रात तीन भारतीय विद्यार्थ्यांना लष्करी शिक्षणासाठी मोरोक्कोला पाठविल्याचा वृतान्त आहे. ह्या त्रिकुटाबद्दलची साद्यंत कथा ह्या पुस्तकात मागे दिलीच आहे.

''इंडिया''च्या ऑक्टोबर नऊच्या अंकात प्रसिध्द झालेल्या पत्रात दक्षिण अमेरिकेतील ब्राझील येथे वसाहत करण्याचा बेत काही भारतीय करीत असल्याचा उल्लेख आहे. आपल्या खऱ्या हालचालींबद्दल ब्रिटिश पोलिसांना चुकीच्या मार्गावर पाठविण्याची अय्यरनी केलेली ही तयारी होती.

ह्याच पत्रात भारतातील दुष्काळांची जबाबदारी इंग्रजी सत्तेवर टाकली होती. ''ह्यावर खरा उपाय म्हणजे ब्रिटिशांना हाकलून देऊन आपली सत्ता स्थापन करणे हा आहे. परंतु हे होईपर्यंत आपले जीवन सुधारण्यासाठी इतर काही योजनांचा उपयोग करता येईल. परदेशात जाऊन उपजीविका करणे ही पद्धत महत्त्वाची असून ती आपल्याकडे पुष्कळ काळापासून मानाची ठरली आहे. परंतु आतापर्यंत आपण परदेशात जे गेलो ते हमाल म्हणूनच गेल्यामुळे आपल्याला अनेक यातना सहन कराव्या लागल्या. आपल्या विकल परिस्थितीमुळे आपले रुदन सिलोन, मॉरिशस, जमेका, नाताळ आणि ट्रान्सवाल ह्या देशातून ऐकू येत आहे. परंतु आज आपण ह्याबद्दल काहीच करू शकत नाही. फक्त सूड घेण्याच्या शपथी घेतो आणि काळ जाण्याची वाट पहातो.

''अँगलो सॅक्सन वंशानी सर्व जग जिंकून घेतलेले नाही. असे कित्येक देश आहेत की जेथे आपल्याला कोठलाही त्रास सहन करावा न लागता चांगले राहाता येणे शक्य आहे. हे देश आपल्याला नवीन आहेत म्हणून आपल्याला भीती वाटण्याचे काही कारण नाही. आपल्या लोकांनी देशांतर करून ह्या देशात वसाहत करावी असे आम्ही म्हणतो. येथील

लोक मानवतावादी असून ते सर्व लोकांशी समजूतदारपणे वागतात. ह्या देशात आणि विशेषतः ब्राझीलमध्ये प्रत्येक वसाहतवाल्याला दहा एकर जमीन मिळते आणि शेती सुधारण्यासाठी कर्जही देण्यात येते. सरकारी अधिकाऱ्यांची निवड करण्याचे हक्कही वसाहतवाल्यांना देण्यात येतात. ह्याशिवाय आणखीही काही सोयी उपलब्ध आहेत.

''येथे वसाहत करण्याचे प्रयत्न पध्दतशीर पायावर व्हावेत म्हणून एक मंडळी स्थापन करण्यात आली आहे व तिने ह्या देशाच्या सरकारांशी करार केले आहेत. सर्व भारतीय बंदरांना जहाजे पाठवून वसाहतवाल्यांना आणण्यासाठी पैसे देणे आणि त्यांची बाकी सर्व व्यवस्था करणे ही कामे मंडळीकडून केली जातील अशी अपेक्षा आहे. माझी भारतीय देशभक्तांना अशी विनंती आहे की त्यांनी नीट विचार करावा आणि आपल्या दुष्काळामध्ये मरणाऱ्या लोकांना ह्या नव्या देशात पाठवावे. ज्यांना ह्याबद्दल अधिक माहिती हवी असेल त्यांनी खालील पत्त्यावर लिहावे.

देशबंधू, जे.एक्स.ओ. कुटिनो, श्याल, एन् फेलिसिया, एस्टोरिल, पोर्तुगाल.''

भारतीय अंतःप्रवसनाने (इमिग्रंट) ब्राझील येथे वसाहत करावी ह्या सूचनेत काहीही लबाडी नव्हती. तर त्यामागे एक योजना होती. मात्र अय्यरना स्वतःला वसाहतवाल्यांना येऊन मिळण्याची इच्छा होती की नाही ह्याबद्दल शंका आहे. ह्या बातमीपत्रांखेरीज अय्यर ह्यांनी तिरुचीच्या आपल्या नातेवाईकांना पत्रे लिहून निरनिराळ्या कुटुंबातील लोकांना ब्राझील येथे वसाहत करण्यासाठी उद्युक्त करावे अशी विनंतीवजा पत्रेही लिहिली होती.

अय्यर ह्यांच्या कुटुंबियांना त्यांच्याबद्दल फारच काळजी वाटली. ब्रिटिश गुप्त हेरांच्या डोळ्यात धूळ फेकून आपण घरी परतावे ह्याबद्दल अय्यर ह्यांनी सुव्यवस्थित असा विचार करून जी एक योजना आखली होती तिचाच हा एक भाग होता हे आपण लौकरच पाहाणार आहोत.

---

# अय्यर आणि गांधी यांची भेट

युध्दभूमीवर दुःख करण्यास अगर विश्रांती घेण्यास अवसरच नसतो. प्रत्येक सैनिक सदा कंबर कसून युध्द पुढे नेण्यासाठी धडपडत असतो. आपल्या मृत सहकाऱ्यासाठी अश्रू ढाळण्यालाही त्याला सवड नसते. मदनलालच्या हौतात्म्यानंतर इंडिया हाऊस चमूचीही अशीच स्थिती झाली.

मदनलालच्या फाशीनंतर इंडिया हाऊसचे निवासी पुन्हा इंडिया हाऊसवर जमले आणि त्यांनी फ्री इंडिया सोसायटीच्या साप्ताहिक बैठका घेण्यास सुरुवात केली. दोन महिन्यानंतर त्यांनी दसरा साजरा करण्याचे ठरविले. दसऱ्याला ते राष्ट्रीय सण समजत. हा सण भारतात सर्वत्र साजरा केला जातो आणि तो न्याय व सत्य ह्यांचा अन्याय व असत्यावरील विजयाचे प्रतीक आहे. रेड्याचे तोंड असलेला महिषासूर ह्या दैत्यावरील दुर्गादेवीचा विजय ह्या सणास साजरा केला जातो. भारताच्या काही भागात रामाच्या रावणावरील विजयाचा स्मृतिदिन म्हणूनही हा साजरा केला जातो. नऊ दिवसाच्या तपस्येमध्ये देवतेची सर्व रूपे लक्ष्मी, सरस्वती आणि दुर्गा ह्यांची पूजा होते आणि दहाव्या दिवशी विजयादशमीला विजयोत्सव साजरा होतो. देशभक्तांच्या दृष्टीने विद्या, सपंत्ती आणि शौर्य ह्या सर्वांचा उपयोग लढाईमध्ये विजय मिळविण्यासाठी करावयाचा असतो.

सुदैवाने १९०९ साली विजयादशमी एका रविवारी आली. २४ ऑक्टोबरला प्रथम एक मेजवानी करून नंतर भाषणे करावीत असे ठरविण्यात आले. इंग्लंडमधील काही भारतीय पुढाऱ्यांकडून निराशा झाल्यामुळे कांहीसे अज्ञात असलेले दक्षिण आफ्रिकेतील तरुण नेते बॅ. मो. क. गांधी ह्यांना अध्यक्षस्थान स्वीकारण्याची विनंती करण्यात आली.

ह्या प्रसंगासंबंधीचे अय्यर ह्यांचे लंडन येथील बातमीपत्र म्हणते, "२४ ऑक्टोबरला दसऱ्यानिमित्त एक समारंभ आयोजित करण्याचे ठरले. श्रीयुत मो. क. गांधी ह्यांनी अध्यक्षस्थान स्वीकारावे ह्याबद्दल त्यांना विचारले होते. निमंत्रण पत्रात म्हटले होते की सभेनंतर मेजवानी होईल व श्री रामचंद्र आणि भारतमाता ह्यांना पुष्पहार अर्पण करण्यात येतील. बादशहा सातवे एडवर्ड ह्यांच्यासाठी आरोग्यपान (टोस्ट) नाही ह्याबद्दल

श्री. पाल हे फार नाराज झाले. त्यांनी संघटकांना आरोग्यपान का ठेवले नाही असे विचारले. संघटकांनी उलट विचारले, दसऱ्याचा आणि बादशहांचा संबंध काय ? श्री. पाल गप्प राहिले. पण ते समारंभाला हजर राहिले नाहीत. त्यांनी आपल्या मुलालाही पाठविले नाही. . . ." मोहनदास करमचंद गांधी हे दक्षिण अफ्रिकेत बॅरिस्टरचा व्यवसाय करीत असत. आपल्या अहिंसक सत्याग्रहाच्या नव्या तंत्रामुळे त्यांना एकाएकी प्रसिध्दी मिळाली होती. ह्या तंत्राचा यशस्वी वापर करून दक्षिण आफ्रिकेच्या शासनाला त्यांनी लोकमतापुढे शरण आणले होते. गांधीजींना यश मिळाले पण गोऱ्या लोकांनी आपली वचने मागे घेतली आणि गांधीजीना आपली चळवळ पुन्हा चालू करावी लागली. त्यांना अटक झाली आणि तीन महिन्यांची शिक्षा झाली. सुटकेनंतर द. आफ्रिकेतील भारतीयांचे एक शिष्टमंडळ ब्रिटिश पुढाऱ्यांना भेटण्यासाठी आणि त्यांच्या द.आफ्रिकेतील प्रश्नाविषयी सहानुभूती मिळविण्यासाठी गांधीजींनी स्वतःच्या नेतृत्वाखाली पाठविले. द. आफ्रिकेच्या शासनाचे दोन नेते जनरल बोथा आणि जनरल स्मटस् हेही त्यावेळी इंग्लंडमध्ये होते. गांधी १० जुलैला इंग्लंडला आले आणि १३ नोव्हेंबरला निराशेने परत गेले.

आपल्या फेरफटक्यात गांधीजी ब्रिटिश मुत्सद्यांना, वृत्तपत्रकारांना तसेच लंडनमधील भारतीय पुढाऱ्यांना भेटले. अय्यर ह्यांनी गांधीजींचा तपास मोठमोठ्या हॉटेलमध्ये केला. पण तेथे ते सापडले नाहीत. शेवटी निराश झाल्यावर त्यांनी लहानशा गल्लीतील एका भारतीयाच्या छोट्या घरात गांधीजींना हुडकून काढले. हा भारतीय लंडनमध्ये एक भारतीय पध्दतीचा खानावळ चालवीत असे. तेथे एका लहानशा खोलीत दोन तीन खुर्च्या होत्या. जमिनीवर एक जीर्ण सतरंजी होती. त्यावर एक गुंडाळलेले आंथरूण होते. तेथे युरोपीय पोषाखात असलेल्या गांधीजींनी अय्यर ह्यांचे सस्मित स्वागत केले.

अय्यरनी गांधीजींना आपल्या भेटीचा हेतू सांगितला. आमंत्रणाला स्वीकार वा नकार काहीच न देता गांधीजींनी भारताच्या स्वांतत्र्य चळवळीबाबतच्या तात्विक मुद्यांबद्दल चर्चा सुरू केली. अहिंसेच्या महत्तेचे त्यांनी प्रतिपादन केले. उलट अय्यरनी अहिंसेची निष्फळता आणि हिंसेची आवश्यकता मांडली. अशा तऱ्हेने काही वेळ गेल्यानंतर गांधीजींना अय्यरनी सांगितले की आपण सावरकरांना त्यांच्या भेटीस आणू. गांधीजीही सावरकरांना आणि त्यांच्या मित्रांना भेटण्यास उत्सूक होते.

अय्यरना गांधीजींची अहिंसा जरी पटली नाहीत तरी त्यांचा प्रामाणिकपणा आणि मोकळेपणा हे गुण त्यांना आदरणीय वाटले. त्या रात्री इंडिया हाऊसला परतल्यावर अय्यरनी डॉ. टी.एस्.एस्. राजनूना सांगितले, आज मला मानव जातीतील एक अत्यंत उमदी अशी व्यक्ती भेटली." अय्यरना गांधीजींनी इतके आकर्षित केलें होते.

दुसऱ्या दिवशी सावरकर गांधीजींना भेटले आणि उभयतांनी आपआपली तत्वप्रणाली तीन दिवस आग्रहाने प्रतिपादन केली. परंतु त्यांना परस्परांची खात्री पटविता आली नाही. गांधीजींनी अहिंसेचा त्याग करावा हे सावरकरांचे प्रतिपादन निष्फळ ठरले. गांधीजींनीही

तितक्याच निग्रहाने सावरकरांना हिंसेपासून परावृत्त करण्याचे प्रयत्न केले. इंडिया हाऊस मधील तरुणांचे शौर्य व समर्पणाची भावना ह्यांनी गांधीजी प्रभावित झाले. परंतु त्यांचा उत्साह अनाठायी आहे असे त्यांना वाटले. धिंग्राबद्दल गांधीजी म्हणाले, ''ज्यांना धिंग्राच्या किंवा भारतातील तत्सम कृत्यांमुळे भारताचा फायदा झाला असे वाटते त्यांची फार गंभीर चूक होत आहे. धिंग्रा हा देशभक्त होता पण त्याचे प्रेम आंधळे होते. त्याने आपले आयुष्य चुकीच्या पध्दतीने दवडले. त्याच्या कृत्याचे परिणाम विनाशकारी होतील.''

''बिचारे गांधी !'' अय्यरनी राजनूना सांगितले, ''चार दिवसांच्या चर्चेनंतर सुध्दा ते दुराग्रहीच आहेत. अहिंसेवरील त्यांचा विश्वास एखाद्या अंधश्रध्देसारखा आहे. परंतु स्वातंत्र्यासाठी शौर्यपूर्ण प्रयत्न करावे ह्या बद्दलचा त्यांचा विश्वास मात्र खराखुरा आहे. राजकीय क्षेत्रात केवळ अहिंसेनेच यश मिळेल हा त्यांचा विश्वास करुणास्पद आहे.''

हे मूलभूत भेद असूनही इंडिया हाऊस चमूने गांधीजींना दसरा महोत्सवासाठी प्रमुख पाहुणे म्हणून येण्याचा आग्रह केला. त्यांच्याप्रमाणे गांधीजीही आपले मतभेद विसरले आणि त्यांनी येण्याचे मान्य केले. परंतु आपण यावेसे वाटत असेल तर त्यांनी काही अटी घातल्या.

''ह्या उत्सवाचा हेतू कोणता ?'' त्यांनी विचारले. अय्यरनी सांगितले, ''इंग्लंडमध्ये ह्यावेळी सातशे पर्यंत भारतीय विद्यार्थी आहेत. ह्यापैकी बहुतेक श्रीमंत आईबापांची मुले असल्याने त्यांना आपल्या मातृभूमीचा काही विचार नाही. ते इंग्रजांचे अनुकरण करण्यात गर्क असतात. दसरा हे त्यांना एकत्र करण्याचे आणि त्यांच्यात भारतीय राष्ट्रीयत्व भिनविण्याचे केवळ एक निमित्त आहे. त्यावेळी एक मेजवानी होईल आणि नंतर भाषणे होतील. सहभागी होणारा प्रत्येकजण स्वतःच्या जेवणाचा खर्च देईल.''

गांधींनी कल्पनेचे स्वागत केले. परंतु त्यांनी म्हटले की इंग्रजी उपहारगृहात भेटणे आणि जेवणे निरर्थक आहे. प्रसंगाला जर काही महत्त्व द्यायचे असेल तर आपण मुख्य पाहुणे म्हणून येण्यास तयार आहोत. अय्यरनी उत्तर दिले, ''सर्वांसाठी भारतीय अन्न शिजविण्याचा तुमचा प्रस्ताव कठीण आहे. परंतु तुम्ही जे सुचविता ते अमंलात आणण्याचा आम्ही प्रयत्न करू.''

एक मोठा दिवाणखाना भाड्याने घेण्यात आला. पुरेशी भांडी जमविण्यात आली. सैपाकघरातले काम डॉ. टी.एस्.एस्. राजन् आणि एम्.पी. टी. आचार्य मिळून सहा स्वयंसेवकांनी अंगावर घेतले. अय्यरनी बाहेरची अनेक कामे पत्करली. सैपाकाची सामुग्री आणि मसाले जमविणे हे वेळखाऊ काम होते. सामान मिळविण्यासाठी अय्यरना दुकानामागून दुकाने धुंडाळावी लागली. आजच्या प्रमाणे त्यावेळी भारतीय अन्नपदार्थ लंडनमध्ये सहज मिळत नसत.

मेजवानीच्या आदल्या दिवशी अय्यर गांधीजींना दुसऱ्या दिवशीच्या कार्यक्रमाची आठवण देण्यासाठी त्यांना भेटण्यास गेले. त्यांनी मेजवानीची वेळ संध्याकाळी साडेसातची

आहे असे सांगितले.

सैपाकघरातील काम मेजवानीच्या दिवशी सकाळीच लौकर सुरू झाले. एक वाजताच डॉ. राजन् व इतरांनी आपआपले उद्योग सुरू केले. राजन् हे प्रमुख आचारी होते आणि त्यांना इतर तरुणांची मदत होती. सर्वांच्या अननुभवामुळे कामाची गती मंद होती.

त्यांनी कामाला सुरुवात केल्यावर अर्धा तास झाला असेल नसेल तेव्हढ्यात एक कृश शरीरयष्टीची आणि कुठल्याही तऱ्हेने नजरेत भरणार नाही अशी एक व्यक्ती आत आली. आणि त्यांनी इतरांना मदत करण्यास सुरुवात केली. कृश शरीराच्या ह्या गृहस्थाला अगदी कष्टाची कामे करण्यातही मोठा उत्साह होता. सर्व इंग्लंडमधील खूपशा भारतीय विद्यार्थ्यांना आमंत्रणे असल्याने हा एक अपरिचित आमंत्रित असेल असे सर्वांना वाटले. त्याच्या उत्साहामुळे डॉ. रामन् सारख्या धसमुसळ्या माणसाने त्याला खूपशी सटर फटर कामे करण्याच्या आज्ञा सोडल्या. 'टब धुवा, भाजी चिरा, बादलीतून पाणी आणा.' अशाही आज्ञा फर्मविल्या. इतरांबरोबर ही कामे कोठलाही आळस न करता ह्या गृहस्थाने केली. कोणीतरी त्याचे वर्णन केले, 'भारतातून आलेला बिचारा अभ्यागत' आणि सर्वांनीच त्याचे कौतुक केले.

संध्याकाळचे सहा वाजले आणि अय्यर बाहेरून परत आले. ते सैपाकघरात डोकावले आणि त्यांनी विचारले, ''काय सर्व ठीक आहे ना ? ''त्यांनी भारतातून आलेल्या त्या बिचाऱ्या पाहुण्याकडे पाहिले आणि त्यांना आश्चर्याचा धक्का बसला. पाहुणा कामात गर्क होता. जरा चाचरत त्यांनी विचारले, ''ह्यांना सैपाकघरात काम करायला कोणी सांगितले ? तुम्हाला माहीत नाही का . . . . '' वाक्य पुरे होण्याच्या आतच डॉ. राजन् म्हणाले, ''आम्हाला माहीत आहे हा गृहस्थ आमच्यापेक्षा अधिक उत्साही आहे.'' अय्यर फारच वैतागले, ''तुम्हाला कसे माहीत नाही, हे आपले मुख्य पाहुणे बॅ. मो. क. गांधी''.

सर्वांचा मोठा गोंधळ उडाला. राजन्नी नम्रतेने गांधीजींची माफी मागितली. अय्यरनी योग्य तऱ्हेने खेद व्यक्त केला. पण गांधीजींनी सबंध चेहराभर स्मित करीत म्हटले, ''मी कशाची क्षमा करणार आणि कोणाला ? मीच पहिला अपराधी आहे. मी तुम्हा सर्वांवर मोठा भार घातला. तुम्ही शाकाहारी मेजवानी करावी आणि तिची तयारीही तुम्हीच करावी ह्या माझ्या सूचनेबद्दल मीच तुमची क्षमा मागायला पाहिजे. पण तुमच्यासारखे तरुण असल्या कामासाठी पुढे येतात ह्या गोष्टीचा मला मोठा आनंद वाटला.''

पुढे जेवणाच्या तयारीचे काहीही काम करू न देण्याच्या प्रयत्नाला न जुमानता गांधीजींनी काम चालूच ठेवले. त्यांनी जेवणाच्या टेबलावरची अगदी शेवटची जागा घेतली आणि ती सुध्दा सर्व ताटे मांडून झाली आणि अन्न वाढून झाले तेव्हा.

मेजवानीनंतर भाषणे झाली. गांधीजींनी मुख्य पाहुणे म्हणून लहानसे भाषण केले. त्यात त्यांनी सावरकरांच्या व आपल्या विचारातील फरक सांगितला आणि ते पुढे म्हणाले की आपण अशा प्रसंगी एकत्र येऊन ऐक्यभावना आणि मातृभूमीवरील प्रेम प्रज्वलित करणे

ही गोष्ट महत्त्वाची आहे. अहिंसेच्या श्रेष्ठत्वावर त्यांनी भर दिला आणि सांगितले की अहिंसा ही भारताने जगाला दिलेली महान देणगी आहे. ह्यानंतर सावरकर बोलले आणि त्यांनी जे भाषण केले ते त्यांच्या उत्कृष्ट भाषणांपैकी एक होते. "आपल्यातील मतभेदांवर भर देण्याची आपली इच्छा नाही. आपला पूर्वकाळ दिव्य होता. परंतु आज आपण खातेऱ्यात लोळत पडलो आहोत. आपल्या मायभूमीच्या स्वातंत्र्यासाठी आपल्याला जे काही करता येईल ते करणे आपले कर्तव्य आहे."

१९०९ मध्ये गांधीजी हे तसे मोठे वक्ते नव्हते. सावरकर हे जन्मजात वाक्पटू होते. दोघांची भाषणे ऐकून जमलेल्या तरुणांनी सावरकरांची मोठी प्रशंसा केली. इंडिया हाऊसच्या निवासियांना असे वाटले की जर गांधीजींनी सावरकरांची आणखी काही भाषणे एकेली तर ते स्वतःची अहिंसा सोडतील आणि आपल्याला येऊन मिळतील.

गांधीजी मात्र स्वतःच्या ठाम विचारांबद्दल अविचल होते. महिन्याभरात जहाजाने द.अफ्रिकेला परत जातांना त्यांनी आपल्या "हिंद स्वराज्य" ह्या गुजराथी ग्रंथाचे लेखन केले. ह्या पुस्तकात लेखक व वाचक ह्यांच्या संवादांच्या द्वारा त्यांनी हिंसेवर श्रध्दा ठेवणाऱ्यांच्या सर्व कल्पना मांडल्या आणि स्वतःच्या अहिंसेच्या प्रतिपादनाने त्यांना उत्तरे दिली.

अय्यर गांधीजींना दुसऱ्या वेळेस साधारण सहा एक वर्षांनी फ्रेंच भारतात पाँडिचरी येथे भेटले. एक क्रांतिकारक आणि दुसरा अहिंसेचा भाष्यकार ह्यांच्यात पुन्हा एकदा चर्चासत्र झाले. पण ह्यावेळेस मतांतर झाले ते अय्यर ह्यांचे. अय्यर हे गांधीजींच्या अहिंसेचे भक्त झाले. ह्या दोघांची तिसरी भेट १९२४ मध्ये झाली. तेव्हा महात्मा गांधींच्या अध्यक्षपदाखाली झालेल्या बेळगाव काँग्रेसला अय्यर उपस्थित राहिले. चौथी भेट १९२५ च्या पूर्वार्धात केरळमधील वायकोम येथे झाली. तेथे अय्यर ह्यांच्या तमिळ गुरुकुलम् वसतिगृहयुक्त शाळेच्या वादात गांधीजींनी मध्यस्थी करावी, असे प्रयत्न केले गेले ही त्यांची शेवटची भेट.

---

# सावरकरांची अटक आणि नंतर

मदनलालच्या हौतात्म्यानंतर इंडिया हाऊसवरील पोलिसांचा पहारा अधिक कडक झाला. चोविस तास पहारा केल्यानंतर सुध्दा त्यांना सावरकर किंवा इतरांना गोवता येईल असा धागा दोरा सापडेना.

श्यामजींच्या ''दि इंडियन सोशिऑलॉजिस्ट'' ह्या एका पेनीला मिळणाऱ्या मासिकाचे मुद्रक गाय आल्ड्रेड ह्यांना अटक करण्यात आली आणि दुसऱ्या एका मुद्रकाच्या नशिबीही हेच आले. श्यामजींनी ह्यानंतर आपले पत्र पॅरिसला हलवले.

मदनलाल धिंग्रांचे दडपलेले निवेदन ज्याने पुस्तिका रूपाने छापले त्या मुद्रकाचा तपास करण्याचा ब्रिटिश पोलिस आटोकाट प्रयत्न करीत होते. त्यांना एव्हढेच कळू शकले की ते फ्रान्समधील मुद्रणाच्या ठशांनी छापले गेले होते. फ्रेंच मुद्रण ठसे इंग्रजी मुद्रण ठशांपेक्षा निराळे असतात. म्हणून पुस्तिका पॅरिसमध्ये श्यामजींकडून छापली गेली असावी हे त्यांनी ओळखले.

इंडिया हाऊस निवासियांना पोलिसांचा सक्त पहारा थोडा विनोदी वाटला. साध्या पोषाखातल्या पोलिसांचा ससेमिरा तुम्हाला त्रासदायक वाटत नाही का ? असे सावरकरांना विचारल्यावर त्यांनी त्या वृत्तपत्रकाराला सांगितले ''बाहेर, दिवसा आणि रात्री धुक्यात, पावसात आणि हिमवर्षावात - जर त्यांना हवेचा त्रास होत नसेल तर - उभे राहिले तरी माझी काही हरकत नाही''.

लंडनला गोष्टी अशा तऱ्हेने घडत असतांना भारत सरकार सावरकर व त्यांचे मित्र व नातेवाईक ह्यांना छळण्यात गुंग होते. सावरकरांच्या सासऱ्यांना नोकरीतून काढून टाकण्यात आले. त्यांचे धाकटे भाऊ केवळ सतरा वर्षांचे तरुण, नारायण सावरकर ह्यांना व्हॉईसराय लॉर्ड मिंटो ह्यांच्यावर अहमदाबाद येथे झालेल्या बॉम्ब हल्ल्याबद्दल अटक करण्यात आली. त्यांचे वडील भाऊ गणेश सावरकर ह्यांना राजाच्या विरुध्द युध्दाला मदत करण्याच्या आरोपावरून शिक्षा झाली आणि त्यांना नाशिक तुरुंगात ठेवण्यात आले. पुढे

त्यांना जन्मठेपेची शिक्षा झाली. ह्याचा अर्थ त्यांना उरलेले आयुष्य अंदमानमध्ये काढावे लागणार होते.

ह्या बातमीने सावरकरांची प्रकृती जवळ जवळ ढासळली. ह्या बरोबरच पोलिसांचा कायमचा ससेमिरा ही एक अडचण होती. अय्यरनी आणि सावरकरांच्या इतर मित्रांनी त्यांची हळूवारपणे सेवा केली आणि वैद्यकीय सल्ल्याप्रमाणे त्यांना वेल्समधील एका रूग्णालयात ठेवले. तेथे गेल्यावर साधारण एक पंधवड्याच्या आतच एका सायंदैनिकात सावरकरांनी बातमी पाहिली, "अनंत कान्हेरे ह्या चित्पावन ब्राम्हणाने ए.एम्.टी. जॅक्शन ह्या नाशिकच्या जिल्हाधिकारी व दंडाधिकाऱ्याचा खून केला. खुनाचे कारण गणेश सावरकरांच्या जन्मठेपेचा बदला घेणे हा होता."

नाशिकच्या बऱ्याचशा मित्रांवर कटाचा व बादशहांविरुध्द युध्द करण्याचा आरोप ठेवण्यात आला. युरोपीय मालकीच्या भारतीय वृत्तपत्रांना सावरकरांच्या रक्ताची तहान लागली आणि त्यांनी सावरकर हे ह्या सर्व प्रयत्नांमागील प्रमुख सूत्रचालक आहेत असे मानले. ब्रिटिश सरकार सावरकरांना अद्याप मोकळे का ठेवते असे त्यांनी विचारले.

रुग्णालयात बरे होत असतांना आपली वेळ आता आली आहे, असे सावरकरांना कळून चुकले. त्यांच्या मित्रांनी त्यांना खाडी ओलांडून पॅरिसला जाण्याचा आग्रह केला. श्यामजी व मादाम कामा ह्यांचाही सल्ला तसाच होता. सरते शेवटी अभिनव भारतच्या कार्यकारिणीने एक ठराव केला आणि त्यात म्हटले की स्वतःचे आरोग्य व सुरक्षितता भावी कार्याच्या दृष्टीने महत्त्वाची असल्यामुळे सावरकरांनी ताबडतोब पॅरिसला जावे. पण सावरकर पळून जाण्यास नाखूष होते. ते लंडनला परत आले. अभिनव भारतची बैठक झाली आणि तीत त्यांना पॅरिसला जाण्याची विनंती करण्यात आली. अखेर त्यांनी मान्यता दिली. सावरकर उपस्थित राहू शकले अशी ही अभिनव भारतची शेवटची बैठक होती.

सावरकरांनी संरक्षणासाठी बरोबर एक वाटाड्या घेतला आणि त्याच्याबरोबर ते पॅरिसला आले. तेथे त्यांचे श्यामजी आणि मादाम कामा ह्यांनी स्वागत केले. काही काळानंतर काही महत्त्वाच्या आणि गुप्त बाबींबद्दल सल्ला घेण्यासाठी अय्यर ह्यांनी पॅरिसचा प्रवास केला. तेथे त्यांना सावरकर लंडनला येण्याबद्दल खूपच उत्सुक दिसले. आपल्या निकटवर्तियांना आणि प्रिय जनांना तुरूंगात यातना भोगाव्या लागत असता आपण मात्र पॅरिसला सुरक्षित राहात आहोत याबद्दल त्यांच्या मनाला यातना होत होत्या. जे काही झाले होते ते भारतात झाले होते आणि त्यांचा त्याच्याशी काहीही संबंध नव्हता. परंतु लंडनला आल्यावर भारतातील आरोपींसाठी झगडण्याला संधी होती. अनेक निष्कासितांचे आणि क्रांतिकारकांचे आश्रयस्थान म्हणून लंडनची प्रसिध्दी होती. तिसऱ्या नेपोलियनला ठार करणारा इटालीचा क्रांतिकारक ऑरसीनी, जर्मन समाजवादी आणि साम्यवादी विचारप्रणालीचा जनक कार्लमार्कस् आणि इतर अनेक लंडनमध्ये छळवाद न होता राहिले होते. आपणही तेथे सुरक्षित राहू असे सावरकरांना वाटत होते.

पण ब्रिटिश लोकांची त्यांच्या स्वतःसारख्या श्वेतवर्णीय लोकांशी होणारी वागणूक आणि आपल्यासारख्या काळसर भारतीयांशी होणारी वागणूक ह्यात फरक आहे हे सावरकर विसरले आणि हा फरक भारतीयांच्या संपत्तीवर साम्राज्य गबर होत असतांनाही दिसत होता. ही गोष्ट नवलाची होती !

श्यामजींसारख्या वडीलधाऱ्यांचा सल्ला न जुमानता सावरकरांनी कॅलेला जाणारी आगगाडी पकडली आणि खाडी ओलांडून ते डोव्हर येथे दुसऱ्या गाडीत बसले. लंडनच्या फलाटावर येतास साध्या पोषाखातील गुप्त पोलिसांच्या एका तुकडीने त्यांच्याकडे धाव घेत ओरडत म्हटले, "हे सावरकर आले," त्यांना काळजीपूर्वक धरले जाऊन प्रतिक्षागृहात नेण्यात आले. तेथे त्यांच्या अटकेचा हुकूम वाचण्यात आला. नंतर त्यांना अटक करण्यात आली व औपचारिकपणे ताब्यात घेण्यात आले.

आपल्या नेत्याच्या अटकेमुळे अय्यर अनेक कामांच्या उद्योगात व्यग्र राहिले. यादीत आपलाही पुढचा क्रमांक लागेल हे त्यांना माहीत होते. परंतु स्वतःच्या अटकेची टांगती तलवार मस्तकावर असूनसुध्दा त्यांनी सावरकरांच्या बचावाची तयारी करण्याचे काम अंगावर घेतले. सावरकरांचा खटला चालविण्यासाठी त्यांनी श्री. व्हॉन नावाचे सॉलिसिटर ठरवले आणि पॅरिसमधील मित्रांना निधी उभारण्यासाठी पत्रे लिहिली.

सावरकरांना अटक झाली ती १३ मार्च १९१० रोजी पॅरिसहून परतल्यावर. लंडनच्या व्हिक्टोरिया स्टेशनवर. त्यांना पकडण्याचे अधिपत्र मुंबई सरकारने तारेने काढले होते. त्यांना अटकेचा सल्ला देणारा हुकूम फरारी गुन्हेगार कायद्याप्रमाणे (फ्युजिटिव्ह ऑफेंडर्स ॲक्ट) काढला होता. त्यांच्यावर एकंदर पाच आरोप होते.

१) बादशहांविरुध्द युध्द करणे अथवा तशा युध्दात मदत करणे २) बादशहांचे भारतातील सार्वभौमत्व पूर्णपणे अथवा अंशतः नष्ट करणे ३) नाशिकचे जिल्हाधिकारी ए.एम्.टी. जॅक्सन ह्यांच्या खुनाला हत्यारे जमवून व ती वाटून मदत करणे ४) लंडनहून युध्द करणे. ५) १९०६ साली भारतामध्ये आणि १९०८-९ साली लंडनमध्ये राजद्रोहाची भाषणे करणे.

बो स्ट्रीट पोलिस न्यायालयात प्राथमिक चौकशी झाल्यावर सावरकरांना जामीन नाकारण्यात आला आणि २० मार्चला त्यांना ब्रिक्स्टन कारागृहात पाठविण्यात आले. अटकेत असता त्यांना अय्यर प्रथम १५ मार्चला व नंतर ब्रिक्स्टन तुरूंगात २० मार्चला भेटले. सावरकरांच्या बचावाची तयारी केल्यानंतर त्यांनी श्यामजींना लिहिले :

८१ क्लॅरेंडन रोड,<br>उत्तर केन्सिंग्टन पश्चिम<br>१५ मार्च १९१०

प्रिय पंडितजी,

मला कळविण्यास अत्यंत वाईट वाटते की आपले प्रिय सावरकर हे एक्सप्रेस

गाडीतून उतरल्याबरोबर त्यांना 'खुनाला मदत' आणि 'भारतामध्ये राजद्रोह' ह्या आरोपांखाली अटक करण्यात आली. मी तुम्हाला काल लिहिले असते पण सावरकरांना जाऊन भेटेपर्यंत थांबावे असे मला वाटले. मी तुमच्यासाठी सोबत "डेली टेलिग्रॅफ" मधील एक कात्रण पाठवीत आहे. त्यातील वृत्तावरून न्यायालयात काल काय झाले याची अचूक माहिती होईल. एका सॉलिसिटरची नियुक्ती करण्यात आली आणि त्याने काल खटला चालविला. त्याने मला सांगितले की जर एखादा वकील अधिकृत दिला तर येथेच खटला चालविता येईल आणि त्यांचे निरपराधित्व सिध्द करता येईल, अय्यरनी आणि ह्यात तिळमात्र शंका नाही. तुम्हाला जर एखादा कायदेशीर मुद्दा सुचत असेल तर कृपा करून मला कळवावे. म्हणजे सॉलिसिटर आणि बॅरिस्टर ह्यांना मी तो समजावून सांगेन.

आज सकाळी मी सावरकरांना भेटलो. ते नेहमीसारखेच होते— पण आम्हाला आमचे संभाषण लोखंडी गजांमधून करावे लागत होते. पण माझ्या मनाला हे फारच लागले की त्यांना एका इंग्रज तुरूंगात खितपत पडावे लागत आहे. शिकाऱ्यांच्या तावडीत सापडलेला हा सिंह. तुरूंगाचे अधिक्षक वगैरे आपल्याकडे योग्य लक्ष देत आहेत व आपली काळजीही घेत आहेत असे त्यांनी मला सांगितले. त्यांची कुठलीही तक्रार नाही. ते काही काळ तुमच्याबरोबर सुरक्षित होते. आता तुम्हाला आणि सौ. श्यामजींना त्यांच्याबद्दल किती दुःख होईल ह्याची मला कल्पना आहे. परंतु गत गोष्टींबद्दल शोक करण्यात अर्थ नाही. त्यांना भारतात पाठवले जाणार नाही याची आपण खबरदारी घेतली पाहिजे. जर त्यांना तिकडे पाठविले तर आपण त्यांना पुन्हा पाहू शकणार नाही आणि मातृभूमीचा एक अत्यंत प्रिय आणि निष्ठावान सुपुत्र एका मलेरियाने व्यापलेल्या बेटात खितपत पडेल. आज सकाळीच सावरकर म्हणाले की आपल्याला जर अंदमानला पाठविण्यात आले तर वडील बंधूची गाठ पडण्याचे सुख तरी होईल. त्यांचे हे बोलणे किती करुणास्पद होते ! अशातऱ्हेचे विषण्ण सुख त्यांच्या वाटेला येणार नाही, त्यांची सुटका होईल आणि स्वतःच्या मतांप्रमाणे ते आपल्या देशाच्या मुक्तीसाठी यत्न करतील अशी आपण आशा करू या.

सौ. श्यामजी व इतर साऱ्या मित्रांना माझे नमस्कार.

आम्ही सावरकरांच्या बचावासाठी निधी गोळा करीत आहोत. तुम्हाला निधीसाठी काही पैसे द्यावयाचे असतील तर कृपया माझ्याकडे पाठवा.

आजे जे दिसते त्यावरून एकूण खर्च २०० पौंडापर्यंत येईल असे वाटते.

वंदेमातरम् !

व. वे. सु. अय्यर

पं. श्यामजी कृष्ण वर्मांनी ताबडतोब उत्तर लिहिले. त्यांनी त्याच दिवशी कळवले :

मार्च १०, १९१०

प्रिय श्री. अय्यर,

आपले प्रिय तरुण मित्र सावरकर ह्यांना आपल्या देशावर जुलूम करणाऱ्यांनी

एकाएकी आपल्यातून नेल्याबद्दल मला किती तीव्र दुःख झाले हे शब्दात सांगता येणार नाही. मला केव्हडे आश्चर्य आणि भीती वाटली ह्याची कल्पना तुम्हाला मी सांगितल्यावरच येईल. ह्या आपल्या भक्तियुक्त देशबांधवाला परावृत्त करण्याचा मी प्रयत्न केला असताही ते इंग्लंडला परत गेले आणि पॅरिस सोडण्यापूर्वी जवळजवळ एक आठवडा त्यांची व माझी भेटही झाली नाही ह्यामुळे माझा विषाद अधिकच वाढला.

सोबत मी १० पौंडाचा चेक धाडीत आहे. त्याचा उपयोग तुम्हाला योग्य वाटेल त्या मार्गाने सावरकरांसाठी करावा. परंतु केवळ वकील लोकांवर खर्च करून तो फुकट घालवू नये अशी माझी इच्छा आहे.

आपला विश्वासू,
श्यामजी कृष्ण वर्मा

मदनलाल धिंग्राच्या हौतात्म्यानंतर सावरकरांना इतक्या लौकर झालेल्या अटकेचा अय्यर ह्यांच्यावर जणू विद्युत्पातासारखा परिणाम झाला. एक तीव्र विषादाची भावना त्यांच्या हृदयात खोल शिरली. ते नखशिखान्त बदलले. भवितव्यता आपल्यासाठी जी नवी भूमिका तयार करीत होती ती त्यांना आता स्पष्ट कळली. त्यांचे समर्पण पूर्ण झाले.

तीन महिन्यांच्या अवधीत त्यांचा बॅरिस्टरीचा अभ्यास पूर्ण होणार होता आणि त्यांना बॅरिस्टर ही उपाधी मिळणार होती. श्यामजी कृष्ण वर्मा आणि सावरकर ह्यांच्या सारख्यांना जेथे त्यांच्या राजकीय मतप्रणालीमुळे बॅरिस्टरांच्या यादीतून काढून टाकले होते. तेथे आपण बॅरिस्टर होणार काय ? ज्या राजाला पदच्युत करणे हे भारतात आपण जतन केलेले साध्य आहे त्याच्याशी आपण एकनिष्ठेची शपथ घेणे योग्य आहे काय ? सावरकरांसारखे आपले साथी अंदमानात खितपत पडणार असता आपण मात्र समृध्द असे जीवन घालवणार काय ?

ब्रिस्टल तुरूंगात अय्यर जेव्हा सावरकरांना भेटले तेव्हा सावरकरांना अय्यर यांच्यामध्ये इतका बदल झाल्यासारखा वाटला की त्याचा त्यांच्या मनावर कायमचा ठसा उमटला. १९२५ साली अय्यर ह्यांच्या निधनाच्या वेळी सावरकरांनी अय्यर ह्यांच्यामधील ह्या बदलाचे एक अविस्मरणीय चित्र रेखाटले आहे. आपली व त्यांची १९०७ साली इंडिया हाऊसमध्ये झालेली भेट व आताची १९१० ची भेट ह्यात त्यांना फरक दिसला. त्यावेळी अय्यर हे एखाद्या खुशाल चेंडूसारखे होते. देशाबद्दल त्यांच्या मनात कोठलाही विचार नव्हता. सावरकरांनी लिहिले :

''१९१० साली मार्चच्या सुमारास ब्रिस्टल येथे लंडनच्या त्या भयानक तुरूंगात आम्ही कैदी म्हणून नुकतेच दाखल झालो होतो. पहारेकऱ्याने भेटीसाठी येणाऱ्यांच्या नावाचा पुकारा केला. आम्ही काळजीपूर्ण उत्सूकतेने कैद्यांच्या रांगेतून भेटण्याच्या जागेकडे गेलो. आम्ही गजांआड उभे राहिलो. आम्हाला भेटायला येऊन लंडन पोलिसांची इतराजी ओढवून घेणारे कोण असेल ह्याचे आम्ही आश्चर्य करीत होतो. कारण भेटायला येऊन

आमची ओळख दाखविणे ही अखेर तुरूंगाच्या गजाआड जाण्याची निश्चित पायरी होती. भेट घेणारांना आत येऊ दिले ते खिडकी जवळून गेले. लौकरच एक उमद्या व्यक्तिमत्वाची व्यक्ती आमच्या समोरील बंदिस्त जागेत येऊन उभी राहिली. ही व्यक्ती म्हणजे व्ही. व्ही. एस. अय्यर. त्यांची दाढी छातीला चिकटून रूळत होती. त्यांचा पोषाख गबाळा होता. ते आता पूर्वीसारखे अत्यंत व्यवस्थित आधुनिक पध्दतीचा पोषाख केलेले 'जंटलमन' नव्हते. त्यांची सर्व शरीरयष्टी आता जीवित समर्पणाच्या कृत्याने पालटून गेली होती. ''नेताजी!'' त्यांनी भावनापूर्ण स्वरात आम्हाला संबोधिले, ''तुम्ही पॅरिस सोडून का आलात ?'' आम्ही त्यांचे सात्वंन करीत म्हटले, ''ह्याची चर्चा येथे करण्यात काय अर्थ आहे ? बरोबर असो की चूक असो मी येथे तुरूंगात पुढे काय करायचे आणि वर्तमानकाळाला तोंड कसे द्यायचे हा आहे.

''आम्ही पुढील बेताची चर्चा करीत असताच घंटा झाली. द्वाररक्षक पळत आले आणि त्यांनी दराडावून आम्हाला सांगितले. 'आता वेळ झाली.' जड अंतःकरणाने आम्ही एकमेंकाच्या डोळ्यांकडे पाहिले. कदाचित ही एकमेकांना पहाण्याची शेवटचीच वेळ असेल हे आम्हाला कळले. अश्रू उभे राहिले ते दाबून आम्ही म्हटले, ''छे छे. आपण हिन्दू आहोत. आपण गीता वाचली आहे. ह्या सहानुभुतीशून्य लोकांच्या घोळक्यापुढे आपण रडणे योग्य नाही. आम्ही हिन्दीत बोललो. जिज्ञासू इंग्रज लोकांचा घोळका तरुण भारतीय, बंडखोर आणि त्याचा मित्र ह्यांच्याकडे पाहात होता. आम्ही एकमेकांपासून दूर झालो. ते दिसेनासे होईपर्यंत मी त्यांच्याकडे पाहिलं आणि म्हटले, ''अरेरे ! ह्या प्रेमळ माणसाची आणि माझी भेट होणे आता जवळ जवळ अशक्य आहे. कारण भवितव्यात माझ्यापुढे दोन गोष्टीपैकी कोणती तरी एकच उभी राहणार होती. फाशी किंवा अंदमान ! आणि ह्या दोन्हीमध्ये माझ्या मित्रांना पहाणे अशक्य होते.''

भविष्यकाळाची कल्पना करून येथे असे म्हणता येईल की हे दोघेही प्रत्यक्षात उतरले. चौदा वर्षांनंतर जेव्हा हे दोघेही भारतात स्वंतत्र म्हणून भेटले तेव्हा त्यांची रत्नागिरीला गाठ पडली आणि एकमेकांपाशी अशा दृढ आशा व्यक्त केल्या की यापुढे आपल्याला पाहिजे तितक्या वेळा भेटता येईल. पण ह्या बाबतीत त्यांना आडसर आला तो दृष्ट दैवाचा. त्याने अय्यरना अत्यंत अनपेक्षितपणे जून १९२५ मध्ये आपल्यामधून नेले.

सावरकरांविरूध्दचा खटला ब्रिटिश न्यायालयात संबंध एप्रिल, मे १९१० पर्यंत रेंगाळला. सावरकरांबद्दल श्यामजी कृष्ण वर्मा ह्यांना अय्यर लिहितात. :

४ एप्रिल १९१०

प्रिय पंडितजी,

खटला कंटाळवाणेपणाने चालू आहे. भारतातून अजून कागद आलेले नाहीत आणि त्यामुळे प्रिय सावरकर आणि त्यांचे मित्र, ह्यांना जसे शक्य होईल तसे दुःख सहन करावे लागत आहे. कोणीतरी मित्र किंवा इतर त्यांना तुरूंगात जाऊन भेटतो. ते बाहेर होते तसेच

तुरूंगातही आनंदी आहेत. आवश्यक ती पुस्तके आणि वृत्तपत्रे वाचण्यास देण्यात येतात. भारतातून कागदपत्रे येथे शनिवारी येतील आणि न्यायाधिशांच्या हातात लाल फितीपासून होणारा सर्व उशीर संपल्यावर तेरा तारखेस पडतील. मगच आपल्याला न्यायालयातून नकला मिळतील.

देशबंधू सावकरांनी मला तुम्हाला विनंती करायला सांगितले आहे की तुम्ही जर त्यांच्या शिष्यवृत्तीची उरलेली रक्कम त्यांना दिलीत तर त्यांच्याजवळ येथे जे थोडेफार आहे ते त्यात घालून ते आपल्या भावजयीला पाठवतील. अशा तऱ्हेने काही काळ तरी त्यांची काळजी दूर होईल. तुम्ही मला जर पैसे पाठवले तर मी त्याची पावती तुम्हाला पाठवीन आणि देशबंधू सावरकरांना सांगितल्याप्रमाणे त्याचे काय करायचे ते करीन.

त्यांनी तुम्हाला अशीही विनंती केली आहे की तुम्ही अत्यंत कृपाळूपणे देशबंधू चट्टोपाध्याय ह्यांना जी शिष्यवृत्ती दिली आहे, तीही तुम्ही तुमच्या सोईप्रमाणे लवकरात लवकर इकडे पाठवावी. देशबंधू चट्टोपध्याय यांचे देशप्रेम आणि ते करीत असलेली भारतमातेची सेवा यांमुळे त्यांना इतर कोणाहीपेक्षा सहाय्य करणे योग्य आहे.

आपला विश्वासू,.
व. वे. सु. अय्यर

वर ज्यांचा संदर्भ दिला आहे, ते चट्टोपाध्याय म्हणजे भारताच्या प्रसिद्ध कवयित्री सरोजिनी चट्टोपाध्याय आणि हरिन्द्रनाथ चट्टोपाध्याय यांचे बंधू. वीरेंद्र हे क्रांतिकारी म्हणून सुविख्यात झाले, रशियाला गेले आणि तेथून कोठलाही धागादोरा मागे न ठेवता अदृश्य झाले.

(भारतातून आलेल्या कागदात सावरकर आणि त्यांचे सहाय्यक यांचे धक्कादायक अशी गोष्टी होती त्या कागदात हरिश्चंद्र कोरगावकर ह्यांची जबानी होती.) कोरगावकर १९०८- ९ मध्ये फ्री इंडिया हाऊस देशभक्तांच्या सर्व गुप्त गोष्टी फोडल्या होत्या. कोरगावकर माफीचा साक्षीदार झाला होता आणि १२० पानांच्या ह्या जबानीत इंग्लंडमधील भारतीय विद्यार्थ्यांना क्रांतीच्या वाटेवर नेण्याचा सर्व दोष त्याने सावरकरांना दिला होता.

दुसरा धक्का होता चेंचेरी रामराव ह्याचा जबाब. रामराव रंगूनहून लंडनला स्वच्छता अभियंता (सॅनिटरी इंजिनियरिंग) पदाच्या उच्च अभ्यासासाठी आला होता. सावरकरांनी आपल्याला भारतात नेण्यासाठी पिस्तुले दिली असे त्याने जबाबात सांगितले. हे धादांत खोटे होते.

रामराव डॉ. राजन्ना रंगूनापासून माहित होता. राजन् आणि अय्यर ह्यांना तो लंडनला भेटला आणि त्याने दोघांचीही चांगली मैत्री संपादन केली. एक वर्षात आपला अभ्यासक्रम संपवून रामराव भारतात गेला. परत प्रवासाच्या वाटेवर तो अय्यर यांच्याकडे पॅरिसमध्ये एक अठवडा राहिला. त्यावेळेस अय्यर ह्यांनी रामरावांना काही पिस्तुले दिली व ती मुंबईतील एका संबंधिताला देण्यास भाग पाडले. अय्यरनी रामरावकडे एक बनावट तळ

असलेली पेटी दिली आणि तीत पिस्तुले भरली. फ्रेंच बंदरावर कस्टमच्या तपासणीतून ही पेटी जावू देण्यास रावला त्यानी मदत केली. परंतु जहाज जेव्हा मुंबई बंदराला लागले; तेव्हा भारतीय आधिकाऱ्यांनी रामरावाची पेटी तपासली आणि त्यांना पिस्तुलांचा शोध लागला व त्यांनी रामरावाला अटक केली. त्याला दोन वर्षांची सजा लागली.

रामराव दुबळा असल्यामुळे तुरूंगातील जीवनाच्या कठोर वागणुकीने खचला. अय्यर आणि राजन् यांच्या सहवासात तो शूर आणि देशभक्त बनला. परंतु तुरूंगात तो अधिकाऱ्यांच्या हातातील त्यांनी सांगितलेले ऐकणारा एक बाहुले बनला. नाशिक येथे जॅक्सनला ज्या पिस्तुलाने ठार केले, ते पिस्तुल सावरकरांनी पाठविलेले होते असे भारतीय आधिकाऱ्यांना सिध्द करावयाचे होते. परंतु त्यांच्याकडे पुरावा नव्हता. येथे त्यांना रामराव उपयोगी पडला. त्याच्याकडून त्यांनी असा जबाब घेतला की, त्यांच्या पेटीत सापडलेली पिस्तुले सावरकरांनी लंडन येथे असताना ठेवली होती. या भयानक खोटेपणाबद्दल आणि दगलबाजीबद्दल रामरावाला माफी मिळाली आणि भारतीय पोलिस दलात नोकरीही मिळाली.

सावरकरांना इंग्लंडमध्ये ठेवण्याचे अय्यर यांनी प्रयत्न केले. तरीसुध्दा बो स्ट्रीट पोलिस न्यायालयाने १२ मे १९१० रोजी सावरकरांना भारतात न्यावे व तेथे त्यांच्यावर खटला चालवावा असा हुकूम दिला.

सावरकरांचे वकील व्हॉन ह्यांनी विभागीय न्यायालयात त्यांना भारताला नेण्याच्या हुकूमाविरूध्द एक बंदी प्रत्यक्षीकरण्याचा अर्ज (रिट ऑफ हेबियन्स कॉर्पस्) दिला. तो सरन्यायाधीश व्हॉन विल्यमस् ह्यांच्यापुढे २ जूनला सुनावणीसाठी आला व तो त्यादिवशी व दुसऱ्या दिवशी ऐकला गेला. पोलिस न्यायालयाचा निर्णय सर न्यायाधीशांनी मान्य केला.

अपील कोर्टापुढे आणखी एक विनंती अर्ज करण्यात आली. बहुसंख्य न्यायाधीशांच्यावतीने बोलताना पुन्हा एकदा सर न्यायाधीश व्हॉन विल्यमस् ह्यांनी सावरकरांना भारताला पाठविण्याचा निर्णय मान्य केला. विरूध्द मत देणारे एकमेव न्यायमूर्ती कोलरिज हे होते.

हे होत असताना भारतामध्ये खास वटहुकूमाने सावरकरांच्या खटल्यासाठी एक विशेष न्यायाधीकरण नियुक्त करण्यात आले. विशेष न्यायाधीकरणाचा अर्थ असा की त्या अन्वये ज्युरीची नियुक्ती होणार नव्हती आणि न्यायाधीकरणाने दिलेल्या न्यायालयाविरूध्द अपील करण्याची मुभा नव्हती. सावरकरांपुढे आता फाशी किंवा अंदामान या पैकी कोणतीतरी एक मेजवानी अपरिहार्यपणे वाढून ठेवली होती असे दिसत होते.

ह्या कायदेशीर लढाया लढल्या जात असताना भारतीय क्रांतिकारांच्या आयरिश मित्राने सावरकरांना अटकेतून सोडविण्याच्या काही साहसी योजना आखल्या. दोन बेत करण्यात आले. पहिला बेत या प्रमाणे- एका भारतीयाने त्यांना तुरूंगात भेटायला

जावयाचे, त्यांना पळून जाण्यास मदत करायची आणि तुरूंगात त्यांची जागा स्वतः घ्यायची. आयरिश मित्रांच्या साहाय्याने एक योजना तपशीलासह करण्यात आली तीमध्ये अनेक सहासपूर्ण गुंतागुंती होत्या. परंतु हा बेत यशस्वी झाला नाही. नंतर दुसरा बेत प्रत्यक्षात आणण्याचा प्रयत्न झाला. या बेताप्रमाणे सावरकरांना न्यायालयातून आणित व नेत असता पोलिसांच्या गाडीला चकवून दुसरीकडे न्यायचे असे ठरले होते.

एक दिवस सावरकरांचे मित्र पोलिसांच्या गाडीची वाट पाहत दबा धरून बसले. परंतु काय झाले कोणास ठाऊक. त्यांनी ज्या गाडीला दुसऱ्या वाटेला नेण्याचा प्रयत्न केला. ती रिकामीच निघाली. सावरकरांना दुसऱ्या वाहनातून नेण्यात आले होते. सावरकरांची सुटका करण्याचे हे अयशस्वी प्रयत्न डेव्हीड गार्नेट या कांदबरीकाराने आपल्या ''दि गोल्डन एको'' या आत्मवृत्तात वर्णन केले आहे. महाविद्यालयीन विद्यार्थी असताना गार्नेटने लंडनमध्ये भारतीय विद्यार्थ्यांशी मैत्री केली होती.

हे दोन प्रयत्न अयशस्वी झाले, तरी अय्यर आणि इतर सावरकरांना भारतात नेण्या अगोदर त्यांची सुटका करण्याच्या इतर योजना आखित होते. परवानगी मिळेल त्या वेळेस अय्यर सावरकरांना दिलासा देणारी पत्र लिहित होते.

१९१० पर्यंत अय्यर यांच्या बॅरिस्टरीचा अभ्यास आणि ती उपाधी मिळविण्याची त्यांची तयारी पुरी झाली. ज्या मूळ हेतुने ते आले होते तो आता पूर्ण झाला होता. परंतु अय्यर आता पूर्णपणे पालटले होते. बॅरिस्टरीची उपाधी प्रदान करण्याची वेळ आली असता अय्यर ह्यांनी राजनिष्ठेची शपथ घेण्याचे निश्चितपणे नाकारले. कारण या राजाला भारताचा राजा म्हणून मान्यता देण्यास ते तयार नव्हते. तशीच वेळ आली तर ते बॅरिस्टरीच्या यादीतील नाव नोंदणीस नकार देण्यास तयार होते. त्यांचा निर्णय अपरिवर्तनीय होता. त्यांनी भारताच्या स्वातंत्र्याला संपूर्णपणे वाहून घेतले होते.

अय्यर यांच्या गुणांचा मातृभूमीसाठी कसा उपयोग करावा ह्याबद्दल त्यांचे मित्र विचार करीत होते. लाला हरदयाल ह्यांनी सरदार सिंगजी राणा ह्यांना पत्र लिहिले व पॅरिस येथे भारतीय क्रांतिकारक प्रकाशीत करीत असलेल्या ''वंदे मातरम्'' या पत्राचे संपादकत्व अय्यर ह्यांना देता येईल की काय ह्याबद्दल चौकशी केली.

परंतु अय्यर ह्यांचे मन सावरकरांमध्ये आधीच गुंतले होते.

२१ जूनला त्यांना सावरकरांकडून तुरुंगातून एक पत्र आले. सावरकरांनी त्यांना प्रेमाने 'ऋषी' असे संबोधिले. ही उपाधी अय्यरना दोन कारणांनी चपखल बसत होती. एक तर त्यांचा स्वभाव आणि दुसरे म्हणजे त्यांची झुडुपासारखी दाढी. भोवतालच्या अंधारात सुध्दा सावरकरांना अय्यर ह्यांची दाढीवरून थट्टा कराविशी वाटली. त्यांनी पत्रात लिहिले.

ब्रिक्स्टन तुरूंग
२१ जून १९१०



श्री स्वातंत्र्य लक्ष्मी प्रसन्नम् !

प्रिय ऋषी,

आतापर्यंत तुम्हाला दोन किंवा तीन पत्रे मिळाली असतील. कृपया ती पोचल्याचे कळवा. खटल्याचा आज शेवटचा दिवस होईल असे दिसत नाही. अर्थात् निकाल काय होईल हे आपल्या दोघांनाही माहीत आहे. उद्या औपचारिक निकाल दिला जाईल.

प्रिय ऋषी, ह्यावेळेपर्यंत मला येथील अन्नाची आणि राहण्याच्या पध्दतीची चांगली सवय झाली आहे. मी काही विशेष प्रकारचे अन्न पहिल्यापासूनच मागितले नाही हे चांगले झाले. आता माझे हद्दपारीची शिक्षा झालेला कैदी म्हणून रूपांतर होण्यास, कपडे बदलायचाच अवधी आहे.

माझी प्रकृत्ती उत्तम आहे. माझे वजन दोन पौंडांनी वाढले आहे. (वजनातील वाढ चार पौंड वजनाच्या दाढीमुळे झालेली नाही !) तुम्हाला हे ऐकून आनंद वाटेल अशी खात्री आहे. पूर्वी तुम्ही अनेक वेळा लिहिलीत तशी मनाला उन्नत करणारी पत्रे लिहीत चला. मी परवा न्यायालयात पूर्वसिध्द असा निर्णय ऐकण्यासाठी चाललो होतो, तेव्हा तुमचे एक पत्र मिळाले. त्यामुळे मी आपल्या दोघातले अंतर विसरलो आणि मला वाटले की माझा ऋषी माझ्याजवळ एखाद्या बैठकीत बसला आहे. किंवा खोलीत माझी शुश्रुषा करीत आहे. किंवा लोकांची उन्नती कशी करावी ह्या उदात्त विषयावर माझ्याशी बोलत आहे. एका मानववंशाचा पुनर्जन्म आणि रावसाहेब ह्यांच्याबद्दलही तो बोलत आहे.

आपला बंधु,

वि. दा. सावरकर.

---

# विक्रमसिंग आणि रुस्तुम शेट

२९ जून १९१० ला ब्रिटिश सरकारने फ्रेंच सरकारला कळविले की दोन दिवसामध्ये १ जुलै ला एस्. एस्. मोरिया हे जहाज लंडनहून भारताला जाण्यास निघणार आहे. जहाजावर एक महत्त्वाचा राजकीय बंदी आहे. भारतीय क्रांतिकारकांनी आणि त्यांच्या युरोप खंडातील मित्रांनी ह्या बंद्याची सुटका करण्याचे प्रयत्न करू नयेत ह्यासाठी फ्रेंच सरकारचे सहाय्य मागण्यात आले होते. हा बंदी म्हणजे सावरकर. ब्रिटिश सरकारला त्यांच्या सुटकेच्या प्रयत्नांचा सुगावा इंग्लंडमध्ये लागला होता आणि म्हणून त्यांना सर्व तऱ्हेचे सावधगिरीचे उपाय योजावयाचे होते.

आणखी एक सावधगिरीचा उपाय म्हणजे व्ही. व्ही. एस्. अय्यर ह्यांना पकडण्याचा हुकूम. त्यांना अजून मुक्त ठेवणे धोक्याचे होते.

अय्यर आता इंडिया हाऊसमध्ये राहात नव्हते. अटक चुकविण्यासाठी ते निरनिराळ्या दिवशी निरनिराळ्या ठिकाणी राहात असत. ब्रिटिश गुप्तचर आणि पोलिसांनी त्यांना शोधून काढण्यासाठी सर्व लंडन पालथे घातले. अखेर त्यांना त्यांचा एका हॉटिलात पत्ता लागला. त्यांना पहाटेपूर्वीच अटक करून नेण्यासाठी गुप्तचरांनी आपआपल्या जागा कशा घेतल्या कोणास ठाऊक ? परंतु अय्यरना आपल्यावरील संकटाचा सुगावा लागला. मध्यरात्री त्यांनी शांतपणे हॉटिल सोडले. बरोबर एका सुटकेसमध्ये अगदी जरूरीच्या कमीत कमी वस्तू घेतल्या. ह्यामध्ये त्यांना अत्यंत प्रिय असलेली साहित्यकृती कवी कंबनच्या तमिळ रामायणाचे खंडही होते. अशा धोक्याच्या परिस्थितीत सुध्दा त्यांना तिला अंतर द्यायचे नव्हते.

निराशाग्रस्त ब्रिटिश पोलिसांनी सर्व लोहमार्गावर आणि लंडन बाहेर जाणाऱ्या समुद्री मार्गांवर सावधगिरीच्या सूचना पाठविल्या. व्ही. व्ही. एस्. अय्यर ह्या द. भारतीय ब्राह्मण क्रांतिकारकावर लक्ष ठेवण्याचे इशारे दिले. अय्यर पॅरिसला जातील अशी त्यांची अपेक्षा होती. म्हणून त्यांनी डोव्हर- कॅले या जहाजाच्या रस्त्यावर सक्त पहारा ठेवला परंतु अय्यर यांनी त्यांना चुकवून दुसऱ्या दिशांना तपास करायला लावले होते. ब्राझिल येथे जाऊन

आपण तेथे कायमचे वसाहत करून राहू की काय याबद्दल त्यांच्या मनात अय्यरनी शंका निर्माण करून ठेवली होती. अलिकडे काही दिवस ते घरी पत्रे लिहीत होते आणि ब्राझील योजनेची स्तुती करून आपला तेथे जाण्याचा निश्चय व्यक्त करीत होते. इतर दक्षिण भारतीय कुटुंबे तिकडे पाठवावी असेही त्यांनी आपल्या कुटुंबियांना सांगितले होते. त्याची घरी दिलेली पत्रे उघडण्यात येत आणि ब्रिटिश गुप्तचर सेवेतील लोक ब्राझिल मार्गावर नजर ठेवित.

ब्रिटिश पोलिसांना तिसरी एक शंका होती. अय्यर यांनी डॉ. राजन् यांना एक पत्राचे पुडके दिले होते ते त्यांनी स्वतः लिहिले असून त्यावर निरनिराळ्या तारखा घातल्या होत्या. ही पत्रे राजनून निरनिराळ्या तारखांना लंडनमधील निरनिराळ्या पोस्टाच्या पेट्यांमध्ये टाकवी असे त्यांना सांगण्यात आले होते. आपण लंडनमध्येच कोठेतरी लपून बसलो आहो असे लंडन पोलिसांना वाटत राहायचे असा अय्यर यांचा यातायात हेतु होता. हा डाव इतका यशस्वी झाला की, अय्यर अद्याप परंतु अधिक सावधगिरी म्हणून त्यांनी आपल्या लोकांना पॅरिस आणि ब्राझीलच्या रस्त्यावर पहारा ठेवण्यास सांगितले होते.

अशा तऱ्हेने पोलिस आणि त्यांचे हस्तक लंडनवर आणि पॅरिस, ब्राझीलच्या रस्त्यावर लक्ष केंद्रित करीत असता, अय्यर यांनी शांतपणे अमूस्टरडॅमचे जहाज पकडले. हॉलंडच्या मार्गावर काळजीपूर्वक पहारा ठेवला गेला नव्हता परंतु जहाजावरील एका गुप्तचराला शंका आली. त्यालाही "दक्षिण भारतीय ब्राह्मण क्रांतिकारका" बद्दल इशारा मिळाला होता. त्याने जहाजातील एका दाढीवाल्या गृहस्थाला सोडून बाकी सगळ्यांना सोडून दिले. हा गृहस्थ पंजाबी शीख दिसत होता. तो शरीराने सदृढ सशक्त व्यायामपटूच्या चणेचा, बुध्दिवादीची निशाणी देणाऱ्या रूंद कपाळाचा होता. त्याचे नाक धरधरीत होते. आणि त्याची राजशाही दाढी त्याच्या आकर्षण व्यक्तिमत्त्वात भर घालीत होती. हाच अय्यर की काय ? हे फारसे शक्य नव्हते. कारण अय्यर हे दक्षिण भारतीय ब्राह्मण नव्हते का ? आणि या वंशाचे लोक तर बारीक लहान खोऱ्या शरीराचे असून त्यांचा मेंदू त्यांच्या शरीर सामर्थ्यापेक्षा अधिक बलिष्ठ नसतो का ?

अय्यर यांना हुडकून काढण्यासाठी गुप्तचराने ते डेकवरील एका खूर्चीवर विश्रांती घेत असता व्ही. व्ही. एस्. अय्यर यांच्या नावाची एक तार दिली. अय्यरनी लिफाफा घेतला, पत्त्यावर नजर फिरविली आणि पापणीही न लवविता तार परत देऊन ते म्हणाले, "पण ही तर अय्यर यांची तार आहे माझी नाही."

हे उत्तर ताबडतोब मान्य झाले पण अय्यर यांच्या सुटकेसवर व्ही. व्ही. एस्. ही अद्याक्षरे उमटविलेली होती. त्या अक्षराकडे बोट दाखवून गुप्तचराने अय्यर यांच्याकडे प्रश्नार्थक नजरेने पाहिले. अय्यरने नुसते स्मित केले आणि म्हटले, "होय मी पंजाबचा वीर विक्रमसिंग".

ब्रिटिश गुप्तचर शरमिंदा झाला त्याने मनापासून माफी मागितली आणि आणि तो

तेथून निघून गेला.

अय्यर विनासायास ॲमस्टरडॅमला पोचले आणि आपल्या मार्गावर कोणी नाही असे पाहून त्यांनी त्वरेने पॅरिसची गाडी पकडली. फ्रेंच राजधानीत श्यामजी कृष्ण वर्मा आणि मादाम कामा त्यांच्या येण्याची वाटच पाहात होते. सावरकारांना घेऊन येणारे जहाज दक्षिण फ्रान्समधील मार्सेल्स् बंदाराला लागेल अशी अपेक्षा होती. ते त्यांना एक महत्त्वाचे संकेतस्थळ ठरणार होते.

एस्. एस्. मोरिया हे जहाज लंडनहून भारताला जाण्यासाठी १ जुलै १९९० रोजी निघाले होते. वाटेत त्याच्या इंजिनात बिघाड झाला आणि त्यामुळे त्याला मार्सेल्स बंदरात ७ जुलैला विश्रांती घ्यावी लागली. सावरकरांनी आपल्या लंडनमधील मित्रांना आणि त्यांच्याकरवी पॅरिसमधील सोबत्यांना आपण मार्सेल्स येथे पलायन करण्याचा प्रयत्न करणार आहो असे सांगितले होते. आपण जहाजातून सुटका करणार आहो असे सांगितले होते. आपण जहाजांतून सुटका करून घेऊन बंदरला येऊ, तेथे आपल्या मित्रांनी आपल्यासाठी थांबावे आणि तेथे धक्क्याला लागल्याबरोबर आपल्याला दूर घेऊन जावे असा त्यांचा बेत होता.

जहाजाच्या इंजिनात बिघाड झाला, ही गोष्ट सुदैवाची होती. त्यामुळे जहाज मार्सेल्समध्ये आणखी काही दिवस राहू शकणार होते.

७ जुलैच्या रात्री जहाज मार्सेल्स बंदरला लागले आणि सावरकर आपल्या सुटकेचा बेत मनाशी करू लागले. जहाजाच्या संडासात गेले असता सावरकरांनी तेथे एक उघडी खिडकी (पोर्ट होल) पाहिली होती. आपले कृशशरीर त्यातून कष्टाने नेता येईल इतके ते रूंद असल्याची त्यांनी नोंद घेतली होती. हे जर आपण करू शकलो तर आपल्याला जहाजाबाहेर जाता येईल हे त्यांना समजले. हे गवाक्ष समुद्रावर उघडत होते. त्यामुळे त्यांना बंदराजवळच्या पाण्यात उडी घ्यावी लागणार होती. सर्व तऱ्हेच्या आकस्मिक अडचणींची सावरकरांनी आपल्या मनाची तयारी केली. त्या रात्री ते अस्वस्थ होते. श्यामजींना आणि मादाम कामांना निरोप मिळाला असेल का ? अय्यर पॅरिसला सुखरूप पोचले असतील का ? मार्सेल्सच्या धक्यावर ते असतील का ?

दुसऱ्या दिवशी सकाळी ८ जुलैला सावरकरांनी आपली सुटका करून घेण्याचा निश्चय केला.

जहाजावर त्यांच्याबरोबर दोन पोलिस अधिकारी होते. एक लंडनचा आणि दुसरा मुंबईचा. अगदी सकाळी ते अद्याप झोपलेले होते आणि एक पहारेकरी पहारा करीत होता. आपल्याला संडासात जायचे आहे असे सावरकरांनी त्याला सांगितले. पहारेकऱ्याने आपल्या झोपलेल्या सोबत्याला उठवले आणि दोघेही त्यांच्याबरोबर गेले. दोघेही पेंगत होते आणि हे सावरकरांच्या पथ्यावर पडले. ते संडासात गेले आणि त्यांनी त्याला हळूच कडी लावली. प्रयासाने वर जाऊन त्यांनी गवाक्षामधून बाहेर जाण्याचा यत्न केला. पण त्यांना

अंगातल्या कपड्यानिशी तसे करता येईना. त्यांनी आपला रात्रीचा झगा काढून टाकला आणि अंग चोरून कसेबसे ते गवाक्षामधून बाहेर येऊ लागले. ते जवळजवळ नग्नच होते. त्यांची अंगकाठी कृश असल्याने त्यांना गवाक्षामधून बाहेर येता आले. एकदा बाहेर आल्यावर त्यांनी मनाचा हिय्या करून समुद्रात सूर मारला.

बंदारावरील धक्क्याकडे ते सपाट्याने पोहू लागले. आता मात्र कोणीतरी अकस्मात त्यांना जहाजावरून पाहिले. लौकरच सावरकर निसटले आहेत व कपड्यांशिवाय धक्क्याकडे पोहत जात आहेत हे कळले. दोन इंग्रज समुद्र पहारेकऱ्यांनी पाण्यात उड्या मारल्या आणि त्यांनी त्यांचा पाठलाग आरंभला. परंतु सावरकर प्राणपणाने पोहत होते. त्यांनी त्यांना चकवले आणि ते बंदराच्या उभ्या चढणीच्या खालच्या टोकाजवळ आले. त्यांनी वर चढण्याचा प्रयत्न केला, अर्धवट चढलेसुध्दा आणि खाली पडले, पुन्हा वर जाण्याचा प्रयत्न केला. तो यशस्वी झाला. धडपडत ते धक्यावर चढले आणि त्यानी पळायला सुरवात केली. ब्रिटिश पहारेकरी ही आता धक्क्यावर आले आणि त्यांनी "चोर, चोर ! त्याला पकडा" असे ओरडत त्यांचा पाठलाग सुरू केला. एकवस्त्रविहीन माणूस पळत आहे आणि पहारेकरी त्याच्या मागे लागले आहेत हे पाहून गर्दी जमली. एका फ्रेंच पोलिसाने सावरकारांना रोखले व त्यांना पकडून ठेवले. ब्रिटिश पहोरकरीही जवळ आले आणि त्यांनी फ्रेंच पोलिसांना सावरकरांना आपल्या ताब्यात द्यावे अशी विनंती केली. येवढ्या वेळात अय्यर आणि मादाम कामा यांनी जे काही चालले होते ते बघितले होते ते जवळ आले आणि ओरडले, "ही फ्रेंच भूमी आहे. फ्रेंच प्रांतामध्ये कोणीही ब्रिटिशाने अटक केलेली चालू देऊ नका !" त्यांची ही विनंती फुकट गेली. फ्रेंच पोलिसांनी ब्रिटिश पहारेकऱ्यांना सावरकरांना ओढत ओढत नेऊन दिले.

फ्रेंच पोलिसांचे हे कृत्य अत्यंत शोचनिय होते. ते आंतराष्ट्रीय कायद्याच्या सर्व नियमांच्या विरूध्द होते. कोणीही मनुष्य एकदा परकी भूमीवर आला की तो तेथील शासनाच्या कक्षेत येतो हे सर्वांना माहीत होते. शिवाय राजकीय बंद्यांना राजकीय आश्रय दिला जात असे. सावरकराने ब्रिटिश बंदिवासातून आपली सुटका करून घेतली होती, फ्रेंच भूमीवर होते आणि त्यांना फ्रेंच पोलिसांनी पकडले होते. राजकीय बंदी असल्याने राजकीय आश्रय मागण्याचा हक्क होता. सावरकरांना ब्रिटिशांच्या हवाली करण्याचा फ्रेंच पोलिसांना काही अधिकार नव्हता. आंतरराष्ट्रीय कायद्याच्या या भंगाविरूध्द लढण्याचा अय्यर आणि मादाम कामा यांनी निश्चय केला.

मार्सेल्सहून त्यांनी ही कथा तारेने "लह्युमानीत' ह्या एका विख्यात समाजवाद्याच्या संपादकाखाली निघणाऱ्या वृत्तपत्राकडे पाठविली. पत्राच्या १७ जुलैच्या अंकातही झळकली. पंडित श्यामजी कृष्ण वर्मा, मादाम कामा आणि अय्यर यांनी सरदार सिंगजी राणा यांच्या सह समाजवादी पुढारी श्री. व्हारेज आणि इतर वजनदार फ्रेंच मंडळींची सावरकरांच्या सुटकेबद्दल भेट घेतली. व्हारेज त्यावेळी मार्सेल्सचे नगराध्यक्ष होते. त्यांनी हे

कार्य आपल्या हाती घेतले आणि सावरकरांना परत फ्रेंच्याच्या ताब्यात द्यावे अशी त्यांनी मागणी केली.

ह्या प्रमुख फ्रेंच पत्रांनी या मागणीला पाठिंबा दिला आणि फ्रेंच भूमीवर झालेल्या ह्या बेकायदा अटकेविरूध्द रान उठविले. इंग्लंडमध्ये गाय ए आल्ड्रेड ''इंडियन सोसिऑलॉजिस्ट पत्राचे मुद्रक तुरूंगातून सुटले त्यांनी सावरकरांच्या सुटकेबद्दल एक मोहिम उघडली आणि एक ''सावरकर मुक्तता समिती'' स्थापन केली.

परंतु पंतप्रधान श्री. ब्रियाँ यांच्या नेतृत्त्वाखालील फ्रेंच सरकार सहजासहजी बधेना. श्री. ब्रियाँ ब्रिटनचे वैर ओढवून घेण्याला नाखूष होते कारण ब्रिटिन हे जर्मनीच्या विरूध्द सर्वात उत्तम दोस्त राष्ट्र ठरणार होते. परंतु फ्रान्समध्ये सावरकरांना परत द्यावे या संबंधीच्या निषेधाचा जो गदारोळ उठला होता त्यामुळे त्यांनी सावरकरांच्या मागणीबद्दल नाखूषीने का होईना पण ब्रिटिश सरकारकडे बोलणी केली. ब्रिटिश पंतप्रधान ॲस्क्विथ यांनी लंडनला पार्लमेंटमध्ये फ्रान्सने सावरकरांची मागणी केली आहे हे जाहीर केले. लंडनमध्ये संपादकीय लिहून असे म्हटले की आंतरराष्ट्रीय कायदा अशा परिस्थितीत केलेल्या अटकेबद्दल फारसा स्पष्ट नाही. ब्रिटिशांनी आपल्या मनाला चिटकवून राहण्याला ही चिथावनी होती.

कोपेन हेगन येथे १० सप्टेंबरला युरोपच्या समाजवादी परिषदेने ''सावरकरांना फ्रान्सला परत द्यावे'' अशी मागणी केली. फ्रेंच वृत्तपत्रांनी या मागणीच्या पांठिब्याची मोहिम पुन्हा चालू केली.

एका पंधरवड्यानंतर ब्रिटिश परराष्ट्रमंत्र्यांनी जाहीर केले की ब्रिटिन आणि फ्रान्स यांनी हे प्रंकरण हेग येथील आंतरराष्ट्रीय न्यायालयाच्या लवादासाठी सोपवावे असे उभय पक्षी मान्य झाले आहे. खटला एका लवाद न्यायाधिकाऱ्याकडे सोपवावा, ह्या न्यायाधीकरणात उभयपक्षी सुचविलेल्या कायदेपंडिताचा समावेश असावा असेही ठरले. फ्रेंच पंतप्रधानांनी मोठ्या देशातील कोणालाही नेमण्याचे टाळले कारण अशी व्यक्ती ब्रिटन विरोधी धोरण ठेवील असे त्यांना वाटले, न्यायाधिकरणाची बैठक २४ फेब्रुवारी १९११ ला झाली. आणि त्यांनी आपले काम अपेक्षेबाहेर लवकर म्हणजे आठ दिवसात संपवले. त्याच्या निर्णयाने सर्व स्वातंत्र्यप्रेमींना धक्का बसला. त्यांनी ब्रिटिश दृष्टिकोनाच्या बाजूने निर्णय दिला. परंतु प्रांजल म्हटले, ''सावरकरांना (मार्सेल्समध्ये) अटक करणे आणि त्यांना ब्रिटिश पोलिसांच्या हवाली करणे ही अनियमित कृत्ये झाली होती.''

सप्टेंबर १९१० च्या सुमारास, इतक्या लवकरच अय्यर यांना ज्या तऱ्हेने गोष्टी घडत होत्या त्यामुळे आपले हृदय विदारण होत आहे असे वाटू लागले होते. सावरकरांना भारतात नेले होते. त्यांच्यावर खटला भरला होता- आणि हे त्यांची फ्रेंच भूमीवरील अटक बेकायदा असून त्यांना भारतात बेकायदेशीरपणे नेले होते असे निषेधपर म्हटले गेलेले असून सुध्दा करण्यात आले होते. त्यांना एकूण ५० वर्षांची कारावासाची शिक्षा देण्यात आली होती. अंदमानात पन्नास वर्षे !आयुष्यभरापेक्षाही हे अधिक होते !

एखाद्या ग्रीकशोकनाट्याप्रमाणे सावरकरांचा खटला शेवटपर्यंत कष्टाने ओढला जात असता, अय्यर यांचे भविष्य, क्षितिजावर ठळकपणे झळकत होते. अय्यर २९ वर्षांचे होते, त्यांनी बॅरिस्टरीचा त्याग केला होता आणि त्यांच्यावर ब्रिटिश पकडहुकूम असल्याने त्यांच्यावर पाळत ठेवली जात होती किंवा भारतामध्ये कोठेच ते सुरक्षित नव्हते.

भारतीय क्रांतिकारकांचे पुढारी लाला हरदयाळ पॅरिसहून ''वंदेमातरम्'' पत्र संपादित करीत असत. ते ह्या वेळेस जपानला जाण्याचा बेत करीत होते आणि त्यांना आपल्या वृत्तपत्राच्या संपादनाची पर्यायी योजना तयार करायची होती. (दोन नावांचा त्यांनी विचार केला) (वीरेन्द्र चट्टोपाध्याय आणि अय्यर) मे १९१० मध्ये अय्यर अद्याप लंडन येथेच असतांना हरदयाळनी सरदार सिंगजी राणा, ह्या दुसऱ्या एका क्रांतिकारी नेत्यांना ह्याबद्दल लिहिले, ''अय्यर यांनी बॅरिस्टरीच्या यादीतून आपले नाव घालण्यास मोठ्या शौर्याने इन्कार केला. तुम्हाला जर त्यांना ''वन्दे मातरम्'' साठी आणता आले तर ते फार चांगले होईल. त्यांना चांगले लिहिता येते. त्यांना जर काही पैसे देता आले आणि गोविंदप्रमाणे आपले जीवन पुन्हा सुरू करण्यासाठी काही मदत करता आली तर त्यांना पॅरिसला राहाता येईल. ही केवळ एक सूचना आहे. तुम्ही ह्या गोष्टीचा विचार करा. . . ''

दुसऱ्या पत्रात अखेरची पसंती चट्टोपाध्याय यांची केल्याचा उल्लेख आहे; परंतु त्यांनी मान्यता द्यावी यासाठी त्यांचे मन वळविण्यास अय्यर यांची मदत मागितली होती. हरदयाळ यांनी राणा यांना लिहिले, ''वन्दे मातरम्'' चट्टोपाध्यायनी पत्करावे हे विचारण्याबद्दल मी मादाम कामा आणि श्री. अय्यर यांना विनंती केली आहे. . . मी त्यांना प्रत्यक्ष लिहिले नाही कारण त्यांची माझी नीटशी ओळख देखील नाही. ते अय्यर यांचे मित्र आहे आणि अय्यरना ह्या प्रकरणाची व्यवस्था सहज करता येईल.

पॅरिस येथे राजकारणी निर्वासित म्हणून राहण्यास अय्यरना फारसा उत्साह नव्हता. म्हणून चट्टोपाध्याय यांना संपादकीय जागा मिळवून देण्यासाठी मदत करणे त्यांना आनंददायक वाटले. परंतु हरदयाळनी आपले बेत बदलल्यामुळे ''वन्दे मातरम्'' साठी नवा संपादक शोधून काढण्याचा प्रश्नच आला नाही. ह्याबाबतीतील पत्रव्यवहारावरून असेही दिसते की अय्यर हरदयाळना भारतीय क्रांतिकारक युरोपमध्ये प्रसिद्ध करीत असलेल्या ''तलवार'' ह्या दुसऱ्या नियतकालिकाचे संपादन करण्याचा आग्रह करीत होते. हरदयाळनी ह्यावर अंतीम उत्तर दिले नव्हते, कारण ते वृत्तपत्राच्या मुद्रणखर्चाची नीट व्यवस्था लावण्याच्या नादात होते.

डॉ. टी. एम्. एस्. राजन् हे अय्यर यांच्या इंडिया हाऊसमधील अगदी निकटच्या विश्वासातील होते. त्यांनी अय्यर यांच्या आठवणीत लिहिल्यावरून दिसते की आपण पॅरिसमध्ये राहिल्यामुळे फारसे काही साधणार नाही असे अय्यर यांना वाटत होते. भारताला जाण्यात मोठा धोका आहे हे त्यांना माहीत होते; परंतु त्यांचे मन तिकडे लागले होते. मादाम कामांकडे ते राहात होते आणि त्यांच्याशी त्यांनी ह्याविषयी चर्चा केली.

त्यांनी अय्यर यांच्या भारताला परत जाण्याच्या बेतास मान्यता दिली परंतु अय्यरनी जर उघडपणे प्रवास केला तर त्यांना अटक होण्याच्या शक्यतेस तोंड द्यावे लागेल असा इशारा देण्यास त्या चुकल्या नाहीत.

अय्यरनी वेष पालटून जाण्याचे ठरविले. परंतु ब्रिटिश भारतात कोठे जावे ह्याबद्दल त्यांच्या मनाची निश्चिती झाली नव्हती. भारतातही त्यांना अटक होण्याच्या धोक्याला तोंड द्यावे लागणार होते. म्हणून त्यांना भूमिगत होण्याचा निश्चय करावा लागला आणि भविष्यकाळी जसा प्रसंग येईल तसे त्याला तोंड देण्याचे ठरविले.

फ्रान्सहून भारताकडे जाणारा जहाजाचा रस्ता पोर्ट सय्यद आणि एडन् मार्गे मार्सेल्स मुंबई असा धोक्याचा होता. ब्रिटिश गुप्तचर येथे दबा धरून संचार करतील याची निश्चिती होती. म्हणून त्यांना दुसरा कोणतातरी मार्ग पतकरणे भाग होते. शिवाय आपण भारताला जात आहो याचा यत्किंचित् सुद्धा सुगावा लागू द्यायचा नव्हता. पॅरिस ते भारत हा दर्यावरचा किंवा खुष्कीचा मार्ग फार दूरचा होता. आपण दुसरे कोणीतरी आहो असे भासवून जाणे त्यांना भाग होते. फसवणुकीची कला त्यांना पूर्णत्वाला न्यावयाची होती.

मादाम कामा यांच्या घरातील एकांतवासात अय्यरनी शांतपणे आपली तयारी केली. त्यांनी आपल्या दाढीकडे व्यवस्थित लक्ष दिले. महिन्या दोन महिन्यातच ती लांब, केसाळ झुडपासारखी दिसू लागली आणि तीमुळे त्यांच्या चेहऱ्या मोहऱ्यात खूप फरक पडला. त्यांनी बरोबर निरनिराळ्या तऱ्हेचे पोशाख घेतले - एक पार्शी सद्गृहस्थाचा तर दुसरा मुसलमान व्यापाऱ्याचा. मादाम कामांकडून त्यांनी पार्शी प्रार्थना शिकून घेतल्या, तसेच पार्शी लोकांचे रोजच्या व्यवहारातील साधे बोलणे आणि लकबीही उचलल्या. पार्शी म्हणून आपण जी भूमिका घेणार होतो त्याला अनुरूप अशाच ह्या गोष्टी होत्या. इतर मित्रांकडून त्यांनी मुसलमानी सवयी आणि प्रार्थना शिकून घेतल्या. भाषातज्ज्ञ असल्याने कोठलीही भूमिका घेतली, तरी त्या भूमिकेला अनुरूप असे शब्द आणि वाक्प्रचार सहज वापरून त्यांना संभाषण करता येत असे. भारताच्या प्रवासाला जातांना अय्यरनी जी तयारी केली, तितकी एखाद्या नटाने रंगभूमीवर जाताना सुद्धा केली नसेल.

भारतातील आपल्या नातेवाइकांना अय्यर जी पत्रे पाठवीत ती सर्व ब्रिटिशांकडून तपासली जात असल्याने अय्यरना पुन्हा एकदा बनाव करून दुसऱ्यांना चकविण्याचा मार्ग पत्करावा लागला. त्यांनी आपल्या वडलांना पत्रे लिहून ते ब्राझीलला वसाहतीसाठी जाण्यास व आपल्याबरोबर दक्षिण भारतातील शंभर कष्टाळू कुटुंबे पाठविण्यास तयार आहेत काय ह्याबद्दल विचारणा केली. भारतीय लोक कष्टाळू असल्याने त्यांचे ब्राझीलला स्वागत होणार होते आणि त्यांना तेथे स्वातंत्र्य व वैभवाचे नवे जीवन सुरू करणे शक्य होते. स्वतःबद्दल त्यांनी लिहिले की, आपण भारताला परतण्यात फारसा अर्थ नाही कारण आपल्याला नक्कीच पकडून तुरुंगात टाकतील. भारतातील तुरुंगात खितपत पडण्यापेक्षा आपण दूर पण स्वतंत्र राहाणे पत्करू.

लंडन सोडण्यापूर्वी त्यांनी जे केले होते तसेच आताही पॅरिसमध्ये त्यांनी केले. त्यांनी स्वतःच्या हस्ताक्षरात पुढल्या तारखा घालून बरीचशी पत्रे लिहिले आणि ती मादाम कामांच्या ताब्यात देऊन पॅरिसच्या एका पत्रपेटीत आठवड्यामागून आठवडे ती टाकण्यास सांगितले. ह्या युक्तीने ब्रिटिश गुप्तचरांची अशी कल्पना होईल की आपण अद्याप पॅरिसमध्येच असून ब्राझीलला जाण्याच्या तयारीत आहो असा अय्यर यांनी विचार केला.

त्यांच्या अपेक्षेप्रमाणे ब्रिटिशांनी ब्राझीलची राजधानी रीओ द जनेरिओकडे जाण्याऱ्या समुद्री मार्गावर सक्त नजर ठेवली. अपेक्षा ही की पक्षी उडताक्षणीच आपल्या जाळ्यात सापडावा. अशा तऱ्हेने ते व्यग्र असता हातात एक बॅग घेतलेल्या पार्शी सद्गृहस्थाने मादाम कामांचा पॅरिसमध्ये निरोप घेतला. रेल्वे स्टेशनवर जाण्यासाठी त्यांनी टॅक्सी केली आणि रोमची गाडी पकडली. ''मि. रुस्तुम शेट'' यांनी पॅरिसमधील प्रेक्षणीय स्थळे पाहात काही दिवस काढले.

अय्यर हे लॅटिनचे विद्यार्थी असल्याने इटली आणि रोम यांच्याबद्दल त्यांना आकर्षण होते. व्हर्जिल कवीवर त्यांचे नितांत प्रेम होते, तसेच होरेसवर. त्यांचा केवळ लॅटिन वाङ्मयाशी परिचय होता असे नव्हे तर त्यांना रोमन कायदाही माहीत होता कारण बॅरिस्टरीची तयारी करतांना त्यांनी त्याचा अभ्यास केला होता.

रोम आणि तमिळनाडू हे पुरातन काळापासून मित्र होते. प्राचीनकाळातील तमिळ राजांचा रोमशी मोठा व्यापार होता. त्यांनी एकमेकांशी राजनैतिक प्रतिनिधींची देवघेवही केली होती. जुन्या तमिळनाडूच्या चोळ आणि पांड्य राजांच्या नोकरीत रोमन पोटार्थी सैनिक असत.

अलिकडच्या काळात गॅरिबाल्डी आणि मॅझिनी हे इटालियन् नेते भारतीय तरुणांची दैवते बनली होती. ह्या स्वातंत्र्ययोद्ध्यांची चरित्रे अय्यर यांनी तमिळमध्ये लिहिली होती.

शिवाय रोमच्या संस्मरणीय इमारतींनी अय्यरना आकर्षित केले कारण ते सर्व कलांचे उत्साही विद्यार्थी होते.

कदाचित् रोममध्ये असतानाच अय्यर यांनी आपल्या भारतीय भावितव्याबद्दलची दिशा निश्चित केली असावी. रोममध्ये अय्यर यांनी डान्टेच्या ''डिव्हायना कॉमेडिया'' ची प्रत आणि एक इटालिअन्- इंग्रजी कोश खरेदी केला. ही दोन्ही पुस्तके त्यांनी बरोबर कोठलेही पत्र न लिहिता फ्रेंच भारतातील पॉंडिचेरीच्या एका पत्त्यावर पाठवली. पत्र नाही की टिपण नाही, फक्त स्वतः होऊन पाठवलेले एक पार्सल आणि त्यात एक इटालिअन पुस्तक आणि एक शब्दकोश !

रोमहून ''रुस्तुमशेट'' यांनी तुर्कस्तानमधील इस्तंबूल येथे जाणारे जहाज धरले. वाटेत एका माणसाने - तो बहुधा हेर असावा- त्यांच्याकडे बहुधा माहिती काढण्याच्या हेतूने अगदी नाइलाजानेच लक्ष दिले. अय्यरनी आपण आपल्या हिशोबाच्या वह्या लिहिण्यात गर्क असण्याचा बहाणा केला आणि मोठमोठ्याने कुठल्यातरी अपरिचित भाषेत

अंकगणिती हिशोब करण्यास सुरवात केली. रुस्तुम शेट हे त्यांचे नाव जाहीर करणारे त्यांचे उर्दु भेटपत्र तयारच होते पण त्याची काही गरज पडली नाही.

इस्तंबूलहून ''रुस्तुमशेट'' जहाजाने कैरोला आले आणि एका मित्राच्या पत्त्यावर जाऊन त्या पुरातन शहरात मिसळले. तेथे प्रेक्षणीय स्थळे पाहाण्यात आणि फारसी लिपीमध्ये एक तुर्की नाव भेटकार्डवर छापून घेण्यात त्यांनी वेळ घालावला आता अय्यर हे रुस्तुमशेट या नावाचे पार्शी सद्गृहस्थ नव्हते तर एक धर्मनिष्ठ मुसलमान प्रवासी असून ते हज यात्रेहून परत येत होते.

अय्यर ज्या जहाजात बसले त्यात हजहून परत येणारे दुसरे अनेक यात्रेकरू होते. अय्यरनी आपला वेळ कुराणाचे पठण करण्यात किंवा ते वाचण्यात घालविला. ते जहाजाच्या डेक्‌वर दिवसातून पाच वेळा नमाज पढत. लोकांशी लहान सहान गप्पा मारणे ते टाळीत. ते एक वंदनीय ''फकीर'' आहेत असे सर्वांना वाटले.

मुंबईला एक स्थानिक मुसलमान ''फकिरांना'' भेटला आणि आपल्याबरोबर घेऊन गेला. काही दिवसानंतर ह्याच फकिराने कोलंबोला जाण्याऱ्या एका जहाजात प्रवेश केला. पुन्हा तो प्रार्थनेत मग्न होता. कोलंबोला एका गुप्त पोलिसाने त्यांचा पाठलाग केला. पण हा एक कोणी धर्मवेडा आहे असे समजून त्याने त्यांचा नाद सोडून दिला. अय्यर स्वतःचे एक मोठे भेटकार्ड देत त्यावरून ते कलकत्त्याचे एक बडे व्यापारी आहेत असे दिसत होते.

कोलंबो ते कलकत्ता मार्गावर जहाजाने कड्डालोर येथे नांगर टाकला. अय्यर जहाजातून बाहेर आले, कड्डालोरच्या एका होडीत बसले आणि तेथून घोड्याचा एक टांगा करून जवळच असलेल्या पाँडिचेरीला गेले. ते अजूनही फेझ टोपीसह मुसलमानी वेसातच होते.

पाँडिचेरी येथे अय्यर मंडायन् श्रीनिवासाचार्य यांच्या घरी गेले. श्रीनिवासाचार्य साप्ताहिक ''इंडिया'' चे मालक आणि मुद्रक होते. अय्यर त्यांना भेटायला गले तेव्हा कवी सुब्रह्मण्य भारती आणि श्रीनिवासाचार्य घराच्या पहिल्या मजल्यावर बोलत बसले होते. श्रीनिवासाचार्यांच्या मुलीने दार उघडले आणि चौकशी करून तिने हाक मारली, ''पिताजी, कोणी मुसलमान गृहस्थ तुम्हाला भेटायला आले आहेत''. हे अनपेक्षितपणे आलेले मुसलमान गृहस्थ कोण असतील ह्याबद्दल आश्चर्य करीतच श्रीनिवासाचार्य खाली आले.

अय्यर यांचे पहिले शब्द असे होते, ''तुम्हाला डांटेच्या ''डिव्हायना कॉमेडियाची'' प्रत आणि शब्दकोश मिळाले का ? मी अय्यर.''

क्षणार्धात सर्व स्पष्ट झाले. व. वे. सु. अय्यरनी ब्रिटिशांची नजर धाडसाने चुकवली होती आणि ते लंडनहून थेट पाँडिचेरीला आले होते हे श्रीनिवासाचार्यांना कळले. एकही शब्द न बोलता त्यांनी अय्यरना माडीवर नेले आणि त्यांची भारतींशी ओळख करून दिली. ''इंडिया'' साप्ताहिकाच्या स्तंभातून लेख लिहिल्यामुळे त्यांचा सर्वांचा परिचय होताच पण ते एकमेकांना प्रथमच भेटत होते.

अय्यरनी त्यांना आपली लंडनहून सुटका आणि पॉंडिचेरीपर्यंतचा दीर्घ प्रवास थोडक्यात सांगितला. पॉंडिचेरी ही त्यांना सध्या निवासासाठी उत्तम जागा आहे ह्यावर त्यांच्या सर्व मित्रांचे एकमत झाले. सुरक्षिततेसाठी त्यांचे तेथील अस्तित्व गुप्त राखायचे त्यांनी ठरविले.

अय्यर यांच्या साहसी आयुष्यातील एक नवे पान आता सुरू होत होते.

---



# पाँडिचेरी, १९१०

ऑक्टोबर १९१० मध्ये व. वे. सु. अय्यर पाँडिचेरी येथे पोचले तेव्हा पाँडिचेरी हा फ्रेंचाचा प्रदेश होता आणि ती फ्रेंच भारताची राजधानी होती. पाँडिचेरी शहर आणि लगतचे काही प्रदेश, मद्रासमधील तंजावर जिल्ह्यांतील काराइकल, केरळमधील माहे, आन्ध्रमधील यानाम् आणि दूर बंगालमधील चंद्रनगर ही सर्व मिळून फ्रेंच वसाहती बनल्या होत्या. ही सर्व स्थळे किनाऱ्यावर होती आणि ती सर्व भारतातील फ्रेंच साम्राज्याच्या- ज्या साम्राज्याने कधी आकारच घेतला नाही- पाय रोवण्याच्या उर्वरित जागा होत्या.

पाँडिचेरी शहरावर गत शतकाचा मोठा प्रभाव होता. इंग्रज आणि फ्रेंच दक्षिण भारतावर वर्चस्व स्थापन करण्यासाठी कसे भांडले, हे या शहराने पाहिले होते. ते डुप्लेचे शहर म्हणून प्रसिद्ध होते. डुप्ले हा अठराव्या शतकाच्या आरंभीचा समर्थ फ्रेंच राज्यपाल. हे छोटेसे शहर ब्रिटिश प्रदेशाने वेढलेले होते- ह्याला अपवाद म्हणजे, पूर्वेला बंगालचे आखात त्याच्या किनाऱ्याला स्नान घालीत होते. पाँडिचेरीच्या सभोवती अनेक परराष्ट्रवलयांकित प्रदेश होते आणि कोणालाही फ्रेंच प्रदेशातून इंग्रजी प्रदेशात आणि उलट इंग्रजी प्रदेशातून फ्रेंच प्रदेशात सहज चालत जाता येई. प्रदेशावर पोलिसी पहारा ठेवणे सोपे नव्हते; पाँडिचेरी हा तस्कारांचा स्वर्ग होता.

वसाहतीचे प्रशासन एक फ्रेंच राज्यपाल भारतीय सभेच्या - फ्रेंच इंडिया असेंब्लीच्या - सल्ल्याने करी. वसाहतीचे रहिवासी आपला एक प्रतिनिधी निवडून त्याला पॅरिस् येथील फ्रेंच राष्ट्रीय सभेवर पाठवीत. ह्या निवडणुका सोडल्या तर पाँडिचेरीच्या जीवनात कोठल्याही म्हणण्यासारख्या घटना घडत नसत. पण एकदा निवडणुकांचा ज्वर आला की कायदा आणि सुव्यवस्था जणू सुट्टीवर जात आणि निरनिराळ्या पक्षांच्या किंवा गटांच्याकडून पगार मिळविणाऱ्या बदमाषांच्या टोळ्यांना चांगले फावे. वेगवेगळ्या पगारदारांचा मलिदा खाणाऱ्या ह्या टोळ्या रस्त्यात मारामाऱ्या करीत. रस्त्यावर मोर्चेबांधून लढाया होत आणि त्यात विटा आणि सोडावॉटरच्या बाटल्यांचा उपयोग केला जाई.

रस्त्यात मुक्तपणे संचार करीत त्या टोळ्या प्रतिस्पर्ध्यांच्या घरांना वेढाही घालीत. फ्रेंच भारतातील लोक आपण फ्रेंच साम्राज्याचे प्रजाजन आहोत- शेजारच्या ब्रिटिश प्रदेशातील लोकांप्रमाणे ब्रिटिश साम्राज्याचे नाही- त्याचा अभिमान बाळगत. फ्रेंच भारतातील बिचाऱ्या नागरिकांचा मतदानाचा हक्क त्या बदमाष कंपूंनी खूपच मर्यादित केला होता.

निवडणुकांच्या वेळची विकृती सोडली तर पाँडिचेरीचे जीवन साधे, शांत आणि स्वस्त असे. सर्वसाधारणपणे खुशालचेंडू अशा त्या जीवनात सहज मिळणारी दारू ही देखील एक भर घाली. अन्नाच्या बाबतीत पाँडिचेरी स्वयंपूर्ण होती तर उपभोग्य वस्तूंसाठी ती जमीन व समुद्र यांच्यावरून होणाऱ्या आयातीवर अवलंबून असे. कलकत्ता कोलंबो मार्गाची जहाजे पाँडिचेरी बंदरात येत आणि समुद्रात कित्येक मैलांवर नांगर टाकीत. प्रवासी तेथून उतरत आणि होड्यांच्या सहाय्याने किनाऱ्यावर जात. मालही घेतला जाई आणि पाठवला जाई. दर्जेदार कापड आणि रेशीम तसेच विदेशी दारू त्यांची प्रामुख्याने आयात होई. भूईमूग (किंवा ज्याला स्थानिक परिभाषेत 'मनिलानट्' म्हणत) टनाने निर्यात केला जाई आणि तोही मुख्यतः फ्रान्सला.

नवलाची गोष्ट म्हणजे पाँडिचेरीचा लोहमार्ग आणि तेथील पोस्टसेवा ब्रिटिशांच्या हाती होत्या आणि ही आपली मगरमिठी सैल करण्यास ब्रिटिश लोक अजिबात राजी नसत. त्या सुविधांचा ते पुरेपूर फायदा करून घेत. स्थानिक लोकांच्या ब्रिटिशविरोधी किंवा कधी कधी ब्रिटिश भारतातील हद्दपारांच्या कारवाया चिरडून टाकण्यासाठी ते त्या सेवांचा उपयोग करीत.

१९१० मध्ये, पहिले महायुद्ध सुरू होण्याच्या आधी चार वर्षे, पॅरिसमधील फ्रेंच शासन स्वतः संरक्षण कैसर विलहेल्मच्या कराल दाढांखाली असलेल्या आक्रमक जर्मनी पासून व्हावे त्यासाठी ब्रिटिशांवर अवलंबून असे. फ्रेंच भारतीय वसाहतींचे शासन साहजिकच संरक्षणासाठी ब्रिटिश भारतावर अवलंबून होते. परंतु अनेक फ्रेंच राज्यपालांनी बऱ्याच बाबतीत आणि विशेषतः ब्रिटिश भारतातून आलेल्या राजकीय हद्दपारांबाबत बरचसे स्वतंत्र धोरण आखले होते, हे त्यांच्या जमेच्या बाजूने सांगायला हवे.

पाँडिचेरी हे ब्रिटिश भारतातील कर्जबाजारी लोकांचे आश्रयस्थान असल्याबद्दल त्याची आतापर्यंत कीर्ती होती; परंतु त्यांचे रुपांतर ब्रिटिश प्रांतांतील राजकीय पुढाऱ्यांच्या आश्रयस्थानात करण्याचे श्रेय तमिळ कवी सुब्रह्मण्यम् भारती यांजकडे जाते. मद्रास येथे अटकेचा संभव असतो ते पाँडिचेरी येथे १९०८ ला पळून आले व तेव्हापासून तेथेच राहिले. पाँडिचेरीच्या सुरक्षित वातावरणात त्यांनी आपले ब्रिटिशांविरोधी वृत्तपत्रीय कार्य चालूच ठेवले. मद्रास येथे ते संपादन करीत असलेले ''इंडिया'' साप्ताहिक त्यांनी पाँडिचेरीला बदलून आणले; तसेच काही इतर वृतपत्रांच्या बाबतीत झाले. ''विजय'' हे तमिळ दैनिक, ''बालभारत'' इंग्रजी मासिक आणि ''कर्मयोगी'' तमिळ सांस्कृतिक त्या सर्वांच्या ब्रिटिश विरोधी गर्जना चालूच होत्या. ही सर्व नियतकालिके भारती व त्यांच्या

मित्रांकडून काढली जात. ही सर्व मंडळी ब्रिटिश भारतातून हद्दपार झालेली होती. ह्यात ''सूर्योदयम्'' ह्या स्थानिक साप्ताहिकाची भर पडली- त्याच्या संपादनासाठी नीलकांत ब्रम्हाचारी ह्या मद्रासच्या क्रांतिकारकांना नेमण्यात आले.

ह्या सर्व नियतकालिकांचा रोख ब्रिटिश भारतातील वाचकांकडे होता. वर्गणी आणि जाहिरातींचे उत्पन्न सुद्धा ब्रिटिश भारतातून पोस्टाने येई. पोस्ट सेवा ब्रिटिशांच्या हातात असल्याने ब्रिटिशांनी ह्या पत्रांना येणारे पैसे आणि पत्रे हुलकावण्या देऊन बंद केली. आणि हे जणु पुरे झाले नाही म्हणून की काय ''इंडिया'', ''सूर्योदय'' आणि ''विजय'' यांच्या भारतातील प्रवेशावर बंद घालण्यात आली. मद्रासच्या पोलीस कमिशनरकडे ह्या पत्रांच्या प्रतींचे जुडगे पाठवण्यात येऊन ते नष्ट करण्यात आले. भारतींचे वृत्तपत्रीय कार्य अशा तऱ्हेने आकस्मिकपणे संपुष्टात आले.

बरोबर ह्याच वेळी बंगाली पुढारी बाबु अरविंद घोष ह्यांनी योगसाधनेसाठी राजकारण सोडले. आणि आपले योगिक प्रयोग शांतपणे करता यावे यासाठी पाँडिचेरी येथे जाऊन राहाण्याचा निश्चय केला. भारती आणि त्यांचे प्रकाशक मंडायम् श्रीनिवासाचार्य ह्यांनी त्यांच्या स्वागताची तयारी केली. अरविन्द अत्यंत गुप्ततेने आले आणि कलावाई शंकर चेट्टियार ह्या प्रमुख व्यापाऱ्याच्या घरात राहिले. काही काळानंतर ते दुसऱ्या एका घरी राहू लागले आणि तेथे त्यांनी योगसाधनेमध्ये संपूर्ण निमज्जन करण्याचे ठरविले. येथेच त्यांनी आजच्या श्री. अरविन्द आश्रमाचा मूळ पाया घातला.

पाँडिचेरी येथे राहाणाऱ्या ब्रिटिश भारतीय देशभक्तांना त्यांच्या स्वदेशी चळवळीच्या पाठिंब्यामुळे 'स्वदेशी' असे म्हणत असत. ऑक्टोबर १९१० मध्ये अय्यर पाँडिचेरीला आल्यानंतर ह्या स्वदेशी नेत्यांमध्ये सुब्रह्मण्यम भारती, मंडायम् श्रीनिवासाचार्य, बाबू अरविन्द घोष, नीलकान्त ब्रम्हचारी, परली एस् नेलायप्पा पिळ्ळा, हरिहर शर्मा आणि एन्. नागसामी ह्यांचा समावेश होता. ह्यापैकी अरविन्द हे वयाने सर्वात वडील म्हणजे अडतीस वर्षाचे होते. श्रीनिवासाचार्य तीस वर्षांचे, अय्यर एकोणतीस, भारती अठ्ठावीस, नीलकान्त एकवीस आणि इतर एकदोन वर्षांनी लहान होते.

भारती तेथे दोन वर्षांहून अधिक काळ राहात होते. श्रीनिवासाचार्य त्याहून थोडासा कमी काळ, नीलकान्त, नेलायप्पा पिळ्ळा, हरिहर शर्मा आणि नागसामी वर्षाहून थोडा अधिक काळ तर अरविन्द यांना येऊन केवळ सहा महिने झाले होते.

ह्या सर्वांवर त्यांना पकडण्याचा हुकूम असो वा नसो ब्रिटिश हेरांची सतत सक्त नजर असे. भारतींचा सनदशीर चळवळीवर दृढ विश्वास होता. अरविंदांनी राजकारण पूर्णपणे सोडले होते. श्रीनिवासाचार्यांचा हिंसक क्रान्ती आणि दहशतवाद ह्यावर दृढ विश्वास होता. नीलकान्तांचा विश्वास संघटित क्रांतीवर होता. पण दहशतवादी खुनांवर नव्हता. अय्यर त्यांच्यामध्ये आले होते, ते एका समर्पित क्रांतिकारकाचे तेजोवलय घेऊन. त्यांचा विश्वास बॉम्ब पंथावर आणि व्यक्तिगत दहशत वादावर होता.

शेजारच्या मद्रास प्रांतातील राजकारण काँग्रेसमधील नेमस्तांच्या हातात होते. तमिळ दैनिक ''स्वदेशमित्रन्'' चे संपादक जी. सुब्रह्मण्य अय्यर हे एकच प्रमुख पुढारी मुक्त असून त्यांचा कल टिळकपंथीय जहाल राजकारणाकडे होता. त्यांना १९०८ साली अटक झाली होती आणि त्यावेळेस भारतींवरही कारवाई करण्याचे ठरले होते. परंतु त्यावेळेस त्यांनी आपल्या वाढत जाणाऱ्या दृष्टिकोणामुळे चळवळीशी संबंध न ठेवण्याची हमी दिली होती. डोळे अधू असले तरी ते आपल्या तमिळ दैनिकाचे संपादन उत्तम तऱ्हेने करीत असत.

मद्रासमधील इंग्रजी दैनिकात एस्. कस्तुरी रंग अय्यंगार ह्यांच्या संपादकत्वाखाली निघणारे ''हिंदू'' वर्तमानपत्र होते. ह्या पत्राचा दृष्टिकोन स्वतंत्र व धाडसी होता. करुणाकर मेनन ह्यांच्या संपादनाखाली निघणारे ''पेट्रिअट'' पत्र नेमस्त मताचे होते. ''मद्रास टाइम्स'' आणि ''मद्रास मेल'' ही वृत्तपत्रे इंग्रजांच्या मालकीची आणि इंग्रजांनी संपादित केलेली असत.

XXX

पाँडिचेरीला आल्यानंतर थोड्या दिवसांनी व. वे. सु. अय्यर ह्यांनी तीन निरनिराळ्या ठिकाणी तीन पत्रे लिहिली. एक मद्रास शासनाला लिहिले होते आणि त्यात आपण पाँडेचेरी येथे आल्याचे कळवले होते. दुसरे स्वतःचे वडील व्यंकटेश अय्यर ह्यांना लिहिले होते व त्यात आपण पाँडिचेरी येथे सुखरूप पोचल्याचे कळविले होते. तिसरे पत्र आपल्या पत्नी भाग्यलक्ष्मी अम्मल यांना लिहून आपण पाँडिचेरी येथे आलो असून त्यांची येथे वाट पाहात आहोत असे म्हटले होते. त्यांनी काही काळ पाँडिचेरी येथे राहाण्याचे ठरविले होते पण प्रत्यक्षात ते पाँडिचरी येथे दहा वर्षापेक्षा अधिक काळ राहाणार होते.

अय्यर इंग्लंडमध्ये गेल्यानंतर कौटुंबिक वर्तुळात बरेचशे बदल घडून आले होते. १९०८ मध्ये अय्यर ह्यांच्यावर कर्झन वायली ह्यांच्या खुनाला मदत केल्याचा संशय होता. त्यावेळी भारतामध्ये त्यांना अटक करून फासावर लटकवतील किंवा अंदमानला पाठवतील अशा अफवा उठल्या होत्या. अशा तऱ्हेच्या मुलाला जन्म दिल्याबद्दल अय्यर यांच्या आईला काही अविचारी नातेवाईकाकडून टोमणेही दिले जात होते. आपल्या पहिल्या मुलाच्या नशिबी जे काही आले होते त्याबद्दल दुःख आणि वेदना होत असता, अय्यर यांच्या आईचे कोणी सान्त्वन तर केले नाहीच उलट तिला कटू शब्द मात्र ऐकावे लागले. हा सर्व ताण असह्य होऊन त्या बिचाऱ्या बाईला उन्मादावस्था आली आणि एका रात्री ती वराहनेरी येथील आपल्या घरातून बाहेर पडली आणि जवळच्या एका तळ्यात तिने जीव दिला.

अय्यरना आपल्या आईच्या निधनाचे वृत्त कळविण्यात आले. त्यांनी ते आपल्या

नेहमीच्या पद्धतीने शांतपणे ऐकले आणि आपल्या देशभक्तीपर कार्यात ते व्यग्र राहिले. पुत्राने आपल्या मृत मातेसाठी जे काही क्रियाकर्मांतर करावयाचे ते त्यांनी टेम्स नदीच्या तीरावर केले.

अय्यर ह्यांचे वडील आपला मुलगा बॅरिस्टरीच्या उपाधीने विभूषित होऊन परत येईल अशी अशा करीत असता, तिकडून जी पत्रे येत त्यामुळे त्यांचा तीव्र आशाभंग झाला. त्यांची तरुण पत्नी आपल्या चार वर्षाच्या मुलीसह ते बॅरिस्टर म्हणून परततील व आपल्याला सुखात आणि वैभवात ठेवतील अशा आंशेने त्यांच्या आगमनाकडे डोळे लावून बसली होती. त्यांच्या चार वर्षांच्या मुलीला शिकवले होते की आपले 'सी माई आप्पा' (परदेशातले वडील) परत येतील आणि येताना बरोबर आपल्यासाठी खेळणी आणि बक्षिसे घेऊन येतील. अय्यर यांच्या पत्नीला लवकरच आपल्या पतीमध्ये केवढा बदल झाला आहे हे कळले. तिला लिहिलेल्या पत्रात अय्यर तिला उपदेश करीत की तिने झांशीच्या राणीप्रमाणे धाडसी व्हावे. आपले पती परत यावेत आणि सुखात व दुःखात आपल्याला त्यांची सेवा करता यावी ह्यासाठी त्यांची पत्नी मोठ्या तत्परतेने सर्व देवदेवतांची पूजा आणि प्रार्थना करी.

आपली छोटी मुलगी बोबडे शब्द बोलू लागली अशी जेव्हा पत्रातून बातमी आली तेव्हा अय्यर ह्यांनी आपल्या मुलीला लिहिले, ''प्रिय पट्टू, तू दररोज सकाळी उठल्यावर 'वंदेमातरम्' म्हणत जा. आणि त्या मातेला वंदन करीत जा.'' ती छोटी बालिका केवळ सकाळीच नाही तर दिवसभर वंदेमातरम् हे शब्द उच्चारित असे. तिच्या आजोबांना ह्याचा फार राग यायचा. कारण ही घोषणा उच्चारणे शासनाच्या दृष्टीने मोठा अपराध होता. आणि व्ही. ओ. चिदंबरम् पिळ्ळा आणि सुब्रह्मण्य शिवम् ह्यासारख्या तळमळीच्या देशभक्तांना ही घोषणा दिल्याबद्दल शिक्षा झालेली त्यांना माहीत होती.

त्यांच्या भीतीत आणखीही भर पडली. पोलिसांच्या हस्तकांनी अय्यर ह्यांच्या हालचाली आणि कार्यक्रम ह्यांची माहिती मिळावी म्हणून घरावर पहारा ठेवला. वयोवृद्ध वडील, आपल्या नशिबाला दोष देत. कारण दैवामुळे आपल्या मुलाच्या मनात महत्त्वाकांक्षा उत्पन्न झाली आणि त्यामुळे त्याला कुटुंबापासून आणि वैभवापासून दूर जावे लागले. अशा तऱ्हेने ते आपल्या भूतकाळाबद्दल दुःख करीत असता त्या छोट्या मुलीने वंदेमातरम् हे शब्द पुन्हापुन्हा म्हटलेले त्यांच्या कानी येत. भीतीने थरथर कापत व्यंकटेश अय्यर म्हणत, ''असे म्हणू नकोस. पोलीस येतील, तुला घेऊन जातील आणि तुरुंगात टाकतील.'' पण त्या बालिकेला भीती वाटत नसे. ती तेच शब्द निश्चयाने पुन्हापुन्हा उच्चारी. ''बाप तशी मुलगी.'' आजोबा पुटपुटत.

आपल्या मुलाच्या कृत्यांच्या परिणामाची भीती दीर्घकाळ व्यापून राहिली. आपल्या मुलाच्या चुकांमुळे त्यांनी शिक्षा म्हणून कुटुंबांची मालमत्ता जप्त केली तर आपलाही त्यात काही भाग नाही का ह्या विचाराने त्यांची झोप उडाली. 'माझ्या ह्या भटक्या मुलाने

माझ्यावर केव्हढी आपत्ती आणली' ते अनेक वेळा दुःख करून म्हणत.

अय्यर ह्यांची पत्नी सुद्धा तिचा स्वतःचा काहीही दोष नसतांना दुष्ट टीकेचे लक्ष्य बनली. घरातील जीवन हे तिच्या दृष्टीने कंटकशय्या ठरले. तिने बंगलोर येथे स्थायिक झालेल्या आपल्या चुलत भावाची - रंगून पशुपती अय्यर ह्यांची- मदत मागितली आणि आपल्या मुलीसह ती तिकडे राहाण्यास गेली. पशुपती अय्यर हे व्यवहारी गृहस्थ होते. त्यांनी अय्यर ह्यांच्या लंडनच्या प्रवासाला आणि बॅरिस्टरीच्या अभ्यासाला आर्थिक मदत केली होती. अय्यर ह्यांच्या देशभक्तीपर कार्याची वार्ता जेव्हा भारतात त्यांना कळली तेव्हा त्यांचीही मोठी निराशा झाली. पण अय्यरना पदवी मिळून बॅरिस्टरीच्या यादीत त्यांचे नाव आले की त्यांच्यात सुधारणा होईल अशी त्यांना आशा होती. पण जेव्हा बातमी आली की राजनिष्ठेची शपथ घ्यावी लागते. ह्या निमित्ताने अय्यरनी पदवीचा त्याग केला तेव्हा त्यांना दारुण धक्का बसला. मदनलाल धिंग्रा प्रकरण आणि त्याचे परिणाम ह्याने परिस्थिती अधिकच चिघळली. व्यवहारी पशुपती अय्यर ह्यांनी सौ. व. वे. सु. अय्यर ह्यांच्या आपल्या घरातील निवास गुप्त राहील अशी खबरदारी घेतली. पोलिसांकडून कोठलाही त्रास त्यांना नको होता.

ह्या कठीण परिस्थितीत अय्यर ह्यांच्या छोट्या मुलीला हगवण लागली. अय्यर ह्यांची पत्नी आपल्याकडे राहाते हे शेजाऱ्यांना कळू नये म्हणून त्यांनी डॉक्टरांना बोलावणे लांबणीवर टाकले. मुलीची प्रकृती अधिक चिंताजनक झाली. तिला वात झाला. त्यातून ती कधीच शुद्धीवर आली नाही आणि शेवटी तिचा मृत्यू झाला.

मुलीच्या मृत्यूचे वृत्त अय्यरना कळविण्यात आले. परंतु तिकडून येणाऱ्या पत्रांनी घरच्या मंडळींच्या विषादात भरच पडली. एका पत्रात म्हटलेले असे, ''मला इथून पुढे भारतात येता येणार नाही. मला पाहाण्याची आशा करू नका.'' दुसरे पत्र म्हणे, ''भविष्यात काय होईल हे मला माहीत नाही.'' तिसरे जाहीर करी, ''मी पॅरिसमध्ये राहण्याचे ठरविले आहे.'' ह्याचा पुनरुच्चार करी आणि चौथे, सौ. अय्यरनी पॅरिसला आपल्याकडे राहाण्यास यावे असे सांगे.

सौ. अय्यर पॅरिसला जाण्यास अर्थातच तयार होत्या. त्यांना फक्त प्रवासासाठी पैशाची मदत हवी होती. त्यांचा उदार चुलत भाऊ त्यांना पुन्हा एकदा मदत करण्यास तयार होता आणि त्याला स्वतःला पॅरिसला जाण्याची इच्छा होती. पशुपती अय्यरनी दोघांच्याही जाण्याची तयारी केली. परंतु दैवाने वेगळेच योजले. घोड्यावरून जात असता पशुपती अय्यर खाली पडले आणि त्यांचा घोटा दुखावला. पॅरिसची सफर अनिश्चित काळापर्यंत पुढे ढकलण्यात आली.

तोपर्यंत सर्व काळ अय्यर यांची पत्रे त्यांना पॅरिसला लौकर येण्याचा आग्रह करीत होती. आठवड्यामागून आठवडे उलटले. पशुपती अय्यर अद्याप सुधारले नव्हते. परंतु आता अय्यर यांच्यात एकदम आकस्मिक बदल दिसू लागला. त्यांनी लिहिले की आपण

भारतात येण्याचे किंवा पॅरिस येथे राहाण्याचे बेत बदलले असून द. अमेरिकेतील ब्राझील येथे जात आहो, त्यांनी आपल्या पत्नीला लिहिले की तिने आपल्या वडिलांचे व चुलतभावाचे मन वळवून कष्टाळू दक्षिण भारतीय कुटुंबांचा एक जथा आपल्याबरोबर ब्राझील येथे जाण्यासाठी निवडावा.

ह्या नव्या घटनेने काय सूचित केले होते ? पॅरिस आणि युरोपचे सुधारलेले जग सोडून एका अनोळखी; दूरदूरच्या प्रदेशात अनोख्या भविष्यासाठी जायचे ? पत्नी आणि तिचे नातेवाईक यांचा अवर्णनीय गोंधळ झाला आणि त्यांना काळजी वाटू लागली.

त्यांच्या विस्मयात भर टाकण्यासाठीच की काय, मादाम कामांकडून एक पत्र आले आणि त्यात रहस्यमय पद्धतीने लिहिले होते, ''मी तुमच्या पतींना एका दूर देशाला पाठवले आहे. कुठे ते विचारू नका. वाट पहा आणि आशा सोडू नका.''

हा एक आकाशातून कोसळलेला वज्राघातच होता. काळजीने ग्रस्त झालेल्या त्या बिचाऱ्या पत्नीच्या मनात विचार आले, ''काय, आणखी एक रहस्यमय कार्य ? कुठे ? आता ते सुरक्षितपणे परत तरी येतील का ? आणि कधी ?''

अशा तऱ्हेने ज्यांना कधी अंत नाही अशा ह्या प्रश्नांची आणि संशयानी स्वतःला मरणप्राय क्लेश करून घेत असता आणि सर्व देवांची प्रार्थना करीत असता त्यांना आणखी एक पत्र आले- आणि ते त्यांच्या पतीकडून पाँडिचेरीहून ! त्याचा परिणाम एखाद्या गुणकारी औषधासारखा सुखद झाला. त्यांच्या आनंदाला पारावार उरला नाही. पशुपती अय्यरनादेखील काहीसे समाधान वाटले. काहीही म्हटले तरी अय्यर सुरक्षित असून घराच्या जवळपास आले आहेत आणि ब्रिटिशांच्या कचाट्यातून सुटले आहेत ही गोष्ट समाधानाची होती. पशुपती अय्यर यांचे पाँडिचेरी येथे व्यापारी संबंध होते आणि त्यामुळे त्यांना अय्यर यांची तेथे भेट घेणे शक्य होते. मात्र अय्यर यांनी बॅरिस्टर म्हणून व्यवसाय करून भरभराटीचा धंदा करण्याची सुवर्णसंधी गमावली याबद्दल पशुपती अय्यरना इतरांइतकीच निराशा वाटली.

अय्यर यांच्या वडिलांना आपला मुलगा फाशीपासून आणि अंदमानापासून सुरक्षित असल्याबद्दल हायसे वाटले परंतु त्यांनी राष्ट्रीय कार्यात वेळ घालवून आपल्या व्यवसायाची हानी करावी ह्या बद्दल त्यांच्या मनाची समजूत अद्याप पटली नव्हती. अय्यर यांच्या या उद्योगाने घराची शांतता बिघडण्याचाही धोका होता. वडील, व्यंकटेश अय्यर पाँडिचेरीला आपल्या मुलाला भेटण्यासाठी आले. त्यांच्या भेटीचे दोन हेतू होते. इतक्या दिवसांच्या ताटातुटीनंतर त्यांना आपल्या मुलाला भेटायचे होते आणि त्याने वराहनेरी येथील आपल्या वडिलोपार्जित मालमत्तेवरील आपले हक्क कायदेशीररीत्या सोडावे असाही त्यांचा हेतू होता. अय्यर यांनी जितक्या उमदेपणाने आपल्या वकिलीच्या भरभराटीच्या भविष्यावर पाणी सोडले तितक्याच औदार्याने त्यांनी वराहनेरी येथील वडलोपार्जित घरावरील आपला हक्क सोडला. हे एक उल्लेखनीय त्यागाचे कृत्य होते आणि त्यांना उत्पन्नाचे काही साधन

नव्हते. परंतु अय्यर यांच्या उदात्त स्वभावाचे हे द्योतक होते.

मंडायम् श्रीनिवासाचार्य यांनी अय्यर यांच्यासाठी ईश्वरन् कोयल स्ट्रीटवर एक घर पाहिले. ते स्वतः आणि भारती जवळच राहात असत. अय्यर यांच्या पत्नी भाग्यलक्ष्मी अम्मल तेथे आल्या आणि तीन वर्षानंतर अय्यर आणि त्यांच्या पत्नी यांचे पुनर्मीलन झाले. त्यांचे कौटुंबिक जीवन पुन्हा एकवार चालू झाले. आपले पती परत येऊन कुटुंबाला श्रीमंतीत व भरभराटीत ठेवतील ह्याबद्दल त्यांची स्वप्ने भंग पावली होती हे खरे परंतु लौकरच त्यांनी आपल्या पतीच्या मातृभूमीच्या सेवा भक्तींशी जुळवून घेतले. पुढच्या काही वर्षात त्या वीर पतीच्या वीर पत्नी बनल्या.

ईश्वरन् धर्मराज कोयल स्ट्रीटचे वर्णन भारतींनी आपल्या एका कवितेत ''ह्या पथावर कीर्तीला आश्रयस्थान मिळाले'' असे केले आहे. हा संदर्भ ते स्वतः अय्यर आणि श्रीनिवासाचार्य तेथे राहात असल्याबद्दलचा होता- हे सर्वच हद्दपार असून त्यांना पॉंडिचेरीला आश्रय मिळाला होता. ह्या तिन्ही कुटुंबाचे रक्ताचे नाते नसले तरी ते जवळच्या नातेवाईकांप्रमाणे राहात असत, एकमेकांच्या आपत्तीचा वाटा उचलीत आणि संकटाच्या वेळी एकमेकांना सहाय्य करीत.

एकमेकांमध्ये मिसळल्याशिवाय, नमस्कार चमत्कार केल्याशिवाय आणि एकमेकांशी हितगुज केल्याशिवाय त्यांचा एकही दिवस जात नसे. श्रीनिवासाचार्यांच्या घरी अय्यर आणि भारती दररोज तीन एक तास राजकारणाची चर्चा करण्यात पत्ते किंवा बुध्दिबळे खेळण्यात आणि वाङमय चर्चा करण्यात, आपण लिहीत असलेल्या लिखाणाबदल बोलण्यात घालवीत असत. आठवड्यातील कित्येक दिवस ते तेथून थोड्या दूर असलेल्या, किनाऱ्यावरील अरविंदांच्या घरी जात आणि तेथे वेद आणि अध्यात्मिक सत्ये यांवर चर्चा करीत. आपल्या बायकामुलांसह ते अरविंदांच्या निवासाला भेट देत आणि तेथे काही वेळ काढून समुद्रकिनाऱ्यावरील वाळूवर जात. सकाळच्या वेळी कधी कधी समुद्रात स्नान करीत. अय्यर यावेळी त्यांना खोल समुद्रात घेऊन जात. ते कुशल पोहणारे होते. आगि कुठल्याही परिस्थितीत त्यांची गती कधी कुंठित होत नसे.

बुद्धीबळात अय्यर यांचा हातखंडा होता. भारतीचा खेळ साहसपूर्ण असे. आपली प्यादी त्यांना मारण्यास देऊन अय्यर अकस्मितपणे त्यांच्यावर डाव उलटवीत. बाळसदृश निरागसतेने भारती त्यांच्यावर 'निर्घृण खुनाचा' आरोप करीत आणि दुसऱ्या वेळेस आपण याचा बदला घेऊ असे बजावीत. पण प्रत्यक्षात अशी वेळ कधीच येत नसे.

पत्ते खेळण्यातही भारती यांची गती नवशिक्यापेक्षा अधिक नसे पणं अय्यर कोठल्याही गोष्टीत पद्धतशीरपणे लक्ष घालण्याची देणगी असल्याने त्यांचे त्यातही प्रभुत्व असे. ते सुव्यवस्थितपणे खेळत. पॉंडिचेरी येथे जवळपास दारिद्र्यात दिवस घालवित असता या पद्धतशीर दृष्टिकोनामुळे अय्यर यांचा उपासमारीपासून बचाव झाला.

# वांची ॲशला गोळी घालतो

पाँडिचेरीला आल्यानंतर काही दिवसांनी काहीच उद्योग नसल्यामुळे अय्यर अस्वस्थ झाले. ''खूप काम करण्यासारखे आहे. केवळ मद्रासच नाही तर सर्व भारत; पाँडिचेरीमधील स्वदेशी मंडळी काही मोठे करून दाखवतील अशा आशेने भविष्याकडे बघत राहिला आहे. आपण काहीही न करणे बरोबर नाही,'' ते आपल्याशी पुटपुटत. घाईघाईने काहीतरी बाह्यातूकारी करण्यापेक्षा स्वतःची अध्यात्मिकदृष्ट्या तयारी करणे हे अधिक महत्त्वाचे आहे ह्यावर श्री. अरविंद जोर देत. अय्यर मात्र म्हणत की, स्वतःची शुद्धता महत्त्वाची असली तरी देशासाठी काहीतरी बाह्य कार्यही केले पाहिजे.

लौकरच अय्यरने आपल्याभोवती राष्ट्रीय कार्य करण्याची तयारी असलेल्या तरुणांचा एक संच जमविला. मंडायम् श्रीनिवासाचार्य म्हणतात, ''योग्य कार्याला योग्य माणूस निवडणे यात अय्यर यांचा हातखंडा होता. स्वराज्यामध्ये रस असलेले काही तरुण गोळा करून त्यांनी त्यांना व्यायामाचे आणि तमिळ विदग्ध वाङमयाचे सखोल ज्ञान देण्यास सुरुवात केली. त्यांना वापरण्यासाठी त्यांनी एक वेगळे घर घेऊन दिले आणि तेथे एका मित्राकडून त्यांना वाणिज्य व्यवहार शिकण्याची व्यवस्था केली. त्यांना मुष्टियुद्ध, कुस्ती, तलवारीचे हात आणि सिलम्बम् (एका लहानशा काठीने स्वतःचा बचाव करण्याची प्राचीन विद्या) यांचेही शिक्षण देण्यास सुरुवात केली. त्यांना वाचण्यासाठी पुस्तके व वृत्तपत्रे पुरविण्यात येत. चर्चा व वादविवाद होत आणि राष्ट्रीय वृत्तीची त्यांच्यात जोपासना करण्याचा प्रयत्न असे. इंडिया साप्ताहिकाचे भूतपूर्व प्रशासकीय सहाय्यक एन्. नागस्वामी यांच्याकडे ह्या गोष्टी सोपविल्या होत्या. नागस्वामी, अय्यर यांच्या घरी जेवण करीत. महत्त्वाचे सण आणि राष्ट्रीय वीर पुरुषांचे दिन साजरे केले जात. अय्यर यांनी अन्य ठिकाणी सुद्धा आपल्या मित्राकरवी अशा तऱ्हेच्या संस्था स्थापन करण्याचे प्रयत्न केले. त्यांच्या अगमनानंतर ते सारखे काही ना काही तरी उद्योग करीत असत. या सर्व गोष्टी प्रकटपणे केल्या जात असल्यामुळे पाँडिचेरीतील ब्रिटिश भारतीय हेरांना त्यांची साद्यंत

माहिती मिळविण्यास काहीच त्रास पडत नसे. अय्यर यांच्या कार्यावर त्यांचे बारीक लक्ष असे.

अय्यर ह्यांनी केलेल्या कामाचे साद्यंत वर्णन एन्. नागस्वामी ह्यांनी सुद्धा दिले आहे. तरुणांच्या वापरासाठी जे घर दिलेले होते, त्याला 'धर्मालयम्' असे म्हणत आणि ते '८९ ईश्वरन् धर्मराज कोयल स्ट्रीट' येथे होते. धर्मालयम्च्या वतीने ''धर्मम्'' ह्या नावाचे एक मासिक प्रसिद्ध केले जाई. त्याचे सम्पादक आर्. कृष्णस्वामी अय्यर होते. आणि एम्. नारायणम् त्याचे मुद्रण करीत. हे नियतकालिक अनन्यसाधारण होते. कारण ज्यांना त्यात रस असे त्यांना ते विनामूल्य वाटले जाई. हे आठ पानांचे पत्रक स्वतंत्रम्, समत्त्वम् आणि सहोदरत्वम् (स्वातंत्र्य, समता आणि बंधुभाव) ह्या ध्येयाचा प्रचार करी. 'भारताच्या ऱ्हासाची कारणे,' 'स्वातंत्र्याचा मार्ग,' 'मानवाचे कर्तव्य' इ. विषयांवर त्यात लेख असत. नागस्वामी म्हणतात, ''भारतीय स्वातंत्र्याच्या चळवळीला मदत करणे हा ह्या पत्राचा हेतू होता. हितचिंतकांकडून मिळालेल्या देणग्यांवर त्याचा योगक्षेम चाले. इंग्रजी आणि तमिळ भाषांमध्ये पुस्तिका छापून त्यांचे व्यक्तिशः आणि पोस्टाने मोठ्या प्रमाणात वाटप होत असे.''

नागस्वामी पुढे लिहितात, ''धर्मालयम्ला अनेक वृत्तपत्रांच्या प्रती येत असत. त्यात मादाम कामा पॅरिसमध्ये प्रसिद्ध करीत असलेले ''वंदेमातरम्'' जर्मनीतील भारतीय क्रांतिकारकांचे ''तलवार'' श्यामजी कृष्ण वर्मा स्वित्झर्लंडमध्ये प्रसिद्ध करीत असलेले ''इंडियन सोशलाजिस्ट आणि न्युयॉर्कहून प्रसिद्ध होणारे गॅएलिक अमेरिकन ह्या सर्व पत्रांवर ब्रिटिश भारतात बंदी घालण्यात आली होती. त्यांची ब्रिटिश भारताच्या सरहद्दीवर गुप्तपणे आयात होई आणि ती पोस्टाने अनेक पत्त्यांवर पाठविली जात.

सावरकरांच्या ''इंडियन वॉर ऑफ इंडिपेंडन्स (१८५७)'' ह्या पुस्तकाच्या पाचशे प्रती बैलगाडीत घालून मध्यरात्री सरहद्दीच्या बाहेर नेऊन कांचिपुरम् येथून सर्व भारतभर वाटल्या गेल्या. पुस्तकाच्या एका प्रतीला शंभर रुपये देण्यास ब्रिटिश गुप्तपोलीस पथकातील लोक तयार होते !

''धर्मालयम् शारीरिक शिक्षणाचा महत्त्वाचा प्रचार करीत. तरुण लोक पहाटे जमून निरनिराळ्या तऱ्हेचे व्यायाम घेत. रविवारी आणि गुरुवारी ते समुद्रावर पोहण्यास जात. काही वेळेस संध्याकाळचे वेळी पॉंडिचेरी चौपाटीच्या वाळूवर पळण्याचा व्यायामही ते करीत.''

ही सर्व क्रांतिकारक केंद्र निर्माण करण्याची तयारी होती. बहुधा त्याची संघटना करण्याचा अय्यर ह्यांचा बेत असावा. परंतु पॉंडिचेरीचे वातावरण लंडनच्या वातावरणापेक्षा फारच निराळे होते. ह्याशिवाय दुर्दैवाने क्रांतीवर विश्वास असलेल्या दोन पुढाऱ्यांमध्ये क्रांतीसंबंधी तात्कालिक दृष्टिकोन काय असावा ह्या संबंधी मतभेद झाले. नीळकांत ब्रह्मचारी तमिळ साप्ताहिक ''सूर्योदयम्'' चे संपादक ह्यांचे अय्यर ह्यांच्याशी तीव्र

वैचारिक मतभेद झाले. नीलकान्त ह्यांच्या मते ''अय्यर ह्यांचा दहशतवादावर, युरोपीय आणि त्यांचे मदतनीस ह्यांच्या व्यक्तिगत खुनांवर विश्वास असे. युरोपमधून आल्यानंतर त्यांना असे वाटू लागले की भारतीय परिस्थिती संघटित क्रांतीला अनुकूल नाही. त्यांना माहीत नव्हते आणि त्यांचा विश्वासही नव्हता की सर्व भारतात एक खूप मोठे क्रांतिकारी आंदोलन संघटित करण्याचा प्रयत्न चालू होता. बडोद्याचे महाराज आणि श्री. अरविन्द ह्यांचा जर्मन शासनाशी संबंध होता. १९१४ च्या जवळ जवळ एक दशक आधी ते राष्ट्र मोठे जागतिक युद्ध सुरू करण्याच्या प्रयत्नात होते. जर्मनीच्या परराष्ट्र कार्यालयाने बडोद्याशी संपर्क साधला होता आणि सर्व भारतभर बंड सुरू करण्यासाठी आपण मोठ्या प्रमाणात हत्यारांचे सहाय्य करू असे आश्वासन दिले होते. इतर संस्थानिकही आले होते. मी स्वतः द. भारतातील पोलिगार संस्थानिकांची संघटना करण्याच्या प्रयत्नात होतो.

''भारतातील दहशतवाद्यांपुढे अखिल भारतीय योजना होती. ते काही येथे काही तेथे अशा तऱ्हेने एकाकी आणि विभक्तपणे कार्य करीत. भारतात दहशतवादाची पाळेमुळे खरोखर रुजलीच नाहीत. परदेशात राहाणाऱ्या भारतीयांनी त्याची जोपसना केली. अय्यर ह्यांच्यावर रशियामधील बॉम्ब फेकणाऱ्या अराज्यवाद्यांचा प्रभाव होता. ते भारतात आले तेव्हा भारतामध्ये काय केले गेले आहे ह्यासंबंधी त्यांना ज्ञान नव्हते. मी स्वतः जेव्हा बडोद्याने काय केलेले आहे आणि मी दक्षिणेमध्ये काय करीत आहे हे सांगितले तेव्हा त्यावर त्यांचा विश्वास बसला नाही. त्यांनी ह्या गोष्टी उडवून लावल्या. अशा तऱ्हेने आमच्यामध्ये तीव्र वैचारिक मतभेद होते. एक दिवस त्याचे पर्यवसान निकराच्या वादविवादात झाले.

पॉंडिचेरी येथे अशा तऱ्हेच्या गोष्टी घडत असता कोइम्बतूर तुरुंगामध्ये असलेल्या व्ही. ओ. चिदंबरम् पिळ्ळा ह्यांचे एक मित्र परली, एस् नलायप्पा पिळ्ळा हे त्यांची भेट घेऊन आले व त्यांनी चिदंबरम् पिळ्ळा ह्यांचा तुरुंगात छळ होत असल्याच्या हृदयद्रावक कथा सांगितल्या. चिदंबरम् पिळ्ळा ह्यांनी उद्वेगाने असे उद्गार काढण्याचे सांगण्यात आले की, हे सर्व उपजिल्हाधिकारी ॲश ह्यांचे कृत्य आहे. ह्या माणसाच्या राक्षसी कृत्याला काही अंत नाही का ?

ॲश हे तुतिकोरीनचे उपजिल्हाधिकारी होते. त्यांनी चिदंबरम् पिळ्ळा ह्यांचा छळ करून त्यांना १९०८ मध्ये तुरुंगात डांबले- चिदंबरम् पिळ्ळा आणि त्यांचे सहकारी सुब्रह्मण्य सदाशिवम् ह्यांच्या अटकेनंतर तिरुनेलवेलीच्या दंग्यांना सुरुवात झाली. हे दंगे दडपून टाकण्यासाठी जिल्हाधिकारी विंच आणि उपजिल्हाधिकारी ॲश ह्यांनी रानटीपणाने वर्तन केले. ॲश स्वतः पुढे जिल्हाधिकारी झाले. मद्रास शासनावर त्यांचा मोठा प्रभाव असे आणि चिदंबरम् पिळ्ळा ह्यांचे नीतिधैर्य खचावे ह्यासाठी ते त्यांचा तुरुंगामध्ये छळ करीत.

नेलायप्पन् ह्याच्या जवळ चिदंबरम् पिळ्ळा ह्यांनी काढलेले उद्गार म्हणजे ॲश

ह्यांना नष्ट करण्याची चिथावणी आहे असे चिदंबरम् पिळ्ळा ह्यांच्या बाहेरील सहकाऱ्यांनी मानले. ह्या बाबतीत त्यांनी मारवा येथील संस्थानिकांना चाचपून पाहिले. पण त्यांनी नकार दिला. कारण ते नीलकान्त ब्रह्मचारी ह्यांच्याशी सल्ला मसलत करीत आणि स्वतः नीलकान्त ह्या कटाच्या विरुद्ध होते. अय्यर ह्यांना जेव्हा हे कळले तेव्हा आपण ह्या बाबतीत काहीतरी करावे असा त्यांनी निश्चय केला.

ह्याच वेळी जानेवारी १९११ च्या सुरुवातीला त्रावणकोर संस्थानच्या जंगल खात्यातील एक कारकून आणि नीलकान्त ब्रह्मचारी ह्यांच्या क्रांतिकारी वर्तुळाचे एक सभासद वांची अय्यर हे नीलकांत ह्यांना भेटण्यासाठी पॉंडिचेरीला आले. कर्मधर्म संयोगाने नीलकान्त बाहेरगावी गेले होते. त्यामुळे वांची अय्यर ह्यांस एक आठवडा माशा मरीत बसावे लागणार होते. येथे सक्तीने थांबावे लागल्यामुळे वांचीनी अय्यर आणि पॉंडिचेरीच्या इतर पुढाऱ्यांच्या भेटी घेतल्या ह्या तरुणाची क्षमता अय्यर ह्यांनी जाणली. तात्काळ त्यांनी त्याला आपल्या कंपूत ओढले व ॲश ह्यांच्यावर गोळीबार करण्यासाठी त्यांच्या मनाची तयारी केली. ॲश ह्यांना मार्गातून दूर करण्याचे वांचीनी मान्य केले. ते आपल्या गावी जाऊन प्रशिक्षणाच्या तयारीसाठी परतले- अय्यर ह्यांचे सहाय्यक नागसामी लिहितात :

''धर्मालयमूने वांचींचे हार्दिक स्वागत केले. ते एक महिना राहिले. महिनाभर अय्यर नियमितपणे येत आणि वांचींना खाजगी प्रशिक्षण देत. दररोज पहाटे चार वाजता वांचींना गराडीकुप्पम् ओडाई येथे नेण्यात येई आणि तेथे त्यांना सरळ नेम मारण्याचा सराव दिला जाई. दरम्यान मादाम कामा यांनी पाठविलेले ब्राउनिंग पिस्तूल येऊन पोचले. 'आर्यांचे कर्त्यव्य' ही तमिळ पुस्तिकाही तयार झाली. मे १९११ च्या शेवटच्या आठवड्यात एकारात्री मी आणि कन्नुपिळ्ळा यांनी पिस्तुल आणि पुस्तिकेसह वांची यांना धर्मलयमूच्या बाहेर पोचविले. आम्ही पायी विलियानूरला गेलो आणि तेथून बाहूर येथे. तेथे आम्ही नदी ओलांडली आणि तिरुप्पापुलियूर येथून दक्षिणेकडे जाणाऱ्या आगगाडीत वांचींना बसवून दिले.

जुलै १७, १९१७ ला वांचींनी तडाखा हाणला. ''ॲश खुनाचे'' मथळे सर्व भारतभर बातम्यात आले.

रॉबर्ट विल्यमद' एस्तकोर ॲश्, तिरुनेलवेलीचे जिल्हाधिकारी, तिरुनवेलीहून कोडाईकनालच्या गिरीविहाराकडे चालले होते. हा गिरीविहार शेजारच्या मदुराई जिल्ह्यात होता. ॲशना मणियाची जंक्शनवर गाडी बदलणे भाग होते. वांचींनी सुध्दा ॲशवर सक्त पाहारा करीत तिरुनेलवेली पासून त्याच गाडीने प्रवास केला.

मणियाचीला गाडी पोचल्यावर ॲश आणि त्यांच्या पत्नी पहिल्या वर्गाच्या डब्यातून उतरले आणि फलाटावर उभ्या असलेल्या कोडाईकनालच्या गाडीत त्यांनी आपापल्या जागा घेतल्या. ॲश काहीतरी वाचीत होते आणि त्यांची पत्नी बाहेर फलाटाकडे बघत

होती. जवळच्या फलाटावर एक मेलगाडी येऊन उभी राहिली आणि प्रवासी इकडे तिकडे घाईगर्दीने येऊजाऊ लागले. पिस्तुलाचा बार झाला आणि ॲश यांच्या छातीच्या डाव्या बाजूस जत्रूच्या (कॉलरबोन) खाली गोळी लागली. हल्लेखोर एक तरूण माणूस होता. आणखी काही बार झाले आणि ॲश डब्यात खाली पडले. त्यांच्या जखमेतून खूपच रक्तस्त्राव होत होता. थोड्याच वेळात ते गत प्राण झाले.

हल्लेखोर वांची अय्यर यांची ॲश गतप्राण झाल्याची खात्री पटल्यावर त्यांनी त्या ठिकाणाहून निघून जाण्याची घाई केली. ॲश यांच्या व्यक्तिगत नोकराने त्यांना पकडण्याचा यत्न केला पण वांची निसटले. धूर निघत असलेले पिस्तूल हातात घेऊन ते फलाटावरून चालत जो कोणी आपल्या जवळ येण्याचे धाडस करील त्याला ठार करण्याची धमकी देत होते. फलाटाच्या शेवटी असलेल्या एका मुत्रीमध्ये शिरून वांचीनी आपल्या तोंडावर गोळी मारून घेऊन स्वतःचा शेवट करून घेतला.

बराच काळ मुत्रीमध्ये जाण्याची पोलिसांची छाती होईना. सरतेशेवटी ते आत गेल्यावर त्यांना वांची खाली जमिनीवर मरून पडलेले दिसले. त्यांच्या उजव्या हातात अद्याप पिस्तूल घट्ट धरून ठेवलेले होते.

दहशतवादी कृत्यांबद्दलच्या रौलट अहवालात पोलिस दफ्तरातील उतारे घेतले आहेत. त्यावरून वांचींच्या अंगातील कपड्यात एक तमिळ निवेदन सापडले असे दिसते. त्यात म्हटले होते की, इंग्रजांना हाकलून देऊन स्वराज्य पुन्हा मिळविण्याच्या प्रयत्नात प्रत्येक भारतीय आहे. ह्या भूमीवर राम, कृष्ण, गुरु गोविंद आणि गुरु अर्जुन यांचे राज्य होते आणि सर्व धर्मांना संरक्षण असे परंतु आता इंग्रज लोक एका गोमांस खाणाऱ्या मेलच्छाला राज्यपदावर बसविण्याच्या प्रयत्नात आहेत. बादशहा पाचवे जॉर्ज भारतात राज्यारोहणासाठी आल्याबरोबर त्यांना ठार मारण्याची तीन हजार लोकांनी शपथ घेतली आहे. आणि मी स्वतः वांची त्यामधील एक नगण्य व्यक्ती- हे कृत्य करून आपली ही इच्छा जाहीर करीत आहे.''

वांचीचे मेहुणे शंकरकृष्णन् आणि इतरांच्या घरांच्या झडत्या घेतल्यावर दोन पुस्तिका सापडल्या. त्यातील एका ''आर्यांना उपदेशाचे दोनशब्द'' या पुस्तिकेत 'फिरंग्यांना' शक्यतोवर ठार मारावे अशी विनंती करण्यात आली होती. दुसरी पुस्तिका ''अभिनव भारत संघटनेत प्रवेश घेण्याची शपथ'' ह्या नावाची होती. पोलिसांच्या मते ह्या पुस्तिकांच्या प्रत्येकी दहा प्रती ''धर्मम्'' ह्या पॉंडिचेरीच्या वृत्तपत्रात काम करणाऱ्या एका कर्मचाऱ्याने बाहेर पाठविल्या होत्या.

क्रांतिकारक नीलकांत ब्रह्मचारी यांनी कट करून ॲश यांचा खून करवला असा पोलिसांना दाट संशय होता. परंतु ते ह्या कृत्याच्या निश्चितपणे विरोधी होते हे आपण पाहिले आहे. आपला हस्तक वांची याला अय्यर यांनी आमिष दाखवून ते कृत्य करण्यास भाग पाडले तेव्हा आपण घटनास्थळापासून शक्य तितके लांब असणे उत्तम असे नीलकांत

यांनी ठरविले. हे कृत्य घडण्याआधी कित्येक आठवडे ते उत्तरेस काशीला (बनारसला) जाऊन एका मित्राकडे राहिले आणि तेथे त्यांनी ह्या हत्येच्या वर्तमानपत्रात आलेल्या बातम्या वाचल्या. नीलकांत यांच्या अनेक निकटच्या अनुयायांना अटक झाली असून त्यांचे उजवे हात शंकरकृष्णन् हेही आहेत असे वृत्तपत्रीय वृत्तांत होते. त्यांच्या घरांच्या झडत्या घेण्यात येऊन त्यात काही आक्षेपार्ह पत्रे सापडण्याचेही वृत्त होते. पोलिस नीलकांताच्या तपासात असल्याचेही लिहिण्यात आले होते.

आपल्या क्षेत्रातील ज्येष्ठांचा सल्ला घेण्यासाठी नीलकांत कलकत्ता येथे गेले आणि त्यांच्या सल्ल्याने ते कलकत्त्यालाच पोलीसांच्या स्वाधीन झाले. ॲश ह्यांच्या हत्येचा कट केल्याच्या आरोपाबाबत ते निरपराधी होते परंतु संरकार विरुद्ध बंडाला चिथावणी देण्याच्या बाबतीत ते दोषी होते.

नवल असे की मद्रास पोलिसांनी व. वे. सु. अय्यरना ॲश खून प्रकरणात अजिबात गोवले नाही. माहिती नसल्यामुळे म्हणा किंवा पुराव्याच्या अभावामुळे म्हणा, अय्यर यांचा या कटामधील सहभाग लक्षातच घेतला गेला नाही. उलट, नीलकांत ब्रह्माचारी यांचा खरोखर ह्या गुन्ह्यात मुळीच हात नसता त्यांना मात्र ॲश खून खटल्यातील आरोपी नं. १ बनविले होते. त्यांच्यावरील आरोप म्हणजे ॲशचा खून करण्याचा कट करणे आणि राजाचे सरकार उलथून पाडण्याचा यत्न करणे. खटला खूप दिवस चालला आणि न्यायाधिशांनी कटाच्या आरोपातून आरोप सिद्ध न झाल्याने नीलकांत यांना निर्दोषी ठरवले आणि त्यांना सात वर्षाची सक्त मजुरीची शिक्षा दिली. इतरांना ह्या पेक्षा कमी शिक्षा देण्यात आल्या. ह्यातील मुख्य चिथावणी देणाऱ्या अय्यरना मात्र सहीसलामत सोडण्यात आले. ते पॉंडिचेरी येथे सुरक्षित होते आणि त्यांना पकडण्याचा हुकूमही नव्हता. जुना ब्रिटिश हुकूम (जर तो अद्याप कायदेशीर असलाच तर) जवळ जवळ विसरला गेल्या सारखाच होता.

ह्याचा अर्थ अय्यर ब्रिटिश - भारतीय पोलिसांच्या दृष्टीने एक चांगला मुलगा झाले होते असा नव्हे. त्यांना पुष्कळ त्रास झाला. आपण हे लौकरच पाहाणार आहो.

ॲशच्या खुनामुळे ब्रिटिश सत्ताधाऱ्यांना मोठा धक्का बसला. कारण त्यांची अशी कल्पना होती की, कुठल्याही तऱ्हेच्या हिंसक चळवळींपासून मद्रास प्रांत अलिप्त होता. पॉंडिचेरी येथील देशभक्तांचा ॲश खुनाशी संबंध आहे हे त्यांना सिद्ध करता येत नव्हते; तरी पॉंडिचेरीवर दिवसरात्र पहारा ठेवावा ह्याबद्दल मात्र त्यांची खात्री होती. तेथे इतके हद्दपार पुढारी राहात होते की काही तरी कट शिजवून इंग्रजांना त्रास देण्याची शक्यता डावलणे अशक्य होते. युरोपमध्ये युद्धाचे ढग जमत असतांना अत्यंत कडक पहारा आवश्यक होता. भारती, अय्यर, श्रीनिवासाचार्य आणि काही अंशी श्री. अरविंदाचा सुद्धा छळ होण्याचे हे युग होते. मद्रास पोलिसांची एक मोठी तुकडी पॉंडिचेरीच्या सरहद्दीवर छावणी करून राहात होती. साध्या पोषाखातील त्यांचे अगणित हस्तक पॉंडिचेरीत चंचू प्रवेश करून देशभक्तांवर पहारा करीत होते. फ्रेंच भारतीय सत्ताधाऱ्यांशी त्यांचे वितुष्ट यावे

ह्यासाठी अनेक कट रचण्यात आले. आपल्या विरुद्ध होणाऱ्या ह्या सर्व कुटिल कारवायांना बळी न पडता सर्व देशभक्त सुरक्षित राहिले हा एक चमत्कारच मानावा लागेल.

वा. रा. (व्ही. रामस्वामी अय्यंगार), प्रसिद्ध तमिळ लेखक आणि भारतींचे चरित्रकार ह्यांनी मद्रास पोलिसांनी पॉंडिचेरीच्या 'स्वदेशी' मंडळींना कुठल्यातरी कटकटीत गुंतविण्यासाठी जे प्रयत्न केले त्यांचे रोचक वर्णन केले आहे. वा. रा. म्हणतात, ''मद्रास पोलिसांनी पॉंडिचेरीवर अक्षरशः आक्रमण केले असेच म्हणावे लागेल. पोलिसांपैकी शेकडो शहरात होते. भारतींचे घर, अय्यरांचे घर, अरविन्दांचे घर- सगळीकडे बाहेर ते थव्याथव्याने बसत. हे सगळे एखाद्या कळसूत्री बाहुल्यांच्या खेळाप्रमाणे होते. क्रांतिकारक जर घरात नसतील तर शेजारच्या घरांमध्ये पोलिस लोक ठाण मांडून बसत. ते बाहेर गेले की काही अंतर ठेवून ते त्यांचा पाठलाग करीत. क्रांतिकारकांना त्रास देण्यास तर सुरुवात झालीच; पण पुढे त्यांच्या मित्रांनाही त्याची कटकट होऊ लागली.

पुढे ब्रिटिश भारतीय पोलिसांनी पॉंडिचेरी येथे एक बंगला भाड्याने घेतला. अब्दुल करीम ह्या नावाचे दुय्यम अधिक्षक ह्या सर्व कारवायांचे मुख्य होते. दोन समर्थ पोलीस तपासनीस गुरुअप्पा नायडू आणि रंगास्वामी अय्यंगार हे त्यांच्या हाताखाली होते. कल्पना येणार नाही इतक्या उत्साहाने ह्या सर्वांनी क्रांतिकारकांना वेढा घालून त्यांना चिरडण्याचा प्रयत्न केला. ह्या अधिकाऱ्यांशिवाय मोठ्या संख्येने इन्स्पेक्टर, फौजदार, हेड कॉन्स्टेबल आणि कॉन्स्टेबल त्यांच्या मदतीला होते. एकूण संख्या दोनशेपेक्षा कमी नव्हती. . . . .

''क्रांतिकारक जेव्हा घराबाहेर जात तेव्हा ब्रिटिश भारतीय पोलीस त्यांचा पाठलाग करीत आणि बाकीचे शहरामध्ये विखरून शहरामधील आपआपल्या दर्जाच्या लोकात मिसळत. सामान्य पोलीस शिपाई, रिक्षा ओढणारे किंवा पानपट्टीवाल्यांमध्ये मिसळत. आणि त्यांनी भारतीय नेत्यांशी कुठलाही संबंध ठेवू नये असे त्यांना सांगत. फौजदार लोक सधन लोकांच्या भेटी घेत आणि त्यांना देशभक्तांना मदत करण्याबद्दल स्पष्ट इशारे देत. . . . . गुरुअप्पा नायडू आणि रंगास्वामी अय्यंगार बऱ्याच वेळेस भारतींना येऊन भेटत. आपण हुषारीने बोलून भारतींच्या कार्यातील रहस्ये त्यांच्याकडून वदवून घेऊ असे त्यांना वाटे. ॲश ह्यांचा खुनी वांची ह्याचे आणि पॉंडिचेरीच्या स्वदेशी लोकांचे गुप्त अनुबंध काय असावेत ह्याबद्दल आपण बातम्या काढू शकू असेही त्यांना वाटे. देशभक्तांकडून फ्रान्स आणि परदेशातील इतर देशांकडून हत्यारे मिळतात अशी जोरदार अफवा होती. ह्या संशयावरून पॉंडिचेरी येथील ब्रिटिश पोलीस भारती, अय्यर आणि इतरांच्या घरी कधी जवाहिऱ्याच्या व्यापाऱ्याच्या वेषात तर कधी वकिलाच्या, कधी तमिळनाडूहून आलेल्या कळकळीच्या देशभक्तांच्या वेषात तर कधी संन्यासी म्हणून तर कधी कधी तमिळ विद्‌ग्ध वाङ्मयप्रेमी म्हणून त्यांच्याकडे येत. आणि मिळेल ती माहिती घेण्याचा प्रयत्न करीत.

''त्यांनी जे अफवांचे बेबंद पीक उठवले ते हास्यास्पद होते. कधी तरी एखादा कोणी

संबंध चेहरा घामाने निथळत आहे, अशा स्थितीत येई आणि माहिती सांगे की, ब्रिटिश भारतीय पोलिसांनी सर्व भारतीय देशभक्तांना पळवून ब्रिटिश भारतात नेण्याची तयारी केली आहे. दुसरा म्हणे की, फ्रेंच राज्यापालाने भारतीय क्रांतिकारकांना तुम्ही २४ तासात निघून जा अशी आज्ञा केली असून एक फ्रेंच भारतीय पोलीस ती बजाविण्यासाठी येत आहे अशी आपल्याला अधिकृत माहिती असल्याचे सांगे . . . .

''नंदगोपाळ चेट्टी ह्या नावाचा एक कोळी त्याच्या जमातीचा पुढारी होता. तो थोडी मुकादमी करून भुईमूगाचा व्यापार करी. त्याच्याकडे अनेक हस्तक आहेत अशी त्याची कीर्ती असे. ह्या नंदगोपाळचा आणि ब्रिटिश भारतीय पोलिसांचा समझौता झालेला होता. पॉंडिचेरीतील भारतीय क्रांतिकारकांना पकडून त्यांना २/३ दिवसात ब्रिटिश पोलिसांच्या हवाली करायचे असे म्हटले जात असे. गंमतीची गोष्ट अशी की हाच नंदगोपाळ भारती किंवा श्रीनिवासाचार्य ह्यांच्याकडे केवळ मित्रत्वाच्या नात्याने येई आणि त्यामुळे पोलिस हस्तकांनी त्याच्याबद्दल अशा तऱ्हेच्या अफवा पसरविल्या असतील.''

मंडायम् श्रीनिवासाचार्य यांनी देखील पुष्टी जोडली आहे की, ''भारतीय देशभक्तांना येणारी सर्व पत्रे आणि मनिऑर्डरी पळवून नेली जात आणि पोस्ट ऑफिसात साठवली जात. ब्रिटिश भारतातील त्यांच्या नातेवाईक आणि मित्रांचाही छळ होत असे. ब्रिटिश भारतात परत आल्याबरोबर त्यांना अटक होई. आणि जणू हे पुरे झाले नाही की काय म्हणून मद्रास पोलिसांनी काही हस्तपत्रके छापून घेतली आणि ती संबंध पॉंडिचेरी व तिच्या आसपासच्या भागात मोठ्या प्रमाणात वाटली. हस्तपत्रकात भारतीय देशभक्तांच्या नावांची यादी दिली होती. आणि त्यांना पकडून देणारास प्रत्येकी एक हजार रुपयांचे बक्षीस जाहीर केले होते. दरोड्यामध्ये आणि खुनामध्ये ज्यांचा हात आहे अशा गुन्हेगारांना अटक करण्याची टाळाटाळ करीत असल्यामुळे अशा तऱ्हेचे पोलिसी जाहिरनामे नित्याचे असत. परंतु आम्ही आमचे जीवन अगदी उघडपणे घालवीत असता आणि कुठेही लपून छपून राहिलो नसतांना सुद्धा आमच्याबद्दल अशा तऱ्हेची हस्तपत्रके प्रसिद्ध व्हावी हे असाधारण होते.''

पॉंडिचेरी येथील स्वदेशी पुढाऱ्यात ब्रिटिश इंडियन पोलिसांच्या मते अय्यर हे सर्वात महत्त्वाचे होते. स्वदेशी लोकांमध्ये ते सर्वात धाडसी आणि तितकेच काळजीपूर्वक काम करणारे होते- त्यांच्या जवळ नेहमी एक पिस्तूल असे आणि ते घेऊनच ते रात्री झोपत असत. ते जेव्हा बाहेर जात तेव्हा आपण केव्हा परत येऊ आणि आल्यावर दारावर किती वेळा टकटक करू हेही सांगत. त्यांना अत्यंत जोरात आणि वैशिष्ट्यपूर्ण पद्धतीने थुंकण्याची सवय होती. त्यामुळे बायकोला ओळखता येईल असे ते आल्याचे चिन्ह होते.

अय्यर ह्यांचे अनेक अनुभव रोमांचकारी होते.

एक दिवस अय्यर समुद्रकिनाऱ्यावरून संध्याकाळी फिरून येत होते. परत येत असता ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या एका तुकडीने त्यांची वाट अडवली. आपण त्यांना घोड्याच्या

गाडीतून पळवून ब्रिटिश भारतीय प्रदेशात नेऊ अशी त्यांना आशा ! अय्यरनी ह्या गुंडांना दूरूनच ओळखले आणि ते झटदिशी एका बाजूच्या बोळात गेले. तेथून ते झपाट्याने प्रसिद्ध मानकुल विनायकार मंदिराकडे गेले आणि गणेशाच्या मूर्तिआड शांतपणे लपून बसले. संबंध रात्रभर ते तेथे बसले. देवळाला कुलूप लावले गेले. सकाळी ते तेथून निसटून सुरक्षितपणे घरी पोचले. अर्थातच त्यांच्या पत्नीने सारी रात्र काळजीत घालवली. कारण त्यांना काय झाले हे तिला माहित नव्हते.

दुसऱ्या एका दिवशी अय्यर आपल्या एका मित्राला भेटण्यासाठी त्याच्या घरी गेले असता हेरांच्या एका तुकडीने घराला वेढा घातला. ते बाहेर आले की आपण त्यांना पकडावे असा त्यांचा हेतू होता. ते वाट पाहात असता घरातून मोठा आक्रोश ऐकू येऊ लागला आणि लौकरच प्रेत घेऊन जाण्याच्या सामानाची जुळवाजुळव होऊ लागली. थोड्याच वेळात एक पांढऱ्या कापडाने चेहरा झाकलेले 'प्रेत' तिरडीवरून बाहेर आणण्यात आले. ते दहन क्रियेसाठी स्मशनात येऊन पोचले. खांदा देणाऱ्या चौघांनी कोणी हेर आपला पाठलाग करीत आहे काय हे जाणण्यासाठी इकडे तिकडे पाहिले. कोणीही दिसले नाही तेव्हा 'प्रेत' सोडविण्यात आले आणि अय्यर उठून उभे राहिले. मित्रांच्या संरक्षणात ते आपल्या घरी येऊन पोचले.

अय्यर ह्यांनी ह्या पेक्षाही अधिक रोमांचकारक घटना वर्णन केली आहे. ही आणखी काही काळानंतर घडली. ती स्थानिक निवडणुकीची वेळ होती. पाँडिचेरीत ह्यावेळेस नेहमीच कांहीसा गदारोळ चालू होता. रात्रीचे आठ वाजले होते. अय्यर घरी जेवायला बसले होते. त्यांच्या घरासमोर गर्दी जमली आणि दारावर मोठ्याने 'ठोक, ठोक' ऐकू येऊ लागली. दारू प्यालेल्यांचे बाहेरून आवाज ऐकू येऊ लागले. त्यांनी अय्यर यांना दमदाटी देण्यास सुरवात केली आणि त्यांना घराबाहेर येण्यास सांगितले. अय्यर यांची नुकतीच जन्मलेली लहान मुलगी सुभद्रा झोपाळ्यावर निजली होती. अय्यर घाईघाईने जेवतांना उठले. त्यांनी आणि त्यांच्या पत्नीने दगडाची एक जड उखळी ढकलीत पुढच्या दाराला टेकून ठेवली. अय्यर यांच्या पत्नी भाग्यलक्ष्मी अम्मल धाडसाने पुढल्यादारी गेल्या आणि त्यांनी त्यातील भोकातून बाहेर पाहिले. बाहेर गुंड म्हणून प्रसिद्ध असलेले अनेकजण जमले होते. अल्कोहोलचा दर्प त्यांच्या तोंडाला येत होता. अय्यरनी शिकविल्याप्रमाणे त्यांच्या पत्नीने बाहेरच्या लोकांना मोठ्या आवाजात सांगितले की अय्यर जेवत असून लौकरच बाहेर येतील. टोळके वाट पाहत बसून राहिले. त्यांची कल्पना की आपले सावज आपल्या जाळ्यात सापडले आहे. अय्यर घराच्या मागल्या बाजूला गेले, मागची भिंत चढून थोडेसे चालले आणि शेजारच्या घराच्या मागच्या दारी उतरले. येथे आपण अय्यर यांनी स्वतःच काय सांगितले आहे, ते पाहू.

''त्या घरात एक शिक्षक आणि त्यांची पत्नी असे जोडपे राहात असे. ते एकटेच होते. मी मागील दार हळूच वाजवले. घरातील बाईने दार उघडले आणि मला पाहून ती

ओरडण्याच्या बेतात होती. मी ताबडतोब विनवणीच्या सुरात म्हटले, बाईसाहेब आपण कृपा करून ओरडू नका. माझ्या घरासमोर वीस- पंचवीस गुंड जमले आहेत. त्यांचा इरादा शिरजोरी करण्याचा दिसतो. आपण येवढेच करा की माझ्या बायकोला आणि तान्ह्या मुलीला आश्रय द्या ? बाई आत गेल्या आणि त्यांनी आपल्या पतीला आणले. त्यांनी वाट बघण्याचे मान्य केले. मी माझ्या घरी परतलो. बाहेरचे मवाली बाहेरच्या दारावर एकसारखे न थांबता ठोकीत बसले होते. मुलगी रडत होती. भाग्यम् त्रस्त झाली होती. मी मुलीला शांत करायला तिला सांगितले. आम्ही आमच्या घराच्या मागील बाजूस गेलो. माझी पत्नी अत्यंत अशक्त होती तिला भिंतीवर चढण्यास मी मदत केली आणि तिला शिक्षकाच्या घरी पोचविले. तेथे ती उतरल्यावर त्यांनी तिला आत घेतले आणि मागील दारास कडी लावली. त्यांना अशा तऱ्हेने सुरक्षित जागी सोडून मी आमच्या घरी परत आलो. मौल्यवान पुस्तके, कागदपत्रे आणि मादाम कामांचे एकचित्र असलेली माझी पेटी सुरक्षित राहावी म्हणून शिक्षकांच्या घरी नेली. नंतर मी परत आलो आणि माझे पिस्तुल हातात घेऊन घराच्या उघड्या गच्चीवर गेलो. तेथून मी खालच्या दारू पिऊन तर्र झालेल्या माझ्या घरासमोर जमलेल्या गर्दीकडे पाहिले आणि माझा हात उंचाऊन मी पिस्तुलाचे तीन बार हवेत काढले. घोळक्याने आवाज ऐकले, त्यांची घबराट उडाली आणि ते इतस्ततः पळून गेले. त्या दिवशीचा त्रास अशा तऱ्हेने संपला.''

दुसऱ्या दिवशी सकाळी अय्यर आणि श्रीनिवासाचार्य यांनी फ्रेंच भारतीय राज्यपाल एम्. डुप्ले यांजकडे एक अर्ज दिला. त्यात त्यांनी लिहिले की ब्रिटिश भारतीय पोलिसांकडून ज्यांना पैसा मिळतो अशा हस्तकांकडूनच अशी कृत्ये केली जातात. ह्या सर्व गोष्टींची सुरवात भारतीय क्रांतिकारकांना पकडून देण्यासाठी बक्षिसे जाहीर झाली तेव्हा झाली. खरे म्हणजे भारतीय क्रांतिकारक आपले कार्य उघडपणे करीत होते. गव्हर्नरनी सांगितले की, आपण त्या परिपत्रकाचा पुढील प्रसार थांबविला आहे पण ब्रिटिश हस्तकांची पीडा पॉंडिचेरीतून दूर करण्यात आपल्याला अद्याप थोडा वेळ लागेल. परंतु त्यांना अय्यर आणि श्रीनिवासाचार्य यांना संरक्षण देण्यासाठी आपण तोपर्यंत दोन फ्रेंच भारतीय पोलिसांना त्यांच्या प्रत्येकाच्या घरावर पहाऱ्यासाठी ठेवतो असे त्यांनी वचन दिले. ते त्यांनी पाळले आणि काही काळ अय्यर इतर यांना शांतपणे जीवन जगता येऊ लागले.

तरीही, काही आठवडे अय्यर श्रीनिवासाचार्य यांच्या घरी राहिले कारण त्यांनी एकटे राहू नये असे वाटू लागले. श्रीनिवासाचार्य यांच्या घरी राहात असता अय्यर त्यांच्या मदतीने आपल्या कुटुंबाचे फ्रेंच सुधारण्याचा यत्न केला. श्रीनिवासाचार्य फ्रेंचचे प्राध्यापक होते आणि त्या दोघांनी नेपोलियनच्या पत्रांचा एक संग्रह अभ्यासासाठी घेतला. ही पत्रे लष्करी बाबतीतील होती. लवकरच अय्यर यांना हे पुस्तक स्वतः वाचता येऊ लागले. ह्यानंतर त्यांनी फ्रेंचमधील लष्करी विज्ञानावरील इतर पुस्तकेही वाचून काढली.

---

# विहिरीत पडलेला रांजण

अय्यर आणि पॉंडिचेरीतील इतर ''स्वदेशी'' पुढाऱ्यांना शारीरिक दृष्टया पळवण्याचे हे अयशस्वी प्रयत्न पूर्णपणे फसल्यावर ब्रिटिश पोलिसांनी त्यांना हाकलण्यासाठी नवे कट शिजविण्याचे प्रयत्न केले. ''स्वदेशीं''ना दमदाटी देणे किंवा त्यांना फसवून गुंडांच्या टोळीकडून पळवून आणण्याच्या प्रयत्नांनी उलट त्यांच्याबद्दल सहानुभूतीचे वातावरण तयार झाले. म्हणून ब्रिटिश भारतीय पोलिसांनी स्वतःचे हेतू साधण्यासाठी वरिष्ठ शासकीय सूत्रांचा उपयोग करून घेण्याचा यत्न केला.

ब्रिटिश भारतीय पोलिसांच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांनी फ्रेंच भारतीय राज्यपालांच्या पुनःपुन्हा मुलाखती घेऊन ''स्वदेशी'' पुढाऱ्याबद्दल खोट्या गोष्टी सांगून त्यांच्या मनात विष भरण्याचा यत्न केला. त्यापैकी एक प्रयत्न म्हणजे हे पुढारी अराज्यवादी आहेत असे त्यांचे चित्र रंगविणे. ह्याचा अर्थ ते कोठल्याच शासन पध्दतीवर विश्वास ठेवीत नाहीत म्हणून ते सर्व शासनांना अप्रिय असतात, असे ब्रिटिश भारतीय पोलिसांचे म्हणणे. परंतु फ्रेंच राज्यपाल ह्या बाबत पुरावा मागण्या इतका न्यायप्रिय होता. आणि ब्रिटिश भारतीय पोलिसांना तो देता न आल्याने त्याने ''स्वदेशीवर'' बंदी घालण्याचे नाकारले.

हिकमती पोलिसांनी नंतर दुसरे एक कपट करण्याचा प्रयत्न केला. फ्रेंच भारतात सर्व ''स्वदेशी'' हे परकी असल्याने अशा परकी लोकांना फ्रेंच भारतात राहण्याची बंदी करणारा कायदा करावा असे त्यांनी फ्रेंचांच्या मनात भरविण्याचा प्रयत्न सुरू केला. पुनःपुन्हा प्रयत्न करून त्यांनी फ्रेंच शासनाकडून अशा स्वरूपाचा एक प्रस्ताव फ्रेंच भारतीय असेंब्लीमध्ये आणण्यास संमती मिळवली.

हे घडले तेव्हा फ्रेंच भारतीय स्थिती फारशी चांगली नव्हती. युरोपमध्ये फ्रेंचांना परंपरागत शत्रू जर्मनी एक सर्वंकष युध्द करून फ्रेंचांची प्रतिष्ठा सगळीकडून कमी करण्यासाठी लष्करी तयारी करीत होता. जर्मन बादशहा कैसर विलूहेल्म याने आपल्या युध्दनौका फ्रेंच मोरोक्को मधील अगादीर बंदरात पाठवून मोठीच खळबळ उडवून दिली.

फ्रान्सला जर्मन आक्रमण थांबविण्यासाठी ब्रिटीशांची मदत घेणे भाग पडले. त्यामुळे फ्रेंच परराष्ट्रीय कार्यालयाची ब्रिटिश खूष होतील अशी कोठलीही हालचाल करण्यास सहानुभूती होती. म्हणून फ्रेंच राज्यपालाने पाँडिचेरीमध्ये अशा प्रस्तावाला मान्यता द्यावी ह्यात आश्चर्य नव्हते.

ह्या ठरावाचा संबंध पाँडिचेरीत राहाणाऱ्या भारतीय देशभक्तांशी ताबडतोब येणार होता आणि त्यांना अशातऱ्हेने पूर्णपणे दगा देण्यास फ्रेंच भारतीय असेंब्लीचे सभासद तयार नव्हते. ''स्वदेशी'' पुढाऱ्यांनी आणि त्यांच्या मित्रांनी वजनदार राजकीय वर्तुळांशी संपर्क साधून ठरावाला एक कलम जेडण्यात यश मिळविले. ह्या कलमाप्रमाणे हा नवा ठराव येण्यापूर्वी ज्यांचे पाँडिचेरी येथे एक वर्षआधीपासून वास्तव्य असेल त्यांना या पुढेही तेथे राहाण्याची मुभा देण्यात आली. मात्र त्यांनी पात्र मानद दंडाधिकाऱ्यांच्या सह्या घेऊन स्वतःचे नांव नोंदवून घेतले पाहिजे अशी अट घालण्यात आली.

''स्वदेशी'' पुढाऱ्यांना आवश्यक त्या पाच सह्या मिळविणे केव्हाही शक्य होणार नाही ह्याची ब्रिटिश भारतीय पोलिसांची खात्री असल्याचे त्यांनी हे कलम समाविष्ट करण्यास विरोध केला नाही. हे स्ट्रेंजर्स बिल (परकी लोकांविषयी प्रस्ताव) मान्य झाला आणि कायद्याच्या स्वरूपात अस्तित्वात आला.

आता हा ठराव कायद्याच्या रूपाने आला असण्याने भारतीय देशभक्तांना थोड्याच दिवसात पाच मानद दंडाधिकाऱ्यांच्या सह्या मिळवून स्वतःची नावे नोंदवून घेणे अवश्य होते. ब्रिटिश भारतीय पोलिस अधिकाऱ्यांनी सर्व स्थानिक मानद दंडाधिकाऱ्यांशी मध्यस्थांकरवी संपर्क साधला होता आणि त्यापैकी कोणीही सही देणार नाही ह्याबद्दल त्यांची खात्री होती.

''स्वदेशी'' पुढारी श्री. अरविंदांच्या घरी भेटले. त्यांनी परिस्थितीची कसून चौकशी केली. परंतु हा अडथळा कसा ओलांडावा ह्याबद्दल त्यांचा काहीच निश्चय होईना. बैठक अनिर्णित अवस्थेतच संपली. आपल्याला हवे असलेले ते सहाय्य अगदी जवळ आहे आणि आपल्या सर्व अडचणी येत्या संध्याकाळीच दूर होणार आहेत याची त्यांना कल्पना ही नव्हती!

हा चमत्कार कसा घडला ह्याबद्दल वा. रा. आपली आठवण नमूद करतात. वा. रा. लिहितात : ''बैठकीहून घरी जात असता भारतींनी मला दुसऱ्या दिवशी सकाळी आठ वाजता त्यांच्या घरी भेटण्यास सांगितले.

''दुसऱ्या दिवशी ठरलेल्या वेळी मी त्यांच्याकडे गेलो तेव्हा भारती मला म्हणाले, 'जाऊया का आपण ?' आदल्या संध्याकाळची निराशा नाहीशी झालेली दिसली.

''कुठे ?'' मी विचारले.

''कुठलेही प्रश्न विचारू नका. फक्त माझ्या बरोबर चला'', ते म्हणाले.

मी वैतागलो होतो. परंतु थोडासा रागावलो देखील. पण मी त्यांच्या बरोबर

गेलो. '' आम्ही दोघेही कालावाई शंकर चेट्टिआर यांच्या घरी गेलो चेट्टीयार घराच्या मुख्य दिवाणखान्यात होते. ते ऊंजालवर (झोपाळ्यावर) बसले होते. भारतींना पाहून ते आदराने उठले आणि त्यांनी त्यांचे स्वागत केले. ''भारतींनी त्यांना उलट नमस्कार केला आणि त्यांना सरळ म्हटले,''चेट्टिआर, तुमच्या सारखी माणसे पॉंडिचेरीत असतांना आमच्या सारख्यांना शहर सोडावे लागावे हे कसे काय ? मला वाटते नुकताच नवा कायदा करण्यात आला त्याची तुम्हाला माहिती असेलच.''शंकर चेट्टिआर 'स्ट्रेंजर्स बिल' मान्य होण्याचा वेळी बाहेरगावी गेले होते. त्यांना त्याबद्दल काही माहिती नव्हती.

भारतींनी नव्या कायद्याचे तपशीलवार वर्णन केले आणि त्याचा भारतीय क्रांतिकारकांवर परिणाम होतो हेही सांगितले. त्यांनी आपण काय करावे ह्याबद्दल त्यांचा सल्ला विचारला.

''शंकर चेट्टिआर हसले आणि म्हणाले,'ही काही मोठीशी गोष्ट नाही. मी स्वतः मानद दंडाधिकारी आहे. मी तुम्हाला इतर चौघांच्या सह्या आणून देईन.'

''आभारी आहे,' भारती म्हणाले,' पण हे सर्व ह्या संध्याकाळच्या आत व्हायला हवे. हे शक्य आहे का ?'' ''ह्या संध्याकाळी ? मी दोन तासांच्या आत सह्या आणतो' शंकर चेट्टिआर म्हणाले,' तुम्ही फक्त कागद तयार ठेवा आणि मला आणून द्या. मी त्यावर सह्या आणतो.'

''श्री अरविंद, अय्यर, भारती, श्रीनिवासाचार्य, वा.रा. आणि इतर यांचे अर्ज भरून आणले आणि ते शंकर चेट्टिआरकडे दिले. त्यांनी त्या पाची नमुन्यांवर मानद दंडाधिकाऱ्यांच्या सह्या दुपारी तीन वाजेपर्यंत आणून दिल्या. त्याच दिवशी ते नमुने आम्ही दाखल केले आणि आमची रहिवासी म्हणून नोंदणी झाली.''

अशा प्रकारे अय्यर आणि पॉंडिचेरी येथे राहणाऱ्या इतरांचा पुढील एक अडथळा दूर झाला. विशेषतः अय्यर यांनी सुटकेचा निश्वास सोडला.

परंतु त्यांच्या अडचणींचा अजून शेवट झाला नव्हता. ब्रिटिश पोलीस अधिकाऱ्यांची जरी फसगत झालेली होती तरी त्यांनी भारतीय देशभक्तांना हुसकाविण्याचे आणखी प्रयत्न केले. कायदेशीर मार्गांनी त्यांना काढून लावण्याचे प्रयत्न अयशस्वी झाल्यावर पोलिसांनी फ्रेंच प्रशासकांची खात्री पटविण्याचा प्रयत्न केला की भारतीय 'स्वदेशी' हे धोकेबाज कटवाले असून फ्रेंचांच्या विरूध्द कार्य करीत आहेत. फ्रेंचांचा जर ह्यावर विश्वास बसला तर 'स्वदेशी' ना तुरूगात डांबले जाईल किंवा पॉंडिचेरीच्या बाहेर हाकलले जाईल असे ब्रिटिश भारतीय पोलिसांना वाटले.

१९१० साली भारतींचे 'इंडिया' साप्ताहिक प्रसिध्द केले जात असता ब्रिटिश भारतीय पोलिसांनी मयुरेशन ह्या नावाच्या तरुणाला पॉंडिचेरी येथे नेमून भारतीय देशभक्तांविषयी नाना तऱ्हेच्या खोट्या अफवा पसरविण्याचे काम त्याच्याकडे दिले. ह्या सेवेबद्दल त्याला भरपूर पैसे मिळत. परंतू चोरांची जशी एकमेकाशी भांडणे होतात तशी मयुरेशन् आणि

ब्रिटिश भारतीय पोलिसांची झाली. मयूरेशन्ने "इंडिया" साप्ताहिकाला एक मोठे थोरले पत्र लिहिले आणि त्यात ब्रिटिश भारतीय पोलिसांनी आपला हत्यारासारखा उपयोग करून आपल्याला मोबदला म्हणून मोठी रक्कम देण्याचे आश्वासन दिले. परंतु प्रत्यक्षात त्यांनी काहीच दिले नाही. हे पत्र साप्ताहिकात प्रसिध्द झाले.

आता तीन वर्षानंतर भारतीय पोलिसांनी मयूरेशन् आणि त्याचे वडील यांना फ्रेंच आधिकाऱ्यांकडे एक अर्ज करण्यास भाग पाडले. पाँडिचेरीतील भारतीय पुढारी एक कट करून गोऱ्या लोकांची डोकी कालीमातेला बळी म्हणून अर्पण करण्याच्या प्रयत्नात आहेत असा आरोप ह्या अर्जात करण्यात आला होता. ह्यासाठी ते कालीमातेची पूजा तलवारी व कट्यारी यांनी करीत असत असेही अर्जात नमूद केले होते. त्यांच्या घरावर जर अचानक धाडी घातल्या तर अधिक पुरावा सापडू शकेल आणि तो विशेषतः अय्यर यांच्या घरी मिळेल असेही या अर्जात म्हटले होते. अय्यरना किंवा इतरांना या अर्जाची काही माहिती नव्हती.

ह्यावेळी एका सकाळी अय्यर यांच्या घरातील एक मोलकरीन विहिरीवर पाणी भरण्यास गेली. विहिरीत एक मातीचा रांजण तरंगतांना तिला दिसला. हा काहीतरी जादूटोणा असावा अशी भीती वाटून तिने आरडाओरडा करण्यास सुरुवात केली. अय्यर ह्यांनी एक टोपली आत सोडून रांजण बाहेर काढण्याचा प्रयत्न केला. रांजण टोपलीत आला परंतु तो वर काढता येईना. रांजणाला दोरीचा एक तुकडा बांधला होता. आणि त्याचे दुसरे टोक विहिरीच्या तळ्याशी असलेल्या एका दगडाला बांधले होते. एका छोकऱ्याला विहिरीत सोडण्यात आले. त्याने दोरी तोडली आणि रांजण बाहेर काढला. कुणीतरी रांजणाला दगड बांधून दगड आणि रांजण दोन्हीही विहिरीत टाकले होते. रांजण बुडून राहील असे त्यांना वाटले.

अय्यरने रांजण श्रीनीवासाचार्यांकडे नेला. दोघेही भारतीकडे गेले आणि तिघेही अजून न उघडलेल्या रांजणासह राज्यपालाकडे गेले. रांजण त्यांना दाखवून त्यांनी तो आपल्याला कसा सापडला याचे वर्णन केले. रांजणाचे तोंड घट्ट मोहोरबंद केलेले होते. राज्यपालांनी मोहोर फोडून रांजण उघडला. आतमध्ये काही छापील पत्रके आणि एक रबरी शिक्का होता. हातामध्ये अनेक तोडलेली मस्तके घेतलेले कालीमातेचे चित्रही आतमध्ये होते. कोठल्यातरी एका क्रांतिकारक संघटनेमध्ये दाखल होण्यासाठी भरावयाचे नमूनेही त्यामध्ये होते. ह्या नमुन्यामध्ये असे म्हटले होते की, प. शामजी कृष्ण वर्मा या संघटनेचे प्रमुख असून श्रीनीवासाचार्य हे स्थानिक चिटणीस होते. एका रबरी शिक्क्यावर श्रीनीवासाचार्यांच्या सहीसारखी दिसणारी अक्षरे होती. एका अर्जाच्या नमुन्यात नीलकांत ब्रम्हचार्य ह्यांचा सभासदत्त्वाचा अर्ज होता. अर्ज दाखल करून घेतल्याचा एक नमुनाही रांजणात होता.

मयूरेशन यांचा अर्ज राज्यपालांना बहुधा आधीच पोचला होतो आणि त्यांनी तो पाहिलाही होता परंतु भारतीय देशभक्तांशी बोलतांना ते कमीच बोलले त्यांनी

सांगितले की ह्या बद्दलचा अहवाल फ्रेंच भारतीय पोलिसांकडे द्यावा. भारतीय देशभक्तांनी राज्यपालांची रजा घेतांना सांगितले की, ब्रिटिश भारतीय पोलिसांना व त्यांच्या हस्तकांना पाँडिचेरी येथे जो मुक्त प्रवेश दिला जातो त्यामुळे अशा तऱ्हेचे खोडसाळ प्रकार घडू लागतात. आताचा प्रकार हा सुद्धा त्यांचेच हस्तलाघव आहे.

राज्यपालांनी सांगितल्याप्रमाणे अय्यरने ह्या प्रकरणाची हकीगत फ्रेंच भारतीय पोलिसांना सांगितली. अय्यर, भारती आणि श्रीनिवासाचार्य ह्या तिघांनी दुसऱ्या दिवशी ट्रायब्युनल म्हणजे दंडाधिकाऱ्यांच्या न्यायालयात हजर राहावे असे त्यांना सांगण्यात आले.

दुसऱ्या दिवशी सकाळी दंडाधिकाऱ्यांनी या तिघांपुढे एक कागद फडकावित त्यांना म्हटले, 'तुम्ही काही तरी भयंकर गोष्ट करण्याचा कट रचित आहात असा आम्हाला अर्ज आला आहे. तुमचे यावर काय म्हणणे आहे ?'

अय्यरना आणि इतरांना अर्ज कोणी सादर केला होता याची त्यावेळेस कल्पना नव्हती. त्यांनी कटाचे सर्व आरोप पूणपणे नाकारले. अशातऱ्हेच्या कल्पित कथा ब्रिटिश भारतीय पोलिसांच्या हस्तकांनी शिजवल्या असाव्या असे त्यांनी सांगितले.

''हा अर्ज कोणाही पगारी हस्तकाचा नाही तर फ्रेंच प्रजाजनाचा आहे.'' दंडाधिकारी म्हणाले, ''खरे, म्हणजे अर्जदार आता न्यायालयात हजरही आहे.'' त्यांनी मयूरेशवर आणि त्यांचे वडील यांच्याकडे बोट केले. यावर अय्यर आणि इतर हसत सुटले. श्रीनिवासाचार्य तात्काळ म्हणाले, ''मला नक्की माहित आहे की हा मनुष्य ब्रिटिश पोलिसांचा पगारी हस्तक आहे. खुप दिवसापासून तो हे काम करीत आहे. मी ''इंडिया'' साप्ताहिक काढत होतो, तेव्हा त्याला त्यांच्याकडून पैसे मिळत आणि तो आमच्याबद्दल खोट्या अफवा पिकवित असे. त्याचे समाधान होईल इतका पैसा त्याला देण्याचे जेव्हा त्यांनी नाकारले तेव्हा तो त्यांच्यावर उलटला आणि त्याने आम्हाला एक पत्र लिहिले त्यावेळचा ''इंडिया'' पत्रात हे पत्र प्रसिद्ध झाले.''

दंडाधिकाऱ्यांनी मयूरेशनला हे खरे आहे काय असे विचारले. मयूरेशनने धडधडीत सांगितले की, आपण ''इंडिया'' पत्रासाठी असे कांहीही लिहिले नव्हते. आपल्या नावावर आपल्याला माहित नसता त्यांनी काहीतरी छापले असल्याची शक्यता मात्र आहे.

श्रीनिवासाचार्य हसले आणि त्यांनी सांगितले की, आपण मयूरेशनच्या हस्ताक्षरातील पत्र आज दुपारीच हजर करण्यास तयार आहोत. न्यायालय काही काळपर्यंत स्थगित झाले. परंतु फ्रेंच भारतीय पोलिसांना सर्व भारतीय देशभक्तांच्या घरांच्या कसून झडत्या घेण्याच्या आज्ञा देण्यात आली. पोलिसांना या झडत्यांत काहीही अपहार्य सापडले नाही.

त्या दिवशी दुपारी अय्यर आणि त्यांचे साथी न्यायालयात हजर राहिले पण मयूरेशन आणि त्यांचे वडील कोठेही दिसत नव्हते. बहुधा त्यांना आपले बिंब फुटले आणि आपल्याला खोटे आरोप केल्याबद्दल अटक होईल अशी भीती वाटली असावी.

परंतु मयूरेशनचे उद्योग येथेच थांबले नाहीत. त्याने राज्यपालांना एक अर्ज केला व

त्यात म्हटले की, ट्रायब्युनलच्या दंडाधिकाऱ्यांनी भारतीय नेत्यांशी संगनमत करून आपल्याला दमदाटी केली. अटक होण्याच्या भीतीने आपण आणि आपले भारतातील वडील ब्रिटिश भारतीय कडलोर येथे निघून आलो आहोत.

योग्य ती चौकशी करून राज्यपालांनी मयूरेशनचा अर्ज फेटाळून लावला.

पाँडिचेरीमध्ये भारतीय देशभक्त निरपराधी आहेत असे जाहीर करण्यात आले. ब्रिटिश भारतीय पोलिसांना ज्याच्याबद्दल मोठ्या अपेक्षा होत्या, ते विहिरीत रांजणाचे प्रकरण म्हणजे एक फुसका बार ठरला.

एकंदर घटनांचा रोख आपल्याविरुद्ध आहे हे पाहून मयुरेशन् सिंगापूर येथे पळून गेला. तो पुढे बरेच दिवस पाँडिचेरीला आलाच नाही.

---

# अल्जिअर्सला हद्दपारी ?

भारतीय देशभक्तांची पॉंडिचेरीच्या बाहेर उचलबांगडी करण्यात किंवा कायदेशीर मार्गाने त्यांची हकालपट्टी करण्यात अपयश आल्यानंतर ब्रिटिश भारतीय सत्ताधाऱ्यांनी प्रकरण वरिष्ठ स्तरावर नेण्याचे ठरविले. पॉंडिचेरीमधील हे प्रकरण आता कायमचेच मिटवण्याचा त्यांचा इरादा होता. भारतीय देशभक्त नेत्यांना ब्रिटिशांविरुद्ध कारवाया करण्यास मोकळीक मिळे. याबाबतीत ब्रिटिशांनी जी तत्परता दाखविले ती अधिक चांगल्या कार्यासाठी जास्त उपयोगी पडले असती. दिल्ली आणि लंडन यांच्यामध्ये त्वरेने पत्रव्यवहार झाला आणि ब्रिटिश मंत्रिमंडळातील मंत्र्यांनी ब्रिटिश वेस्टइंडीजमधील जागांच्या मोबदल्यात भारतातील फ्रेंच वसाहती आपल्याकडे घेण्याचा घाट घातला.

हा व्यवहार यशस्वीरीतीने पुरा होईल असे वाटले कारण फ्रेंच नेते त्यांच्याशी बऱ्याच अंशाने सहमत होते.

पॉंडिचेरीतील भारतीय देशभक्तांच्या दृष्टीने हे एक धोकादायक दुश्चिन्ह होते. ग्रीक पुराणांतरीच्या डेमॉक्लिस राजाच्या डोक्यावर एका केसाने बांधलेली तलवार टांगत ठेवली असून ती केव्हाही डोक्यावर कोसळण्याचा धोका होता, तशी त्यांची स्थिती झाली.

अरविन्द घोष ह्यांनी आपल्या पॅरिसमधील लापोर्त आणि पॉल ब्रुसॉ ह्या मित्रांना लिहिले. भारतींच्या विनंतीवरून त्यांचे मित्र आणि वजनदार व्यापारी पोन्नू मुरुगेशम् पिळ्ळा ह्यांनी आपल्या पॅरिसमधील मित्रांशी पत्रव्यवहार केला. फ्रेंच मंत्रिमंडळात लवकरच बदल होण्याची चिन्हे दिसत होती. काही दिवस जर हे प्रकरण स्थगित करता आले तर ते संपूर्णपणे काढून टाकणे जाण्याचा संभव होता. फ्रेंच मित्रांना असे आश्वासन देण्यात आले की, फ्रेंच भारतातील लोकांना फ्रान्सचे प्रजाजन म्हणूनच राहण्याची इच्छा असून आपली ब्रिटनकडे बदली व्हावी असे त्यांना वाटत नाही. पॉंडिचेरी येथे एक सभा झाली आणि तीत अदलाबदलीच्या कल्पनेविरुद्ध निषधांचा ठरावा संमत करण्यात आला. पॅरिसमधील फ्रेंच मित्रांनी पॉंडिचेरीच्या जनतेसाठी प्रयत्न केला. अशा या आणिबाणीच्या

क्षणी सुदैवाने फ्रेंच मंत्रिमंडळ गडगडले.

फ्रान्सचे नवे पंतप्रधान एम्. पॉयन्कारे अदलाबदलीच्या प्रश्नाबद्दल उंच स्वरात म्हणाले, "मी या गोष्टीला कधीही कबूल होणार नाही," त्यांनी फ्रेंच चेंबर ऑफ डेप्युटीज पुढे भाषण करतांना सांगितले, " ज्याठिकाणी फ्रेंच ध्वज फडफडत आहे, त्या ठिकाणच्या बदल्यात अन्य प्रदेश घेणे मला असंमत आहे. ज्याठिकाणी फ्रेंच रक्ताचे सिंचन झाले ती भूमी फ्रान्सच्या दृष्टीने पवित्र भूमी आहे. फ्रेंच प्रदेश सोडून देण्याला कोणीही फ्रेंच मनुष्य तयार होणार नाही. विशेषतः ज्या पाँडिचेरीमध्ये डुप्लीचा पुतळा उभा आहे, तो प्रदेश तर आम्ही कदापिही सोडणार नाही".

भारतीय देशभक्तांच्या आणि पाँडिचेरीच्या जनतेच्या दृष्टीने हे भाषण म्हणजे दुःख परिहारक मलमाप्रमाणे वाटले.

परंतु ब्रिटिश भारतातील सत्ताधारी आपल्या हाताखालच्या पोलिस आधिकाऱ्यांच्या पाँडिचेरीच्या सरहद्दीवरून येणाऱ्या अतिशोक्त कथांनी झपाटून गेल्यामुळे फ्रेंच भारतातील देशभक्तांची अजूनही भीती बाळगून होते. एक वर्षाच्या आतच महायुद्ध (पहिले जागतिक युद्ध) सुरू झाले. जर्मन रणनौकांमुळे ब्रिटिशांच्या चिंता वाढत गेल्या. बंगालच्या उपसागत जर्मन युद्ध नौका एम्. डेन्ने समुद्री रस्त्यावर धुमाकूळ माजवून आणि मद्रास शहरात तोफांचे काही गोळे टाकून मोठी घबराट निर्माण केली. रायपूरमधील दोन प्रचंड केरोसिन तेलाच्या साठ्यावर आघात करण्यात आले. त्यांनी पेट घेतला. पुढे कित्येक दिवसपर्यंत ते जळत होते. लोकांनी शहराचा काही भाग घाईघाईने रिकामा केला.

ब्रिटिश भारतीय सत्ताधाऱ्यांना त्यांच्या हेरांकडून अशी खबर मिळाली की, पाँडिचेरीतील भारतीय राष्ट्रवादी एम्. डेन्शी संपर्क साधून आहे. अय्यर यांनी एका दुर्बिणीतून समुद्राचे निरीक्षण केले आणि "एम. डेन्" च्या आगमनाच्या वेळी पुढे येण्याऱ्या लहान जहाजांच्या ताफ्याकडे ते पहात होते अशी माहिती कळाली. हे त्यांनी केवळ जिज्ञासेने केले होते. त्यात काही अधिक गूढ असा कुठलाही हेतू नव्हता. ब्रिटिशांनी ताबडतोब फ्रेंच भारतीय शासनाकडून भारतीय देशभक्तांना दूरच्या आफ्रिकेमध्ये हद्दपार केले जावे असा यत्न केला. सुदैवाने ह्याला यश आले नाही आणि भारतीय देशभक्त पाँडिचेरीतच ह्यापुढेही राहिले. दूर हद्दपारीचा हा धोका वाङमयाला उपकारक ठरला. अय्यर यांनी आपण हद्दपार झालो तर एखाद्या महत्त्वपूर्ण वाङमयीन कृतीने आपली स्मृती चिरंतन राहावी यासाठी तमिळ विदग्ध वाङमयातील भाषांतरीत बोधपर कृती "कुरळ" तिरुवल्लीवरची भाषांतरीत करण्याचे ठरविले.

यासंबंधीची कथा "तिरुवल्लीवर यांची वचने" या ग्रंथाच्या दुसऱ्या आवृत्तीच्या प्रस्थावनेत सांगितले आहेत. महायुद्ध सुरू झाल्यानंतर "एम. डेन" बंगालच्या उपसागरात संचार करीत होते. त्यावेळेस ब्रिटिश भारतीय शासनाने आपल्या गुप्त पोलिसांपैकी काहींना पाँडिचेरी येथील भारतीय शरणार्थींच्या हालचालीवर लक्ष

ठेवण्यासाठी नेमले होते. आपल्याला नोकरीत बढती मिळविण्याला हीच एक सुवर्ण संधी आहे असे त्यांना वाटले आणि त्यांनी या शरणार्थींचा एम. डेनच्या हालचालशी संबंध लावण्याचा प्रयत्न केला. त्यांच्या या कथांचा परिणाम म्हणून मद्रास शासनाने पाँडिचेरीच्या राज्यपालांनी भारतीय राजकीय शरणार्थींना अफ्रिकेत हद्दपार करावी अशी इच्छा प्रदर्शित केली. फ्रेंच पोलिसांनी या शरणार्थींवर अनेक तऱ्हेचे आरोप लादले. शरणार्थींमध्ये श्रीमान अय्यर होते. परंतु त्यांच्या विरोधात भरलेले खटले फेटाळले गेले. हे होऊनही पाँडिचेरीच्या राज्यपालांची त्यांना अफ्रिकेला हद्दपार करण्याची इच्छा झाली. परंतु आपण त्यांच्यावर पाँडिचेरी सोडण्याची सक्ती करीत आहोत असे राज्यापालांना भासवायचे नव्हते म्हणून त्यांनी त्यांच्याकडे आपले दूत निरोप घेऊन पाठविले. या दुतांनी त्यांना अनौपचारिकपणे दमदाटी देऊन तुम्ही जर स्वतः होऊन अल्जिर्सला गेले नाही तर तुम्हाला भयंकर परिणामांना तोंड द्यावे लागेल असे त्यांना बजावले. या वाटघाटी चार किंवा पाच महिने चालल्या. वाटाघाटींना सुरुवात झाल्याबरोबर श्रीमान अय्यर यांना असे वाटू लागले की, फ्रेंच सरकार आपल्याला कोणत्याही दिवशी पाँडिचेरीच्या बाहेर हाकलून देईल म्हणून आपण आपली स्मृती आपल्या देशबांधवांच्या मनात सदैव ताजी आणि टवटवीत राहील असे काहीतरी आपल्यामागे ठेवावी. मग आपला देह आपल्या अत्यंत प्रिय असणाऱ्या तमिळभूमीच्या बाहेर सक्तीने नेला गेला तरी हरकत नाही.

''म्हणून आपल्याला जो थोडासा वेळ मिळणार आहे. त्याचा विचार करता या परिस्थितीत आपणास सर्वात उत्तम असे काय करता येईल याचा ते विचार करू लागले. आपण जर तमिळमधील प्राचीन विदग्ध वाङमयापैकी सर्वात छोटे पण सर्वात परिपूर्ण असे काव्य इंग्रजीत भाषांतरीत केले तर आपल्या देशबांधवांच्या स्मृतीच्या एका लहानशा कोपऱ्यात आपल्याला नक्कीच स्थान मिळेल. या निश्चयापर्यंत येण्यास त्यांना फारसा वेळ लागला नाही. म्हणून अति तीव्र वेगाने ते या कामाला लागले.

''साधारण १ नोव्हेंबर १९१४ च्या सुमारे लेखणी कागदाला लावली. दिवसामागून दिवस ते भाषांतराशी झटापट करीत राहिले. प्रत्येक दिवशी त्यांना वाटे की दुसऱ्यादिवशी सकाळी आपल्यावर पाँडिचेरी सोडण्याची निर्णयक आज्ञा बजावली जाईल. ही डेमॉक्लीज़्ची तलवार सतत डोक्यावर टांगती असल्याने अत्यंत तीव्र वेगाने काम करीत राहिले. हेतू हा की जर आपल्याल्याला भारत सोडण्याची पाळी आलीच तर आपण शक्य तितकी अधिक अधिक वचने उत्तम तऱ्हेने भाषांतरीत केलेली मागे ठेवू शकू. भाषांतराच्या कामात त्यांनी इतका उत्साह दाखविला की, त्यांच्या घराची फ्रेंच पोलिसांकडून झडती घेत जात असता आपल्या अभ्यास खोलीतून पोलिस घराच्या इतर भागात कोठे एखादा फरारी गुन्हेगार लपला आहे काय हे पाहण्यासाठी गेल्याबरोबर त्यांनी आपले लिखाण तत्क्षणी सुरू केले. १ मार्च १९१५ ला त्यांनी प्रस्तावनेच्या शेवटच्या ओळींची प्रत तयार केली आणि सर्व पुस्तक जेव्हा मुद्रणास देण्यास तयार झाले तेंव्हा अत्यंत आनंद झाला.

''कुरळ'' हे विख्यात काव्य, १३३० द्विपंक्तीचे असून ते इसवीसनाच्या पहिल्या शतकामध्ये कवी तिरुवल्लुवर यांनी लिहिले. अय्यर यांच्या काळापेक्षा आज त्याची जगाला अधिक चांगली माहिती आहे. तरीही अय्यर यांनी भाषांतराची पांडित्यपूर्ण प्रस्तावना जोडली आहे. तिच्यातील काही भाग विस्तारशः उधृत करण्याजोगा आहे.

येथे ज्या कवींची कृती इंग्रजीत पेहरावामध्ये दिली जात आहे त्याचे नाव तमिळ प्रदेशाबाहेर फारच थोड्यांना माहित आहे, अय्यरनी लिहिले,''आणि तरी ज्यांचा संदेश केवळ त्यांच्या काळापुरता किंवा देशापुरता मर्यादित नसून सर्व काळासाठी आणि अखिल मानवतेसाठी आहे. अशा ऋषीपैकी ते एक आहे. तिरुवल्लीवर यांनी जगाला जी कृती दिली आहे. तिचे बाह्यरूप परिपूर्ण असून विचारांची आगाधता भावनांची उदात्तता, नैतिक हेतूंची ऋजुता या गुणांच्या बाबतीत मानवतेची महान धार्मिक शास्त्रे सोडली तर फारच थोड्या ग्रंथांची तिच्याशी तुलना करता येईल. तमिळ लोकांनी तर या कृतीचे तमिळ वेद, वैश्विक वेद, उत्तरकालीन वेद, दिव्य वेद, इत्यादी शब्दात वर्णन केले आहे. अशा तऱ्हेचा हा खजिना इतक्या काळपर्यंत हिंदूस्थानातील एकाच प्रदेशातील लोकांपुरता मर्यादित रहावा ही दुर्दैवाची गोष्ट आहे.

''कुरळ'' हे संपूर्णपणे किंवा काही भागातून अनेक युरोपीय भाषांत (लॅटिन, जर्मन, इंग्रजीत तर अनेक भाषांतरे आहेत आणि फ्रेंच मध्ये निदान तीन तरी) भाषांतरीत झाल्याचे सांगून अय्यर म्हणतात की, सर्व उपलब्ध भाषांतरे पाहून आपण एक इंग्रजीमध्ये एक स्वतंत्र्य भाषांतर करावे अशी इच्छा अनेक दिवसापासून आपल्या मनात जतन करून ठेवली होती. हे भाषांतर हाती घेण्यास आपला हेतु तिरुवल्लुवर यांच्या भव्य कृतीचे सर्व जगाला जितके विस्तृत ज्ञान करून देता येईल तितके देण्याचे तर आहेच परंतु माझ्या देशातील तमिळ भाषा सोडून इतर भाषा बोलणाऱ्या लोकांना आपल्या भाषांतून भाषांतरे करण्यास उद्युक्त करावे असाही आहे. तसे केल्याने एका थोर नीती शिक्षकाचे शब्द गरीबाहून गरीब आणि साध्याहून साध्या देशबांधवापर्यंत जातील. आणि त्यांच्या मनात एक उदात्त, प्रतिष्ठीत सद्‌गुणी आणि पुरुषार्थ जीवनाची बिजे पेरली जातील कारण आपला संदेश सर्व जगासाठी आणि सर्व काळासाठी असावा अशी इच्छा बाळगली होती. ''कुरळ'' चे तीन भाग आहेत. पहिला सदाचाराला, दुसरा संपत्तीला आणि तिसरा प्रीतीला वाहिला आहे. जीवनातील चौथ्या आणि सर्वसामान्य अशा चौथ्या साधनाचा ह्या काव्यात विचार केला नाही. ''कुरळ'' ची शिकवणूक जर दृढपणे अनुसरली तर मानवाला अपसुखच आत्मज्ञान होऊ शकेल आणि आत्मज्ञान हे मानवाचे इहलोकातील अथवा परलोकातील परमउच्च सुख आहे.

ग्रंथाच्या आशयासंबंधी बोलतांना अय्यर म्हणतात, ''पहिल्या भागात 'सदाचार' ५८ शीर्षकाखाली आपला ग्रंथकार गृहस्थाचे आणि संन्यासाचे जीवन वर्णन करतो. . . . पहिल्या भागाचा उदात्त घटकगुण म्हणजे त्यात दिसणारा जीवनाविषयीचा निरोगी

दृष्टिकोन. आपला ग्रंथकार ग्वाही देतो, 'आदरणीय घर हे प्रमुख वरदान असून अनुरूप संतती हा त्याचा अतुच्च गौरव आहे.'' त्याचे बालकाबद्दलचे प्रेम किती दृढ आहे ! 'आपल्या बालकांचा स्पर्श म्हणजे शरीराचा आनंद,' 'ज्यांनी आपल्या छोट्या बालकांचे बोबडे बोल ऐकलेले नाहीत त्यांना सतार आणि मुरलीचे आकर्षण वाटते. मानवतेच्या प्रेमावर कवी मोठा भर देतो आणि अतिथींचा सन्मान हा मानसाचा सर्वोच्च गुण आहे असे तो मानतो. . . . पहिल्या भागाचा शेवट प्रतिष्ठा या प्रकरणाने होता. जे वैगुण्याविना जगतात तेच जगतात आणि जे प्रतिष्ठेशिवाय जगतात ते निधन पावतात. अशा प्रकारे तिरुवल्लुवरना एक आनंदी, हसरी आणि सुखद मानवता आपल्या देशात व जगात निर्माण करायची आहे हे ह्यावरून दिसेल.''

''संपत्ती'' ह्या ग्रंथाच्या दुसऱ्या भागासंबंधी अय्यर म्हणतात, हा भाग पहिल्या भागापेक्षा जवळ जवळ दुप्पट आणि तिसऱ्याच्या तिप्पट आकाराचा आहे. ह्यावरून ऋषींनी राजकारण आणि संपत्ती यांना आपल्या जीवन योजनेत केवढे महत्त्व दिले आहे हे दिसते. पहिल्या भागात कवी आपण पहिल्या प्रतीचे नीतीशिक्षक आहो हे दर्शवितो त्याचप्रमाणे ह्या भागात ते उत्कृष्ट मुत्सद्दी आणि पूणपणे व्यवहारी मनुष्य आहेत असे दिसते. . '' हा भाग संपत्ती संचय, राज्याची आणि सचिवाची कर्तव्ये ह्या संबंधी आहे.

तिसऱ्या भागाचे शीर्षक 'प्रीती' हे असून त्यात प्रेमाचा सर्व बाजूने विचार केलेला दिसतो. ''लॉक्स्ली हॉलचे'' चे अत्यंत उत्कट प्रशंसकसुद्धा प्रेमिकांच्या विव्हल मनांतील जे अगणित भावतरंग एकमेकांना अनुसरतात त्यांच्या विश्लेषणात हा कवी टेनिसन् पेक्षा अधिक यशस्वी आहे, हे मान्य करतील,'' असे अय्यर ह्यांचे निरीक्षण आहे.

''कुरळ'' ची महात्मता सारांशाने सांगताना अय्यर म्हणतात, माणसाच्या नैतिक कर्तव्यासंबधी असो की राज्याच्या धोरणाविषयी असो, जीवनात यशस्वी होण्यासाठी कृतीची कोणती तत्त्वे अनुसरावी याबद्दल किंवा प्रेमिकांच्या थरथरत्या हृदयांतील बदलत्या भावनांबद्दल असो तिरुवल्लूवर यांनी मानवी विचाराची अगाधता गाठली आहे. नैतिक नियमांची महत्ता व शक्ती अधिक आग्रहाने आणि सामर्थ्याने जगातील कोणाही द्रष्ट्याने त्यांच्याइतकी भर देऊन सांगितलेली नाही. भीष्म किंवा कौटिल्य, कामंदक किंवा रामदास, विष्णुशर्मा, मॅकिआव्हेली किंवा कनफ्यूशिअस यांनीसुद्धा त्यांच्यापेक्षा राज्यव्यवहारासंबंधी अधिक सखोल असा सल्ला दिलेला नाही. 'पुअर रिचर्ड' ला सुद्धा कुशल व्यापारी तयार करण्यासाठी अधिक चतुराईने आणखी काही सांगण्यासारखे नाही; कालिदास किंवा शेक्सपिअर यांनी या मैलापूरच्या अस्पृश्य विणकारापेक्षा प्रेमिकांच्या हृदयाचे व त्यांच्या परिवर्तनीय भावभावनांचे अधिक ज्ञान नाही. अशी या तमिळ देशात पण सर्व मानवतेचा ठेवा असलेल्या जन्मलेल्या महान ऋषीची विश्वात्मक दृष्टी आहे.

अल्जिअर्सकडे हद्दपारीचा धोका टळल्यानंतर अय्यर यांनी अधिक सातत्याने

वाङ्मयीन कार्याकडे लक्ष पुरविले. राष्ट्रसेवा आणि उदरनिर्वाहाचे साधन या दोन्हीही दृष्टीने त्यांनी त्याकडे पाहिले. पाँडिचेरीतील पोस्टाचे अधिकारी भारत सरकारचे नोकर असल्यामुळे त्यांनी 'स्वदेशीची' बाहेरून येणारी पत्रे किंवा मनीऑर्डरी रोखून धरण्याचा प्रयत्न केला हे आपण पाहिलेच आहे. म्हणून पाँडिचेरीच्या पोस्ट अधिकाऱ्यांच्या हाती न पडता आपल्याला नातेवाईकांकडून आणि आपल्याला सहानुभूती असणाऱ्यांकडून पैसे मिळविण्यासाठी युक्त्या कराव्या लागल्या. कधीकधी पुस्तकांच्या वेष्टणातून चलनी नोटा दडपून आणल्या जात तर कधीकधी रुपयांची नाणी दुसऱ्या कशात तरी लपून आणली जात. भारती, अय्यर आणि श्रीनिवासाचार्य यांचे एक जवळचे मित्र अर्मुगम् चेट्टियार पाँडिचेरीत भाडे व्यापारी होते. ते ब्रिटिश भारतातून मोठ्या प्रमाणात डब्यातून तूप मागवित. या डब्यातील तुपातून रुपयांची नाणी फ्रेंच भारतात चोरून आणली जात.

अय्यर आणि भारती यांच्या बाबतीत त्यांच्या पुस्तकांची प्रकाशने उत्पन्नाचे महत्त्वाचे साधन होते. भारती यांच्या एका मित्राने त्यांचे 'कन्न पाट्टू' हे मद्रास येथे प्रसिद्ध केले. अय्यर यांचे 'कुरळ' चे भाषांतर तिरुवल्लुवर यांची वचने या शीर्षकाखाली पाँडिचेरीत छापले गेले. त्यांनी ''कंबनीलयम्'' ह्या नावाची स्वतःची प्रकाशन आणि वितरण संस्था सुरू केली. ''कुरळ'' च्या भाषांतराव्यतिरिक्त 'कंम्बनीलयमूने' तमिळमध्ये सात पुस्तके प्रकाशीत केली. श्रीनिवासाचार्य यांना काही काळानंतर भागीदार म्हणून घेण्यात आले आणि संस्थेने त्यांचीही पुस्तके प्रसिद्ध केली. तमिळ पुस्तकांपैकी पहिले कंबन् यांच्या ''रामायण'' महाकाव्याचे 'बालकांड' होते. बालकांडने अय्यर यांची वाङ्मयीन समीक्षक म्हणून क्षमता सिद्ध केली. त्यांनी कंबन यांच्या काव्याचे सौंदर्य सामान्य वाचकांपर्यंत आणले. दुसरे पुस्तक आधुनिक लघुकथांचे होते. तमिळमधील लघुकथांचे हे पहिलेच पुस्तक. त्यांचे शीर्षक ''मंगायर क्कारासियीन कथाळ मुदालिया कथाईकाल''. अशा तऱ्हेने अय्यर आधुनिक वाङ्मयीन समीक्षेचेच नव्हे तर तमिळमधील लघुकथांचेही जनक झाले. या पुस्तकाच्या प्रास्तविकात अय्यर यांनी तमिळ साहित्य हा नवा वाङ्मयप्रकार सुरू करण्याचा आपला हेतू म्हणजे तमिळ लोकांची पुष्कळ दिवसापासून विसरली गेलेली विरक्ती पुन्हा जोपासणे हा असल्याचे स्पष्ट केले. पहिल्या दोन कथा पहिली शीर्षकाची आणि दुसरी अय्यरनी सांगितल्याप्रामणे ओसियन ह्या गॅलिक (आयरिश) कवीच्या धर्तीवर लिहिल्या होत्या.'' पुस्तकातील कथांनी विरवृत्ती, प्रमाथी प्रेम करुण विरह इत्यादी अनेक भावनांना स्पर्श केला. इतिहासातून घेतलेली 'अनारकली' ही फारशी कवी निजामी यांची ''लैला मजनू'' आणि ग्रीक पुराणातरीची ''एथिरोलियाल'' (प्रतिध्वनी) या तीन जागतिक प्रसिद्ध असलेल्या कथा अय्यर यांच्या निरुपणाने अलंकृत झाल्या आहेत.

कम्बनीलयम् न छापलेले ''चंद्रगुप्त चक्रवर्ती चरित्रम्'' हे पुस्तक अय्यर यांनी ''भारतीय राष्ट्रातील तेजस्वी वीरांची आमच्या वाचकांना ओळख करून देण्याच्या हेतूने लिहिले.'' हे पुस्तक स्फूर्तिपद असून पांडित्यपूर्ण आहे. त्यात चंद्रगुप्ताच्या कालासंबंधी प्रबळ पुरव्यानिशी विवेचन असून त्याने पूर्वीच्या पंडितांचे कित्येक सिद्धांत खोडून काढले आहे.

''महात्मा बुकर टी. वॉशिंग्टन'' हे अय्यर यांचे ''कंबनीलयम्'' ने प्रसिद्ध केलेले सहावे पुस्तक. अय्यर यांनी तमिळ गुरुकुलम ही शाळा शर्मा देवी येथे नंतर काही वर्षांनी काढली. ती बुकर टी. वॉशिंग्टनच्या टस्केजी इन्स्टिट्यूटच्या नमुन्यावरूनच. ''जनसेवा'' या सदर पुस्तकाला जोडलेल्या निबंधात अय्यर भविष्यदर्शी दृष्टीने महात्मा गांधींच्या उद्योगामार्फत शिक्षण देणाऱ्या मुलोद्योग शिक्षण पद्धतीची पूर्व कल्पना केलेली दिसते. अय्यर यांचे बुकर टी. वॉशिंग्टनमधील पुस्तक १९१६ मध्ये आले आणि त्यांच्या तमिळ गुरुकुलमची १९२२-२३ मध्ये स्थापना झाली.

''कम्बनिलयम्'' च्या मुद्रणालयातून बाहेर पडलेला शेवटचा ग्रंथ म्हणजे इमर्सनच्या'' ''सेल्फ रिलयन्स'' ह्या विख्यात निबंधाचे सटीक तमिळ भाषान्तर. हा कालातीत असा ज्ञानकोश तमिळ वाचकांपुढे ठेवताना अय्यर यांनी प्रस्तावनेत इमर्सन, कार्लाइल आणि रस्किन ह्या तीन लेखकांच्या गुणांची चर्चा केली आहे. ह्या तिन्ही लेखकांचा एकोणिसाव्या शतकातील विचारांना वळण देण्यात मोठा वाटा आहे. कार्लाइल पेक्षा हातात छडी घेतलेल्या रस्किनची शैली सुंदर आणि मोहक होती. पण त्याच्या विचारात स्त्रीसुलभ मार्दव होते. इमर्सनच्या बाबतीत मात्र उदात्त विचारांना उन्मादावस्थेचा अडथळा नाही. ''सेल्फरिलायन्सच्या' भाषान्तराच्या प्रस्तावनेत (तमिळ शीर्षक) अय्यर म्हणतात'' इमर्सनने आयुष्यभर जे शिकवले त्याचे ह्या एका निबंधात सार आले आहे. म्हणूनच आम्ही त्याचे भाषान्तर करून ते येथे सादर करण्याचे धाडस केले आहे. तमिळनाडूच्या लोकांना इमर्सनच्या इतर निबंधाचे अवलोकन करण्याची इच्छा असली,तरी आम्ही ते एकामागून एक भाषान्तरित करू.''

ही प्रस्तावना ऑक्टोबर १९१९ ची आहे. ''चंद्रगुप्त चक्रवर्ति चरित्रम्'' हे पुस्तक तोबडतोब विकले गेले आणि दुसऱ्या आवृत्तीला मागणी आली. परंतु इमर्सनचा ''सेल्फ रिलायन्स'' हा निबंध तितक्या लवकर खपला नाही. तमिळ जनतेने इमर्सनच्या इतर निबंधांच्या भाषान्तराबाबत उत्सुकताही दर्शविली नाही.

पाँडिचेरीमध्येच कवि भारती यांच्या ''पांचाली शपथम्'' ह्या अमर काव्याला आश्रयदात्याविना प्रसिद्धीची वाट पाहात रेंगाळावे लागत होते हे लक्षात घेतले तर, अय्यरना आपल्या एकातरी पुस्तकाच्या दोन आवृत्त्या काढता आल्या हे भाग्यच म्हटले पाहिजे ! भारतींच्या काव्याचा पहिला भागच कसाबसा मुद्रित होऊ शकला.

अय्यर यांच्या आणखी एका सर्वात मोलाच्या पुस्तकाला भावी पिढी मुकली कारण त्यावर ब्रिटिशांनी मुद्रणाच्या वेळीस बंदी घातली. ते पुस्तक म्हणजे नेपोलियनचे तमिळ

चरित्र. यात नेपोलियनच्या लष्करी डावपेचांची चर्चा होती. आपण आधी पाहिल्याप्रमाणे अय्यरनी आपल्या फ्रेंचच्या ज्ञानाला उजाळा दिला, तो नेपोलियनच्या युद्धनितीचे आणि त्याच्या पत्रांचे वाचन करण्यासाठी. नेपोलियनच्या युद्ध नीतीची चर्चा करण्याचा हेतू तमिळ वाचकांच्या मनात युद्ध शास्त्राबद्दल रस निर्माण करावा हा होता. हे पुस्तक जप्त झाल्यामुळे कायमचे नाहीसे व्हावे ही गोष्ट दुर्दैवाची आहे.

''ऑगस्टीन मुनिवरीन् विन्नाप्पम्'' ही आणखी एक कृती. सुब्रह्मण्य शिवम् यांच्या मद्रास येथून प्रसिद्ध होणाऱ्या ''ज्ञानभानू'' ह्या मासिकात क्रमशः प्रसिद्ध झाली होती. ती पुस्तकरूपाने अद्याप प्रसिद्ध झालेली नाही.

---

# गांधीजींकडून मत परिवर्तन

दक्षिण अफ्रिकेमध्ये सत्याग्रहाचे तंत्र वापरून प्रसिद्ध झालेले मोहनदास करमचंद गांधी भारतात ९ जानेवारी १९१५ रोजी परतले. तो युद्ध काळ होता. राजकारण स्थिरावलेले होते.

भारतात आल्याबरोबर गांधीजींनी स्वदेशी पोषाख घालण्यास सुरुवात केली. पाश्चात्य कपड्यांचा त्याग करून त्यांनी धोतर, झब्बा आणि मोठे थोरले काठेवाडी पागोटे वापरण्यास सुरुवात केली. त्यांच्या खांद्यावर एक उपरणे असे.

आपण आपले गुरू गोखले ह्यांच्या सल्ल्याप्रमाणे भारतातील परिस्थितीचे निरीक्षण करण्यात काही काळ घालविल्यानंतरच राजकारणात प्रत्यक्ष भाग घेऊ असे गांधीजींनी मुलाखत घेण्यास आलेल्या पत्रकारास सांगितले. अशाप्रकारे खरोखर त्यांनी दोन वर्षे घालविली. या काळात त्यांनी अखिल भारतात बराचसा प्रवास केला.

गोखल्यांची इच्छा होती की, गांधीजींनी भारत सेवक समाजास येऊन मिळावे. गांधीजींनाही तसेच वाटत हाते. परंतु भारत सेवक समाजातील इतरांना असे वाटले, की त्यांच्या पद्धती आपल्यापेक्षा इतक्या निराळ्या आहेत की, त्यांना काही काळ केवळ उमेदवार म्हणून प्रवेश दिल्यास ते अधिक योग्य होईल. उमेदवार होतांना आपल्या प्रवेशाचे चिन्ह म्हणून गांधीजींनी समाजाचे सर्व संडास साफ केले. अनेक सभासदांना हे रुचले नाही आणि गोखल्यांनी हे काम सोडण्यास गांधीजींचे मन वळवले.

एप्रिल १९१५ ला दक्षिणेस मद्रासला जाण्यापूर्वी गांधीजी मुंबई, पुणे, काठेवाड, बंगालमधील शांतिनिकेतन, हरद्वार व हृषिकेशला गेले. गांधीजींचे चरित्रकार तेंडुलकर लिहितात :

''एका तिसऱ्या वर्गाच्या डब्यातून हातात एक कपड्यांचे बोचके घेऊन गांधीजी आणि कस्तुरबा खाली उतरले. ते एखाद्या गरीब शेतकरी कुटुंबातले दिसत होते. फलाटावर प्रमुख नागरिकांच्या एका भल्या मोठ्या जथ्याने त्यांना हार घातला आणि गर्दीतील लोकांनी

त्यांचा मनापासून जयजयकार केला. त्यांचे यजमान जी. ए. नटेशन होते. त्यांनी गांधीजी व कस्तुरबा यांना त्यांच्या उतरण्याची जागा दाखविली. या जागेत कमीत कमी परंतु बऱ्यापैकी असे सामानसुमान होते- दोन खाटा, एक टेबल खुर्ची आणि एक लिहिण्यासाठी मेज होती. या गोष्टी गांधीजींना डामडौलाची चिन्हे आहेत असे वाटले आणि त्यांनी ती काढून टाकण्यास सांगितले. काहीही सामान नसलेली रिकामी खोली त्यांनी पत्करली.

मद्रासच्या नागरिकांनी गांधीजी व कस्तुरबाच्या सन्मानार्थ व्हिक्टोरीया पब्लिक हॉल येथे एक स्वागत समारंभ आयोजित केला. त्याना नागरिकांतर्फे मानपत्र देण्यात आले. ते जी. ए. नटेशन ह्यांनी भारत व द. अफ्रिका समितीचे चिटणीस ह्या नात्याने वाचून दाखविले. गांधीजींसाठी इतरही काही कार्यक्रम आयोजित केले होते. वकील लोकांची मेजवानी, वाय. एम. सी. ए. बैठक आणि श्रीमती ॲनी बेझंट यांनी मोठ्या वडाच्या झाडाखाली दिलेले जेवण.

मद्रास सोडल्यावर गांधीजींनी द. भारतात एक महिनाभर प्रवास केला. या दौऱ्यामध्ये त्यांनी पाँडिचेरीला भेट दिली. तेथे त्यांना अय्यर भेटले. श्री. अरविंद यांची त्यांनी मुलाखत मागितली. ती त्यांना मिळाली नाही. भारतींना भेटण्याचा त्यांनी प्रयत्न केला नाही.

श्री. अरविन्दांना गांधीजींना भेटण्यास काही रस नव्हता, असे दिसते. म्हणून त्यांनी गांधजींची विनंती नाकारली. श्री. अरविन्द ह्यांना बहुधा राजकीय चर्चेमध्ये स्वतःला गुंतवूण घ्यायचे नसावे.

सुब्रह्मणम भारतींबद्दल त्यांची आणि गांधीजींची पाँडिचेरीत भेट झाल्याची कोठेही नोंद नाही. त्यांची व गांधीजींची पहिली भेट मद्रास येथे मार्च १९१९ मध्ये असहकाराची चळवळ सुरू होण्याच्या वेळेस झाली असल्याचे दिसते. भारतींचा अत्याचारी मार्गांवर कधीच विश्वास नव्हता आणि त्यांनी १९०९ च्या सुमारास गांधीजींच्या द. अफ्रिकेतील सत्याग्रहाच्या प्रयत्नांना स्वतःचा पाठिंबा दिला होता आणि त्यांची प्रसंशाही केली होती. एवढेच नव्हे तर त्यांनी द. अफ्रिकेतील भारती यांच्या कार्यासाठी आपल्या साप्ताहिक इंडियात विनंती करून निधीही जमविला होता. त्यांनी गांधीजींची एका व्यंगचित्रात- त्यांनी त्यांचे जे चित्रण केले होते. त्यात- गांधीजी हे एक प्रामाणिक गाय आहे असे दाखविले आहे. ही गाय आपल्या घराच्या वासराला दूध देऊन पुन्हा अरण्यात वाघाच्या भक्षस्थानी पडण्यासाठी परतत होती. गांधीजी आणि भारती यांची १९१५ साली गांधींजी पाँडिचेरी आले असता भेट झाली नाही. ही गोष्ट दुर्दैवाची आहे.

स्वदेशी पुढाऱ्यांपैकी व. वे. सु. अय्यर हे एकटेच गांधीजींना १९१५ साली भेटले. १९०९ साली लंडन येथे त्यांची व गांधीजींची भेट झाल्यावर गांधीजी शहरात आले आहे हे पाहिल्यावर त्यांनी गांधीजींना भेटण्याचा प्रयत्न केला असावा. ते काहीही असले तरी अय्यर यांचा अद्याप स्वराज्य मिळविण्यासाठी अत्याचारी मार्गावर विश्वास अल्यामुळे दोघांची भेट ही केवळ औपचारिक शिष्टाचाराचा भाग होत असावा. परंतु त्यांच्या

मुलाखतीचा शेवट अत्यंत अनपेक्षित असा झाला. अय्यर हे गांधीजींच्या अहिंसा तत्त्वाचे उपासक बनले.

अय्यर यांच्या चरित्रात त्यांच्या अनामिक चरित्रकाराने म्हटल्याप्रमाणे ते आले, त्यांनी पाहिले आणि त्यांनी जिंकले, अशातला हा एक प्रकार होता. गांधीजी आले त्यांनी अय्यरना पाहिले आणि त्यांना जिंकले. अय्यर हे स्वमताचा त्याग करून अहिंसा तत्त्वाचे पाईक बनले. जे केव्हाही बाहेर जाताना पिस्तुलाशिवाय गेले नाहीत त्यांनी पिस्तुलाच्या बदली टकळी घेतली. आपल्या निधनाच्या दिवसापर्यंत अय्यर आपल्या ह्या नव्या धर्माशी एकनिष्ठ राहिले. काही क्षण असेही आले की त्यांच्या अगदी जवळच्या मित्रांना अय्यर ह्यांनी अहिंसेचे इतके एकनिष्ठ भक्त बनणे योग्य नाही असे वाटले.

तमिळ कवी शुद्धानंद भारती तरुण असतांना अय्यर ह्यांच्या भारद्वाज आश्रम आणि श्रमदेवी येथील गुरुकुलम् मध्ये १९२३ ते २५ ह्या काळात अय्यर ह्यांचे मदतनीस होते. अय्यर ह्यांच्या चरित्रात ते म्हणतात की, ह्या भेटीचा परिणाम म्हणजे अय्यर ह्यांची अशी खात्री पटली की, गांधीजींनी सांगितलेला अहिंसेचा मार्ग हा एकच खरा मार्ग आहे. शुद्धानंद पुढे म्हणतात की भारतींच्या प्रसिद्ध काव्यातील महात्म्यांविषयीच्या काव्यपंक्ती म. गांधींचा विचार मनात आला की अय्यर नेहमी गुणगुणत असत.

महात्माजी आपल्याला पॉंडिचेरी येथे भेटल्यानंतर अय्यरनी त्याबद्दल काय सांगितले हे लिहितांना शुद्धानंद भारती म्हणतात, ''अय्यर एकदा मला म्हणाले की, 'मी गांधीजींचे द. अफ्रिकेतील विजयांचे स्वागत केले, त्यावेळी सुद्धा मला त्यांच्याबद्दल आकर्षण वाटले होते. १९०९ साली जेव्हा ते मला लंडनला भेटले तेव्हा ते एखादा तेजासक्त असतो, त्याप्रमाणे सत्यासक्त होते असे मला वाटले. त्यावेळी माझा तलवारीवर विश्वास होता. त्यावेळी गांधीजींनी विनवून सांगितले की, हिंसेपेक्षा काहीतरी अधिक शक्तिशाली आहे आणि ती म्हणजे अध्यात्मिक शक्ती. त्यांनी आम्हाला त्यांच्या सविनय प्रतिकाराच्या पद्धतीबद्दल म्हणजे सत्याग्रहाबद्दलही विचार करण्यास सांगितले त्यावर विश्वास बसण्यासाठी आम्हाला बरीच वर्षे थांबावे लागले. माझी जेव्हा अशी खात्री झाली की, महात्माजींच्या पद्धतीने आपल्याला आपली उद्दिष्टे रक्तपाताशिवाय साध्य करता येतील तेव्हा माझ्या मनाने त्यांचे नेतृत्व मान्य केले. महात्माजी हे एक प्रतिस्पर्धी नसलेले नेते आहेत. तथापि नंतर अय्यरनी आम्हाला सांगितले 'देशाचे संरक्षण शस्त्रशक्तीशिवाय होणार नाही. आपण शस्त्रशक्तीसुद्धा मिळविली पाहिजे. आपण बलशाली साहसी आणि धार्मिक बनले पाहिजे.''

जीवनाच्या अखेच्या वर्षात अय्यर यांना एकच ध्यास लागून राहिला होता. तो म्हणजे तमिळ समाजातील सर्व भेदभावांचे निर्मूलन करून शिखांच्या धर्तीवर एक संघटित जातीविरहित समाज निर्माण करण्याचा. मातृभूमीसाठी आपल्या जीविताचा त्याग करण्यास जो सदैव तयार असेल असा एक बलशाली, साहसी आणि समर्पित समाज

त्यांना निर्माण करायचा होता.

अय्यर यांच्या मतांचे गांधीवादात झालेले परिवर्तन बहुतेकांना विस्मयकारक वाटले. अगदी अलिकडे म्हणजे १९११ साली ह्या सिंहाच्या काळजाच्या क्रांतिकारकाने जिल्हाधिकारी ॲश् यांच्यावर झालेल्या गोळीबारीची योजना आपल्या बुद्धीने केली होती. त्यांचे अहिंसावाद्यात झालेले परिवर्तन वृत्तपत्रांनी मोठमोठ्या मथळ्यात दिले. परंतु आपण त्यांच्या पॉंडिचेरीतील वास्तव्याच्या काळातील तमिळ आणि इंग्रजी लिखणाचा कल पाहिला तर ह्या हिंसावादी दहशतवादी क्रांतिकारकाचे हळूहळू एका परिपक्व राष्ट्रशिल्पकारात रूपांतर होत होते हे आपल्या लक्षात येईल. तलवारी ऐवजी त्यांना आता लेखणी चालवणे अधिक प्रिय वाटू लागले होते.

अय्यर यांच्या मनात कोणतेही बदल झाले असले तरी शासन मात्र ते कमी धोकेबाज आहेत हे मानायला तयार नव्हते. दहशतवादी आणि क्रांतिकारक चळवळींवरील राजद्रोह समितीचा अहवाल (सेडिशस् कमिटी रिपोर्ट) पॉंडिचेरीतील अशा चळीवळींबद्दल सर्व दोष अय्यर यांना देतो. हा अहवाल जुलै १९१८ मध्ये, मॉंटेग्यु- चेम्सफर्ड सुधारणा जाहीर झाल्यानंतर एक आठवड्याच्या आत प्रसिद्ध झाला आणि तो न्यायमूर्ती एस्. ए. टी. रौलेट यांच्या अध्यक्षतेखालील समितीने तयार केला. राजद्रोह समितीने काही ''आणीबाणीच्या सुधारणा'' जाहीर केल्या होत्या. त्या भारतातील दहशतवादी व क्रांतिकारक चळवळींच्या विरुद्ध शिक्षात्मक स्वरूपाच्या होत्या. ह्या पायावर जे वैधानिक प्रस्ताव मांडण्यात आले त्यांच्या विरोधात म. गांधींनी आपली असहकाराची चळवळ भारत शासनाविरुद्ध सुरू केली.

राजद्रोहसमितीचा अहवाल क्रांतिकारी चळवळीचा प्रांतवार विचार करतो. मद्रासवरील एका छोट्या प्रकरणात अहवालाने मद्रास प्रांतातील क्रांतिकारी चळवळींचा संबंध बिपिनचंद्र पाल ह्यांच्या १९०७ मधील मद्रास येथील दौऱ्याशी लावला आहे. मद्रास प्रांतातील क्रांतिकारक चळवळीमागील बौद्धीक अधिष्ठान नीलकांत ब्रह्मचारी आणि व. वे. सु. अय्यर ह्यांनी दिल्याचे नमूद केले आहे. एम्. पी. तिरुमल्लाचारी इंडिया साप्ताहिकाचे व्यवस्थापक आणि जे नंतर लंडन येथे इंडिया हाऊसला जाऊन मिळाले ते, पॅरिस केन्द्राहून चळवळीस प्रोत्साहन देत असत, असेही अहवालात म्हटले आहे.

अहवालाच्या संबंधित भाग पुढील प्रमाणे-

सप्टेंबर १९१० मध्ये एम्. पी. तिरुमल्लाचारींनी पॉंडिचेरीच्या इंडिया पत्राच्या संपादकीय विभागातील एका कर्मचाऱ्यास पत्र लिहिले त्यात त्यांनी म्हटले की, पॉंडिचेरी येथे ज्या गोष्टी करणे योग्य आहे परंतु त्या करण्याचे त्यांना जर धाडस नसेल तर त्यांनी आपल्या योजना दुसऱ्या कोठल्या तरी सुरक्षित व योग्य ठिकाणी अंमलात आणणे चांगले- अशा तऱ्हेने ते काहीतरी लवकरच करतील अशी त्यांची अपेक्षा असल्याचेही त्यांनी लिहिले.

**खुनाला उत्तेजन :** सप्टेंबरचे आपले पत्र आचार्य ह्यांनी लिहिले त्याचवेळी ब्रिटिश शासनाविरुद्ध मद्रास प्रांतात नीलकान्त ब्रह्मचारी (१९११ च्या तिनवेल्ली कटाच्या खटल्यातील आरोपी नं. १) एक कट शिजवीत होते. १९१० व त्याच्या आधीच्या वर्षी शंकर कृष्ण अय्यर यांच्यासह ते द. भारतामध्ये ते संचार करून स्वदेशी व राजद्रोह यांचा प्रचार करीत. ह्या दौऱ्यात त्यांनी प्रांतातील अनेक व्यक्तींना स्वराज्य मिळविण्याच्या कामी आपण सहकार्य करू अशा अर्थाची शपथ घ्यायला लावली होती. जून १९१० मध्ये शंकर ह्यांनी नीलकांत ह्यांची त्रावणकोर जंगल खात्यात कारकून असलेले आपले मेहुणे वांची अय्यर ह्यांच्याशी ओळख करून दिली. डिसेंबर १९१० च्या सुरुवातीस व. वे. सु. अय्यर पॉंडिचेरी येथे येऊन पोचले. त्यांनी काही बागांमधून तरुण भारतीयांना पिस्तूलाच्या नेमबाजीचा सराव देण्यास सुरुवात केली. ह्याबरोबरच ते देश स्वतंत्र करण्यासाठी हिंसेची आणि खुनांची आवश्यकता पटवून देऊ लागले. भारतात येण्यापूर्वी अय्यर हे इंडिया हाऊसमध्ये विनायक सावरकरांचे उजवे हात असून ते नंतर पॅरिस येथे जाऊन श्यामजी कृष्ण वर्मा, मादाम कामा आणि इतर कटवाल्यांचे सहकारी बनले होते. ९ जानेवारी १९११ ला वांची अय्यर यांनी तीन महिन्यांची रजा आणि पॉंडिचेरीस भेट देऊन त्यांनी व. वे. सु. अय्यर यांच्याशी सहकार्य केले व त्यांच्या शिकवणुकीप्रमाणे पिस्तुलाच्या नेमबाजीचा सराव केला. तिनवेल्ली कटाच्या खटल्यात अशी साक्ष देण्यात आली की, 'वांचीनी एका साक्षीदारास असे सांगितले की, इंग्रजी राज्य देशाचा नाश करीत आहेत. जर सर्व गोऱ्यांना ठार करण्यात आले, तरच हे थांबू शकेल. तिनवेल्ली जिल्ह्याचे प्रमुख आणि १९०८ च्या सर्व घटनात ज्यांनी प्रमुख भाग घेतला त्या मि. ॲश यांना प्रथम ठार करावे अशी त्यांनी सूचना केली. पॉंडिचेरीहून योग्य हत्यारे मिळू शकतील असेही वांची यांनी सांगितले.

तिनवेल्ली खटल्यातील कटवाद्यांना आरोपींच्या घरांच्या झडत्यांत फिरंग्यांना घातक ठरतील अशा छापलेल्या दोन पुस्तिका सापडल्या. एकीचे नाव होते "आर्यांना उपदेश." तीत म्हटले होते "परमेश्वरापुढे शपथ घ्या की आपण ह्या फिरंगीवाद्याला आपल्या देशातून नष्ट करू आणि येथे स्वराज्याची स्थापना करू. अशी शपथ घ्या की, जोपर्यंत फिरंगी येथे आपल्या भारतभूमीवर स्वतःची सत्ता चालवीत आहे तोपर्यंत आपले जीवन वाया गेले असे आपण मानू. तुम्ही कुत्र्याला मारता त्याप्रमाणे जो गोरा फिरंगी तुमच्या हाती येईल त्याला मारा. सुरीने, काठीने, दगडाने किंवा तुम्हाला देवाने दिलेल्या हाताने त्याला ठार करा." दुसऱ्या पुस्तिकेचे शीर्षक होते "अभिनव भारत संस्थेमध्ये प्रवेश मिळविण्यासाठी घ्यावयाची शपथ" प्रत्येक पुस्तकाच्या दहा प्रती पॉंडिचेरी येथील "धर्मम्" पत्राच्या संपादकीय विभागातील एका कर्मचाऱ्याकडे पाठविण्यात आल्या होत्या. त्याने त्यांचे वाटप केले आणि आरोपीशी त्यांच्याबद्दल

चर्चा केली असाही पुरावा मिळाला.

ॲश ह्यांच्या खुन्यापर्यंत जाऊन भिडणाऱ्या घटनांचे वर्णन करतांना राजद्रोह समितीचा अहवाल म्हणतो; - - **'पॅरिस येथील अराजकवाद्यांशी संबंध :** मादाम कामा यांच्या "वंदे मातरम्" या पत्राच्या एप्रिलच्या अंकातील एका लेखात अशा तऱ्हेचा गुन्हा घडणार आहे असा उल्लेख होता. "वंदे मातरम्" हे पत्र पॅरिस येथे मे अखेर पर्यंत प्रसिद्ध होत होते. लेखाचा शेवट पुढीलप्रमाणे होता. सभेमध्ये किंवा बंगल्यामध्ये, आगगाडीत किंवा वाहनात, दुकानात अथवा चर्चमध्ये, बागेत वा जत्रेच्या ठिकाणी कोठेही संधी मिळेल त्या ठिकाणी इंग्रजांना ठार केले पाहिजे. साध्या व्यक्ती किंवा अधिकारी असा भेद करण्याची काही अवश्यकता नाही. नानासाहेब या पुरुषाला ती गोष्ट कळली होती आणि आपल्या बंगाली मित्रानांही हे कळू लागले आहे. त्यांच्या प्रयत्नांना सुयश लाभो. त्यांचे हात लांबवर पोचोत. आता आपण इंग्रजांना म्हणू की तुम्ही ह्या अरण्याच्या बाहेर जाईपर्यंत कुठली आरडा ओरडा करू नका" जुलै १९११ मध्ये लिहिलेल्या नंतरच्या एका लेखात मादाम कामा ह्यांनी अलिकडील खून हे भगवद्गीतेच्या शिकवणीप्रमाणे आहे असे सिद्ध करण्याचे प्रयत्न केले. त्यांनी म्हटले. "हिंदूस्थानातील सोन्याने मडविलेले गुलाम लंडनमधील रस्त्यातून संचलन करून शाही सर्कशीत भाग घेत होते. गायीप्रमाणे इंग्लंडच्या राज्याच्या पायावर लोटांगण घालीत होते. त्यावेळेस आपल्या दोघा तरुण आणि शूर देशबांधवांनी तिनवेल्ली आणि मैमनसिंग येथे आपल्या सहासपूर्ण कृत्यांनी हिंदूस्थान झोपी गेलेला नाही असे सिद्ध केले." (मैमनसिंग येथे १९ जूनला राजकुमार रॉय या फौजदाराचा खून झाला.)

हा लेख आणि खुनी इसमाजवळ सापडलेले एक पत्र या दोन्हीवरून राज्यरोहण समारंभाच्या वेळी हा खून करण्यात यावा असे ठरलल्याचे दिसते.

"**निर्णय :** तिनवेल्ली कटाच्या खटल्याच्या निर्णयाप्रमाणे निरनिराळ्या जातींच्या आणि समाजाच्या थरातील नऊ आरोपींवर शासनाविरुद्ध कट केल्याचा आरोप सिद्ध झाला. परंतु त्यांच्यावर ॲश ह्यांच्या खुनाला मदत करण्याचा आरोप सिद्ध झाला नाही. कटवाल्यांनी जी शपथ घेतली होती. तिच्या स्वरूपाने त्यांनी स्वतःला बांधून घेतले होते आणि त्यामुळे त्यांनी जातीच्या पूर्वग्रहावर मात केली होती. द. भारतामध्ये जातीचे पूर्वग्रह हे एकत्र येण्याला फार मोठा अडथळा निर्माण करतात असे उद्गार न्यायालयाने काढले.

"तिनवेल्ली कटवाल्यांवरील खटल्यानंतर क्रांतिकारी गुन्हेगारांच्या कटापासून त्यांना कुठलाही उपद्रव मद्रास प्रातांत झालेला नाही. मद्रास येथे कोणतेही देशी क्रांतिकारक चळवळ अस्तित्वात होती असे आम्हास वाटत नााही. बिपिन चंद्रपाल आणि पॅरिस व पॉंडिचेरी येथील क्रांतिकारकांचा प्रभाव नसता तर द. भारतात

कोठलीही कटकट निर्माण झाली नसती असे आम्हाला वाटते.''

अय्यर यांच्याविरुद्ध इतका पुरावा उपलब्ध असतांना सुद्धा भारत शासनाने त्यांना त्यांच्या गैरहजरीत ॲश खुनाच्या खटल्यात आरोपी म्हणून का गोविले नाही हे एक गूढच आहे.

---

# मद्रास येथील ''देशभक्तन्'' चे संपादक

मद्रासमधील वाङ्मयीन आणि वृत्तपत्रीय वर्तुळात अय्यर ह्यांची लेखक म्हणून कीर्ती चांगलीच पसरली होती. तमिळनाडू येथील संपादकांकडून त्यांनी आपल्या पत्रात काही लिहावे ह्यासंबंधी संपादकांकडून त्यांना वारंवार विनंती केली जात असे. विशेषतः मद्रास येथील 'देशभक्तन्' ह्या दैनिकात त्यांच्या लेखणीतून उतरलेले अनेक लेख नियमित येत असत. खुद्द पॉंडिचेरीत आर बांगरु पत्थर ह्यांच्या संपादकत्वाखाली निघणाऱ्या 'कलाईमगल' ह्या मासिकात अय्यर यांचे वाङमयीन लेख येत असत.

देशभक्तन् हे दैनिक श्रीमती ॲनी बेझंट यांचे एक अनुयायी एन्. सुब्बराय कामत ह्यांनी श्रीमती बेझंट यांच्या आशीर्वादाने आणि सांपत्तिक साह्याने चालू केले होते. १९१७ मध्ये श्रीमती बेझंट यांनी भारतीय राजकारणात मोठ्या गाजावाजाने प्रवेश केला आणि होमरूल चळवळीला प्रारंभ केला. याबाबतीत त्यांना लो. टिळकांचे सहकार्य मिळाले. आपल्या मताच्या प्रचारासाठी श्रीमती बेझंट यांनी 'मद्रास स्टॅण्डर्ड हे जुने इंग्रजी दैनिक विकत घेतले आणि त्याला न्यू इंडिया असे नवे नाव दिले. त्याच्या समर्थ दिग्दर्शनाखाली न्यू इंडिया हे मद्रास येथील सर्वात लोकप्रिय दैनिक ठरले. त्यांनी आपल्या 'हिंदू' सारख्या प्रस्थापित प्रतिस्पर्ध्यांना सहज मागे टाकले. श्रीमती बेझंट यांनी दैनिकाच्या मुद्रित तपासणीपासून सांपत्तिक नियंत्रणापर्यंत सर्व विभागावर आपली सक्त नजर ठेवली होती.

न्यू इंडियाचे एक सहसंपादक एम्. सुब्बराय कामत यांनी होमरूलच्या कार्याला प्रोत्साहन म्हणून एक तमिळ दैनिक काढण्याचा निश्चय केला. या कल्पनेला श्रीमती बेझंट यांनी आशिर्वाद दिला. तीन हजार रूपयांची एक भरीव देणगीही दिली आणि कामत ह्यांनी डिसेंबर १९१७ ला 'देशभक्तन्' हे तमिळ दैनिक सुरू केले.

एम्. एस्. कामत हे टिळकांचे निष्ठावंत अनुयायी असून जाज्वल्य राष्ट्रवादी होते. कवी भारतींचे ते जवळचे मित्र. त्यांना समाज सेवेची दृष्टी होती. युद्धकाळात जेव्हा भाव

वाढले तेव्हा त्यांनी स्वतःचे एक रास्त भावाचे दुकान उघडले.

'न्यू. इंडिया' आणि 'देशभक्तन्' ह्या पत्रातून वृत्तपत्रीय आणि दैनिकांच्या व्यवस्थापनाचा अनुभव मिळाल्यावर कामत ह्यांनी पुढील वर्षात ''संडेटाइम्स'' ह्या पहिल्या भारतीय साप्ताहिकाची स्थापना केली. ''संडे टाइम्स'' आणि कामत ह्यांनी स्वदेशी कार्य लोकप्रिय केले. आधुनिक भारताचे थोर ऋषी श्री रमण महर्षी श्री. अरविन्द आणि शिर्डीचे श्री साईबाबा ह्यांनाही प्रसिद्ध दिली.

''देशभक्तन्'' हे एक सायंदैनिक हेते. प्रसिद्ध तमिळ पंडित तिरु. वि. कल्याणसुंदर मुदलियार हे त्याचे पहिले संपादक होते. दैनिकाची सुरुवात फारशी सुलभपणे झाली नाही. श्रीमती बेझंट यांच्या चळवळीकडे ब्रिटिश नाराजीने बघत होते. त्यांनी त्यांच्या ''न्यू इंडिया'' कडून २०,००० चा जामीन मागितला.ही रक्कम भरण्यात आली परंतु त्यामुळे आपले विचार मांडण्याचे काम स्वतंत्रपणे श्रीमती बेझंट यांनी थांबविले नाही. जामीन जप्त करण्यात आला. जून १९१७ मध्ये श्रीमती बेझंट आणि त्यांचे दोन मदतनीस यांना अटक करण्यात आली. ह्या कृत्यामुळे देशात खळबळ माजली.

''देशभक्तन्'' चे प्रकाशन यानंतर सहा महिन्यांनी सुरू झाले, तेही ह्याच आंदोलनाचा पाठपुरावा करीत होते आणि प्रसिद्धीची परवानगी मिळण्याआधी त्याला १००० रुपयांचा जामीन द्यावा लागला. १९१९ मध्ये जालियनवाला बागेच्या दुर्दैवी प्रकरणाच्या वेळी जामीन जप्त करण्यात आला आणि आणखी रू. ६००० चा जामीन मागण्यात आला तो भरला गेला.

''देशभक्तन्'' पुनःपुन्हा पाँडिचेरीसारख्या ठिकाणी राहणाऱ्या भारतीय देशभक्तांवरील भारताच्या पुनर्प्रवेशाची बंदी उठवावी ह्याबद्दल आग्रह धरी. त्यामुळे मद्रास कायदेमंडळात हे प्रकरण मांडण्यात आले आणि १९२० चे सार्वत्रिक माफीचे ज्ञापन काढण्यात आले. ह्या ज्ञापनाप्रमाणे सर्व प्रतिबंध उठविण्यात आले. भारती हे सर्व प्रतिबंध निघेपर्यंत थांबले नव्हते. युद्धाच्या अखेरीस त्यांनी नोव्हेंबर १९१८ मध्ये कड्डलोरच्याजवळ ब्रिटिश भारतात प्रवेश केला. त्यांना पकडण्यात आले व तीन आठवड्यानंतर लेखी कबुली दिल्यावर सोडण्यत आले. अय्यर मात्र सार्वत्रिक माफीचे ज्ञापन येईपर्यंत थांबले.

तिरुचीला घरी चौदा वर्षांनंतर परतल्यावर ते अखिल भारताच्या प्रवासाला गेले. हा प्रवास म्हणजे यात्रा आणि अभ्यासदौराही होता आणि दुसरे काही करण्याच्या आधी त्यांनी तो करण्याचे ठरविले होते. त्यांच्या मनात एक शिक्षणसंस्था काढण्याचे ठरले होते.

त्यांनी पुणे, मुंबई,नाशिक, साबरमती (येथे गांधीजींनी आश्रमाची स्थापना केली होती.) दिल्ली, हरद्वार, कांग्री, मथुरा, आग्रा, अयोध्या, गया आणि काशीला भेट दिली. काशी येथे त्यांनी दोन शपथा घेतल्या. एक : मातृभाषेच्या, तमिळच्या शीघ्र विकासाला मदत करण्याला स्वतःला वाहून घ्यायचे आणि दोन : कांग्री येथील आर्यसमाज गुरुकूलच्या धर्तीवर एक शिक्षण संस्था स्थापन करायची.

काशी येथे अय्यर अखिल भारतीय कॉंग्रेस समितीच्या बैठकीस पाहुणे म्हणून उपस्थित राहिले आणि टिळकांसह अनेक पुढाऱ्यांच्या भेटी घेतल्या.

जून १९२० मध्ये अय्यर आपल्या दौऱ्याहून मद्रासला परत आले तेव्हा त्यांना संपादक तिरु. वि. कल्याण सुंदर मुदलियार आणि एम्. एस्. कामत यांच्यात मतभेद झाले आहेत असे कळले. तिरु. वि. कल्याणसुंदर ''देशभक्तन्'' सोडणार होते आणि त्यांच्या जागी अय्यर यांनी यावे असे कामत यांना वाटत होते. अय्यरनी ह्या बाबीचा विचार केला आणि शेवटी ही सूचना स्वीकारली. जुलै ३१, १९२० ला व. वे. सु. अय्यर यांनी मद्रासच्या ''देशभक्तन्'' या तमिळ दैनिकाचे संपादकत्व, महिना रू. १५० पगारावर, स्वीकाराले.

अय्यर यांच्या संपादकत्वाखाली ''देशभक्तनूने'' कॉंग्रेस आणि खिलाफत चळवळीला ठळकपणे पाठिंबा दिला. अय्यर यांनी लिहिलेली संपादकीये इतर वृत्तपत्रांनी निवडून पुनर्मुदित केली. श्रीमती बेझंट यांच्या ''न्यू इंडियाने'' अय्यर यांच्या विवरणाची इंग्रजी भाषान्तरे करून छापली. बहुतेकांच्या मते ''देशभक्तून'' हे भारतींच्या साप्ताहिक ''इंडिया'' ची परंपरा योग्य तऱ्हेने चालवीत होते. अल्पकालातच ''देशभक्तन्'' चा खप प्रथम क्रमांकाचा ठरला.

''देशभक्तन्'' हे दैनिक असले तरी त्यात मासिकाची सुद्धा काही सदर असत. त्याच्या स्तंभातून गंभीर स्वरूपाच्या वाङमयीन लिखाणाला जागा मिळे. पॉंडिचेरीच्या ''कम्बनिलयम्'' ह्या मुद्रण संस्थेमध्ये अय्यर यांना अद्याप रस होता. ते त्यासाठी पॉंडिचेरी येथे वरचेवर जात. आपण रामानंद चत्तर्जी यांच्या ''मॉडर्न रिव्ह्यू''च्या धर्तीवर एक उच्च प्रतीचे मासिक काढावे अशी अय्यर यांच्या मनात अजूनही इच्छा होती.

भारतीय इतिहास बरोबर लिहिला गेलेला नाही असे सावरकरांच्याप्रमाणेच अय्यर यांचे मत होते. पाश्चात्य लेखकांनी ऐतिहासिक प्रसंगांची हवीतशी ओढाताण करून स्वतःच्या दृष्टिकोनानुसार त्याला विपरीत वळण दिले होते आणि भारतीय संस्कृती आणि वीरवृत्ती यांचे वैभव चुकीच्या पद्धतीने रंगविले होते. हे सुधारण्यासाठी अय्यर इंग्रजीमध्ये ''भारताचा इतिहास लिहीत होते. इतिहासाचे लेखन करताना त्यांनी कित्येक वह्यांची पाने भरून टाकली होती. बहुतेक वेळ ह्या वह्या त्यांच्या बरोबरच असत आणि त्यातील भाग ते त्यात रस असलेल्या मित्रांना वाचून दाखवित. दुर्दैवाने हे पुस्तक केव्हाच प्रकाशित होऊ शकले नाही. आणि त्यांचे हस्तलिखित हरवल्यासारखेच आहे.

अय्यर ट्रिप्लीकेन येथे राहात- ''देशभक्तन्'' चे कार्यालय शहराच्या उत्तरेच्या भागात जॉर्ज टाउन येथे होते. त्यांचा पोषाख म्हणजे, धोतर आणि 'पंचकाचम्' हा असे. उघड्या शरीरावर एक फुलाफुलांची मोठी सुती शाल असे आणि डाव्या खांद्यावरून एक कापडी पिशवी लोंबत असे. समुद्रकिनाऱ्यावरील रस्त्याने अय्यर गजगतीने आपल्या कार्यालयाकडे चालत जाऊन टांगा करण्यापेक्षा समुद्र किनाऱ्यावरून काही मैल चालत जाणे ते पत्करीत. त्या बस नसलेल्या दिवसात टांगा, करून जाणे खर्चाचे असे.

कार्यालयात आल्यावर आपल्या सहकार्यांना सस्मित अभिवादन करून अय्यर आपल्या जागी जात. पत्रव्यवहार आणि महत्त्वाची कामे उरकल्यानंर इंग्रजी दैनिके व साप्ताहिके चाळीत आणि आलेल्या तारा वाचीत. त्यावेळेस दूरमुद्रकाची (टेलीप्रिंटर) सोय नव्हती. बातम्या तारांच्या माध्यमातून येत. बातम्यांना शीर्षके देऊन अय्यर त्या योग्य त्या सहसंपादकांना भाषान्तरासाठी देत. नंतर ते संपादकीय व टिपणे लिहीत. त्यांची कागदावर लिहिण्याची गती समान असे. लिहून झाल्याबरोबर मजकूर मुद्रणासाठी पाठवला जाई. त्यांचे हस्ताक्षर सुवाच्य, गोल वळणाचे असून अक्षरे जवळजवळ लिहिलेली असत.

आपले लिखाण संपवून ते उपसंपादकांच्या टेबलांजवळ जात आणि मित्रत्वाच्या नात्याने काही निरीक्षणे करत अथवा भाषान्तरातील काही गुंतागुतीचे प्रश्न सोडवून ते आपल्या खोलीत परतत आणि मुद्रणालयातून येणाऱ्या गॅलींची उपमुद्रिते तपाशीत. सर्व अंतिम मुद्रितेही तपाशीत आणि पत्रात जे जे काही येई त्यास आपली संमती देत. दुपारच्या चार वाजेपर्यंत संपादकाचे दिवसाचे काम संपे आणि पत्राच्या पहिल्या प्रती आलेल्या असत. अंक चाळून आणि आपल्या मुख्य सहसंपादकांला दुसऱ्या दिवसाच्या कामाबद्दल सूचना देऊन अय्यर कार्यालयातून निघून ट्रिप्लीकेनला पायी परतत किंवा एखाद्या जाहीर सभेस जात. कॉंग्रेसच्या कार्यात ते सक्रीय भाग घेत. त्यांचे वक्तृत्व चांगले असे.

ते स्वतः भाषाकोविद असून त्यांना दहा भाषा येत परंतु ते बहुभाषी भाषणाच्या विरुद्ध असत. तमिळमध्ये बोलत असले तर ते इंग्रजी शब्दांचा वापर करीत नसत. चर्चेमध्ये ते कम्बन् आणि कालिदास, वल्लुवन् आणि वाल्मिकी, होमर, व्हर्जिल, शेक्सपिअर आणि डान्टे यांची अवतरणे सहज देत. परंतु कम्बनूवर त्यांचे सर्वात अधिक प्रेम असे.

धार्मिक बाबतीत सर्व कर्मकांड कसोशीने पाळीत. परंतु सनातनी मानता येतील अशा तऱ्हेची त्यांची मते नव्हती. कार्यालयातील छोकऱ्याने आपली आणलेली कॉफी किंवा जेवण घेण्याचे ते विरुद्ध नसत. मात्र हे पदार्थ स्वच्छ असावे असा त्यांचा कटाक्ष असे. तूप, दोसे हे त्यांचे आवडीचे खाद्य होते. दुपारचा फराळ म्हणजे तूप- दोसे आणि गरम कॉफीचा एक पेला हा असे.

ट्रिप्लिकेनमधील अय्यर यांचे घर ज्या वस्तीत होते तेथे बरीच मुसलमान वस्ती होती. अय्यर यांचे त्यांच्याशी घरगुती संबंध असत. त्यांचा हिंदू - मुसलमान ऐक्यावर विश्वास असे. खिलाफत सभांच्या वेळी अय्यर यांना व्याख्यानासाठी अनेक आमंत्रणे येत.

कार्यालयाच्या वेळेनंतर संध्याकाळी ज्यावेळी काही सार्वजनिक कार्यक्रम नसतील त्यावेळेस अय्यर ट्रिप्लिकेनच्या समुद्रकिनाऱ्यावर जात आणि क्वीनमेरी महाविद्यालयाच्या समोरच्या वाळूत काही सहकारी व मित्रांबरोबर बसत. त्यांच्या गप्पा बहुधा राजकारणासंबंधी असत.

अय्यर जलद चालत आणि चालण्यात सर्वांना मागे टाकीत. ओल्या समुद्र

किनाऱ्यावरून चालणे त्यांना आवडे निसर्ग सौंदर्य उपभोगणे त्यांना आवडे. निसर्ग सौंदर्याचा आस्वाद घेण्यासाठी ते कधी कधी आपली मुलगी सुभद्रा आणि मुलगा कृष्णमूर्ती यांनाही आपल्या सोबत आणीत.

अय्यर यांचे अभिनय कौशल्य सामान्य दर्जाचे नव्हते. ते क्रांतिकारक असल्याने त्यांना परकीय गुप्तचरांपुढे नेहमीच काहीतरी भूमिका वठवाव्या लागत त्यामुळे अभिनयाची कला त्याना निसर्गतःच अनुकूल होती. एकदा ''देशभक्तन्'' च्या कर्मचाऱ्यांनी भोजराजाच्या जुलमावर एक नाटक करण्याचे ठरविले. अय्यर त्यांचे दिग्दर्शन करीत दुर्दैवाने नाटक रंगभूमीवर येण्यास तयार झाल्यावर देशभक्तन् पत्राची मालकी बदलली आणि अनेक कर्मचाऱ्यांना सोडून जावे लागले.

चर्चेमध्येसुद्धा अय्यर मृदुभाषी असत. त्याच्या तोंडून कधी कठोर शब्द येत नसत. एखाद्या कर्मचाऱ्याची काही चूक झाली आणि ती दुरूस्त करायची असली तर अय्यर केव्हाही रागाने किंवा त्राग्याने बोलत नसत. त्यांची भाषा नेहमीच निश्चयी आणि संशयनिवृत्ती करणारी असे. त्यामुळे कर्मचाऱ्यांचे त्यांच्यावर प्रेम असे.

''देशभक्तन्'' ची कीर्ती कितीही मोठी असली तरी सांपत्तिकदृष्ट्या ते फायदेशीर नव्हते. किंबहुना सरकार मोठ्या रकमांचे जामीन मागीत असल्याने आणि कागदाच्या वाढत्या किमतींमुळे पत्राला कर्ज होत होते. अय्यर हे पत्राला येऊन मिळल्यावर दोनच महिन्यात एम्. एस्. कामत यांना वृत्तपत्र, त्याच्या ख्याती मूल्य (गूडबिल्) आणि मुद्रणालयासह एन्. नागेश्वरराव शास्त्री ह्या कुंभकोणमच्या जमीनदारास विकावे लागले. त्याच्याकडे पत्र गहाण टाकून कामत यांनी कर्ज काढले होते. ह्या नव्या मालकांनी आपल्या तत्त्वशून्य धरसोडीमुळे आणि सरकारच्या भीतीमुळे अय्यर यांना फार त्रास दिला !

---

# संपादकीयाबद्दल तुरुंगवास

''देशभक्तन्'' च्या नव्या मालकाने जुन्या कर्मचाऱ्यांच्या सहाय्याने वृत्तपत्र काही महिने चालविले. पण फेब्रुवारी १९२१ मुद्रणालयाचे नाव बदलून ते ''कमर्शियल प्रिंटिंग अँड पब्लिशिंग कं. लिमिटेड'' ठेवावे असे त्याने सुचविले. आपले एक मित्र पी. व्ही. राजगोपालाचारी यास त्याने ''देशभक्तन्'' चे संपादक म्हणून नियुक्त केले. सरकारला लिहिलेल्या एका पत्रात मालकानी आश्वासन दिले की काहीही राजद्रोहात्मक मजकूर प्रसिद्ध केला जाणार नाही.

परंतु अय्यर यांना संपादक पदावरून काढल्याचे निश्चित कार्यालयीन ज्ञापन नव्हते. अय्यर यांनी अस्थिर परिस्थितीतही काम चालू ठेवले.

पी. व्ही. राजगोपालाचारी लवकरच आजारी पडले आणि एक नवी व्यवस्था अंमलात आणली गेली- एक संपादकीय समिती नेमून तिच्यात राजगोपालाचारी, अय्यर आणि तिसरी व्यक्ती महालिंग अय्यर यांचा समावेश झाला. अय्यर आणि इतरांचे संबंध ताणलेले होते. मालक शास्त्री यांच्या मनात अय्यर यांना रजा द्यायची होती. कारण ''सरकारचे अय्यर यांच्याबद्दल फारसे अनुकूल मत नव्हते,'' परंतु अय्यर यांना ताबडतोब जाण्यास सांगण्याचे त्यांना धैर्य नव्हते.

नव्या व्यवस्थापनाने सूत्रे हाती घेतल्यानंतर अय्यर यांचे स्थान काय हे अस्पष्ट होते म्हणून अय्यर नव्या मालकांना आग्रह करीत होते की आपल्याला संपादक म्हणून नियुक्त करावे; परंतु मालक ही गोष्ट लांबणीवर टाकीत होते. अखेर शेवटी जुलै १९२१ मध्ये अय्यर यांनी काही अटी घालून त्या पाळल्या गेल्यां, तरच आपण संपादकत्वाची जबाबदारी पाळण्यास तयार आहो असे सांगून तो कागद मालक नागेश्वर शास्त्री यांच्या यांजकडे दिला. हे होईपर्यंत राजगोलाचारी (हे आता संयुक्त मालक बनले होते.) आणि नागेश्वर शास्त्री यांच्यात मतभेद निर्माण झाले. परिणमतः राजगोपालाचार्यांनी ज्ञापन काढून अय्यर यांना नोकरीतून मुक्त केले तर नागेश्वर शास्त्रींनी त्यांना संपादक म्हणून नियुक्त केले !

दोन मालकांमधील ह्या खळखळीमुळे अय्यरनी वृत्तपत्राशी संबंध तोडण्याचे ठरविले, एक महिन्याची पूर्वसूचना दिली आणि ऑगस्ट १८, १९२१ ला नोकरी सोडली. असे केल्याचे त्यांनी त्याच दिवसाच्या अंकात जाहीरही करून टाकले.

परंतु त्यांच्यामागे आणखीही कटकटी लागणार होत्या.

मद्रासचे मुख्य प्रांतिक दंडाधिकारी पी. सी. लोबो यांनी ''देशभक्तन्'' ह्या पत्राच्या ६ मे १९२१ च्या अंकात 'रिप्रेशन्' (दडपशाही) ह्या मथळ्याखाली आलेल्या अग्रलेखामुळे भारतीय दंडविधानच्या कलम १२४ अ प्रमाणे राजद्रोहाच्या आरोपाखाली पी. व्ही. राजगोपालाचारी, व. वे. सु. अय्यर आणि डी. महालिंग अय्यर - ''देशभक्तन्'' पत्रांचे संयुक्त संपादक आणि एस्. नागेश्वर शास्त्री, पत्राचे संयुक्त मालक'' यांच्याविरुद्ध बिगरजामिनाची अधिपत्रे (नॉनबलेबल वॉरंटस्) काढली. पोलिसांनी अय्यर सोडून बाकीच्यांना अटक केली आणि त्यांना मुख्य प्रांतिक दंडाधिकाऱ्यांपुढे उभे केले. दंडाधिकाऱ्यांनी त्यांच्यापैकी दोघांना प्रतिप्रेषणाखाली (रिमांड) ताब्यात घेतले. अय्यरना ११ तासात अटक करण्यात आली.

अय्यर यांच्या अटकेची बातमी ट्रिप्लिकेनभर पसरली आणि लोकांचा एक मोठा जमाव पोलिस ठाण्यावर त्यांच्या मागोमाग महात्मा गांधी की जय ! आणि अल्लाहो अकबर ! अशा आरोळ्या मारीत गेला. पोलिसांनी त्यांना घेऊन जाण्यापूर्वी अय्यर कॉंग्रेस पुढारी याकुब हसन यांना भेटले. तसेच त्यांनी कवी सुब्रह्मण्यम भारती यांची भेट घेतली. भारती गंभीर आजारी असून जीवनाचे शेवटचे क्षण मोजीत होते. त्याच रात्री त्यांचे निधन झाले.

सप्टेंबर १२ ला खटला चालू झाला. न्यायालयामध्ये वकील आणि इतर लोक यांची गर्दी झाली होती. अरोपींनी खादीचा पोषाख केला होता आणि ते आनंदी दिसत होते. पहिले आरोपी पी. व्ही. राजगोलापाचारी ह्यांच्यावतीने एस. सत्यमुर्ती यांनी वकीलपत्र घेतले होते. दुसऱ्या आरोपींनी कोणीच वकील दिला नव्हता. डी. महालींग अय्यर आणि एस्. नागेश्वर शास्त्री या तिसऱ्या व चवथ्या आरोपींच्यावतीने टी. एस. वेंकटेश अय्यर हे उपस्थित होते. खटला सुरू झाल्यानंतर दोघेही वकिलांनी खटल्यातील आपले अंग काढून घेतले कारण त्यांच्या आरोपींनी न्यायालयाला सांगितले की, आपल्याला असहकाराच्या तत्त्वाप्रमाणे कुठलाही बचाव करावयाचा नाही.

सरकारच्यावतीने के. पी. एम्. मेनन ह्यांना सांब शिवराव आणि के. एस्. जयराम अय्यर हे सहाय्य करीत होते. खटल्याला सुरुवात करतांना मेनन यांनी सांगितले की, रिप्रेशन या शीर्षकाखाली पसिद्ध झालेले संपादकीय हे नियमांचा भंग करणारे असून त्यामधील काही भाग कमालीचे राजद्रोही आहेत. या भागात सरकारवर अप्रामाणिकपणा व भारतीयांच्या भावनांविषयीचे बेफिकीरीचे आरोप केलेले असून सरकारविरुद्ध तिरस्काराची भावना पसरविण्यास मदत केली आहे. शासनकर्त्या इंग्लिश लोकांना सैतानी हे विशेषणही दिले आहे.

संपादकीयाच्या भाषांतरावरून असे दिसले की, त्यात नवे व्हाईसरॉय लॉर्ड रीडिंग यांच्यावर टीका होती. कारण त्यांच्या प्रशासनात अनेक तऱ्हेची दडपशाही होण्याचा संभव होता. संपादकीयातील ज्या भागांवर अक्षेप घेण्यात आले होते त्यात खालील भाग (अधिकृतरित्या भाषांतरीत केल्याप्रमाणे) होता. ''या न्यायी लॉर्ड साहेबांच्या कारकीर्दीच्या पहिल्या महिन्यातच सत्ताधाऱ्यांच्या उद्धटपणाला अनियंत्रित अशी भरती येत आहे. त्यामुळे त्यांच्या कारकीर्दीला दिवसेंदिवस कोणते स्वरूप प्राप्त होईल या गोष्टीबद्दल भीती निर्माण झाली आहे. दडपशाही करता यावी, या हेतूसाठी त्यांनी लष्कराच्या तुकड्या आणि तोफखाना ६३ कोटी रुपयांचा खर्च करून तयार ठेवला आहे. जे सरकार ६३ कोटी रुपयांची रक्कम डायरसारख्या खूनी पापमूर्तीला वाचविण्यासाठी खर्च करण्यास तयार आहे- जे सरकार डायरसारख्या निरोपयोगी आणि सैतानी वंशाला माणसाला वाचविण्यासाठी खर्च करते आणि आपली स्वतःची प्रतिष्ठा हीच सर्वात महत्त्वाची आहे असे मानून देशाचे कितीही अहित झाले तरी त्याकडे दुर्लक्ष करतील. जे सरकार अशा एका मनस्थितीत आहे की एका डायरला वाचविण्यासाठी भारत गेला तरी चालेल- असे सरकार कोणती गोष्ट करण्यास धजणार नाही दडपशाहीच्या नृत्याची ही केवळ सुरुवात दिसते. हे या ठिकाणी म्हणण्याचे काही कारण दिसत नाही. . . .''

ज्या डायरचा या ठिकाणी उल्लेख केला तो म्हणजे जालियनवाला बाग प्रकरणातील तिरस्करणीय खलपुरुष डायर.

सरकारचा तमिळ भाषांतरकार सारावन मुदलियार ह्याने संपादकीयाचे स्वतः केलेले व अक्षेपार्ह मानले गेलेले उतारेच केवळ दिले नाही तर इतर संपादकीयातून सुद्धा लहान लहान उतारे स्पष्ट पुराव्यादाखल पुढे मांडले. रिप्रेशन हे संपादकीय केवळ तुरळक आलेला भाग नसून वृत्तपत्राचा एकूण कलच आक्षेपार्ह होता. हे दाखविण्याचा यामध्ये सरकारचा हेतू होता. पुराव्यादाखल मांडलेले काही नमुने - १५ एप्रिल १९२१ या संपादकीयतून :

**श्रीरामनवमी :** दुष्काळ आणि रोगराई यांनी देशात थैमान मांडले असून लोकांची योग्य आणि अयोग्य यात विवेक करण्याची क्षमता नाहीशी झाली आहे. स्वातंत्र्य आणि सत्यवचन यांनी सरकारचे माथे फिरते अशा या परिस्थितीत भारतमाता आपल्या प्रिय दैवताला आव्हान करीत आहे. कदाचित जगत्जननी आपल्या संततीच्या हाकेची वाट पहात आहे म्हणून या दिवशी आपण राक्षसांचा संहार करणाऱ्या भगवान श्रीरामाची पूजा करू या आणि त्याची प्रार्थना करून त्याला विनवू या की, त्याने पृथ्वीवर अवतार घ्यावा आणि पापाचा नाश करून न्यायाची प्रतिष्ठापना करावी.''

१७ सप्टेंबरला खटला पुढे चालू झाल्यावर अय्यर सोडून बाकीच्या तीन आरोपींनी १२ तारखेस मोठी वीरवृत्ती दाखवून आपण असहकाराच्या तत्त्वाशी सुसंगतपणे वागून स्वतःचा बचाव करणार नाही अशी वल्गना केली होती. पण प्रत्यक्षात आपण खरोखर पेंढा भरलेली दिखाऊ माणसे आहोत असे सिद्ध केले. त्यांचे वकील व्ही. एन. शामराव यांनी

त्यांच्यावतीने असे निवेदन सादर केले की, या तिन्हीही व्यक्ती त्यांनी जर काही नियमभंग केला असेल, तर मनापासून खेद व्यक्त करीत आहोत व ''रिप्रेशन'' हे संपादकीय लिहून सरकारचा काही अपराध केला असेल तर प्रामाणिकपणे माफी मागत आहोत यापुढे अशा तऱ्हेचा गुन्हा आपण केव्हाही करणार नाही अशीही ते हमी देत आहेत.''

सरकारी वकिलांनी जाहीर केले की सरकारने ह्या माफीचा स्वीकार केला असून आरोपींवरील खटला मागे घेण्याची आज्ञा दिली आहे. दंडाधिकाऱ्यांनी तिन्ही आरेपींची सुटका केली.

आता केवळ व्ही. व्ही. एस्. अय्यर ह्यांच्या विरुद्धचा खटला चालवायचा राहिला होता.

फिर्यादींचा पुरावा संपल्यानंतर अय्यर ह्यांनी न्यायालयापुढे एक निवेदन केले. त्यात त्यांनी आपण ''देशभक्तन्'' च्या कार्यालयात कोणत्या परिस्थितीत काम करीत होतो, हे सांगून कोणत्या परिस्थितीत आपण त्या पत्राशी आपले संबंध सोडले हे स्पष्ट केले. ६ मे च्या नियमांचा भंग करणाऱ्या संपादकीयाबद्दल आपण ते लिहिलेले नाही असा त्यांनी गौप्यस्फोट केला. त्यावेळेस ते रामनाद जिल्ह्यात व्याख्यान दौऱ्यावर गेले होते. त्यांनी मद्रास एक मेला सोडले आणि ते नऊ मेला परत आले. १ ते ९ मे पर्यंत त्यांनी पत्रात काहीही लिहिले नाही.

परंतु अय्यर ह्यांनी संबंधित संपादकीय आक्षेपार्ह आहे हे मानण्याचे नाकारले. त्यांनी म्हटले : ''संबंधित संपादकीय मी नंतर वाचले आणि मला असे वाटले की त्याच्या लेखकावर भारतीय दंडविधानाच्या १२४ अ कलमाखाली अगर दुसऱ्या कोठल्याही कलमाखाली आरोप ठेवण्याजोगे त्यात काहीही नाही.''

आपण निरपराध आहोत असे सांगून अय्यर पुढे म्हणतात, '' वरील सर्व वाचून न्यायालयाला जर मी अपराधी आहे असे वाटत असेल तर मी न्यायालय देईल ती शिक्षा आनंदाने भोगण्यास तयार आहे.''

सरकारी वकिलांनी सांगितले की अय्यर हे त्या संपादकीयाचे लेखक नाहीत हे आपण जरी मान्य केले, तरी त्यामुळे अय्यर ह्यांची संपादकीय जबाबदारी टळते असे नाही. संपादकीय आक्षेपार्ह असून त्याबद्दल अय्यर ह्यांची कायदेशीर जबाबदारी आहे.

१९ सप्टेंबर १९२१ ला खटल्याचा निकाल देण्यात आला. प्रमुख प्रांतीय दंडाधिकाऱ्यांनी अय्यर ह्यांना नऊ महिन्यांच्या साध्या कैदेची शिक्षा दिली. त्या दिवसाचा ''हिंदू'' चा अहवाल म्हणतो, ''न्यायालयात गर्दी झाली होती. श्री. व. वे. सु. अय्यर ह्यांची मुलगी, मुलगा आणि पत्नी न्यायालयात उपस्थित होते. निकाल दिला गेल्यानंतर आणि नऊ महिन्यांची साधी कैद जाहीर झाल्यानंतर श्री. अय्यर ह्यांना न्यायालया बाहेर नेण्यात आले. पोलिसांच्या कोठडीजवळ सौ. अय्यर आणि अनेक हिन्दू आणि मुसलमान मित्रांनी (खिलाफत आणि कॉंग्रेस कार्यकर्त्यांनी) अय्यर ह्यांना हार घातला. आपले पती

देशाच्या हितासाठी उदात्त सेवा करून तुरुंगात जात आहेत ह्याबद्दल सौ. अय्यर ह्यांनी आनंद व्यक्त केला. त्यांच्या कन्येने त्यांना साष्टांग नमस्कार घातला आणि त्यांच्या तुरुंगवासामुळे स्वराज्याचे ध्येय जवळ येत आहे असे उद्‌गार काढले. 'महात्माजी की जय' ह्या जयघोषात पोलिसांनी एका मोटार गाडीतून अय्यर ह्यांना नेले.

ज्या खऱ्या अपराध्याने ते संपादकीय लिहिले होते त्याने माफी मागून आपली सुटका करून घेतली, परंतु अय्यर यांचा त्याच्याशी काहीही संबंध नव्हता; केवळ त्याच्याबद्दलची संपादक म्हणून संयुक्त कायदेशीर जबाबदारी होती. त्यांनी मात्र ते लिखाण आक्षेपार्ह आहे हे मान्य करण्याचे नाकारले आणि क्षमायाचनाही केली नाही. इतरांची सुटका झाली पण अय्यर मात्र तुरुंगात पाठवले गेले. खटला जरी एका संपादकीयाबद्दल होता तरी सरकारचा हेतू ''देशभक्तन्'' चे सरकारवरील विषारी हल्ले बंद करणे हा होता हे उघड आहे. अय्यर यांनी आपण न लिहिलेल्या संपादकीयाबद्दल माफी न मागणे ही गोष्ट सरकारला फार उपयोगी पडली.

अय्यरना प्रथम मद्रास येथील तुरुंगात नेण्यात आले परंतु पुढे त्यांची बेल्लारी मध्यवर्ती तुरुंगात बदली करण्यात आली.

अय्यर यांच्या तुरुंगवासामुळे तमिळ वाङ्मयाचा फायदा झाला. ह्या तुरुंगवासात त्यांना अनेक दिवसांपासूनची आपली एक इच्छा फलद्रूप करता आली. कंबन् यांच्या तमिळ रामायणाचा इंग्रजीमध्ये त्यांना एक अभ्यास लिहिता आला आणि त्यात कंबन् यांच्या अनेक काव्यपंक्तींचे इंग्रजी भाषांतर समाविष्ट करता आले.

कंबन हा तमिळमधील सर्वात श्रेष्ठ महाकवी. त्याला कवी चक्रवर्ती असे म्हणून त्याचा मोठेपणा मान्य केला आहे. त्याचे रामायण वाल्मिकींच्या मूळ कथेवरून रचले असले तरी त्यात आणि वाल्मिकी रामायणात काही काही ठिकाणी तपशीलाचे फरक आहेत. त्यात आढळणारी वाग्भूषणे कंबन् यांची स्वतःची आहेत. तरुणपणापासूनच कंबन्च्या कृतींचे अय्यर यांना मोठे आकर्षण असे. लंडनला आल्यानंतर पहिल्याच महिन्यात त्यांच्या लंडनच्या नोंदवहीत कंबन्च्या काही श्लोकांचे भाषान्तर दिसते. १९१० मध्ये त्यांना अटक टाळण्यासाठी लंडन येथील हॉटेल घाईघाईने सोडावे लागले तेव्हा त्यांनी आपल्या कपड्यांच्या लहानशा पेटीत ज्या वस्तू आठवणीने घेतल्या त्यात कम्बन्च्या रामायणाचा संपूर्ण संच घेण्यास ते विसरले नाहीत. हे सर्वग्रंथ त्यांनी पाँडिचेरी पर्यंत विविध वेषान्तरे करून प्रवास करीत असता आपल्या बरोबर नेले.

बेल्लारी तुरुंगात काही महिने शिक्षा भोगीत असता त्यांनी आपले काशीचे मित्र बी. आदिमूर्ती यांना एक पत्र लिहिले. त्यावरून ते कम्बन्च्या रामायणाचा सखोल अभ्यास करण्यात गढले होते असे दिसते. ह्या पत्रात अय्यरनी म्हटले आहे की आपले पहिले तीन महिने वाङ्मयीन उद्योगात गेले आणि पुस्तकाचा शंभर एक पाने मजकूर तयार झाला. परंतु आता आपल्याला वाल्मिकी रामायणाचे ग्रिफिथ यांचे तुळशी रामायणाचे आणि लोकमान्य

टिळकांच्या 'गीतारहस्याचे' इंग्रजी भाषान्तर हवे आहे. आदिमूर्ती आपल्याला ही पुस्तके कृपया पाठवू शकतील काय ?

आदिमूर्तींनी त्यांना ही पुस्तके पाठवली. रामायणाच्या इतर भारतीय भाषात उपलब्ध असलेल्या आवृत्तीही अय्यर यांनी पाहिल्या. तेलगूमधील भास्कर रामायणाशी त्यांनी परिचय करून घेतला आणि त्यातून टिपणेही करून घेतली.

अय्यर यांचे आपल्या कामात सातत्य असे आणि ते त्याबद्दल अतिसावध असत. त्यांची रोजची साहित्यनिर्मिती विपुल असे. त्यांचे एक चरित्रकार म्हणतात, " अय्यर यांच्या हस्तालिखिताच्या कच्च्या खर्ड्यात एक पुसट झालेले वर्तमानपत्रातील कात्रण सापडले. त्यात प्रसिद्ध लेखकांची रोजची किंवा आठवड्याची निमिर्ती दिली होती. डॉ. जॉन्सन् यांनी 'टार्सलस' लिहिताना आठवड्यात २०,००० हून जास्त शब्द मार्कट्वेन दररोज ४,००० शब्द लिहित असे, स्टीव्हन्सन्, गाय द मोपासा, बालझॅक आणि 'इन्विंटर कम्स' लिहून प्रसिद्धीला आलेला हार्चन्सन्, ऑपनहाइम आणि वेल्स यांनी अय्यर यांना स्फूर्ति दिली. त्यांच्या हस्तलिखितात दररोज किती शब्द लिहिले यांची नोंद आढळते. नऊ महिन्याच्या तुरुंगवासात तुरुंगाची अपरिवर्तनीय शिस्त सांभाळून अय्यर आपल्या कामात वर दिलेल्या थोर लेखकांच्या फार मोग पडत नाहीत. त्यांनी १,४०,००० शब्द लिहिले आणि त्यापैकी एक तृतियांश पद्यात होते.

---

# कम्बरामायणम् - एक अभ्यास

''कम्बरामाणम् - एक अभ्यास'' ही अय्यर यांची सर्वोत्कृष्ट साहित्यकृती मानली जाते. ही वाङमयनिमिर्ती प्रकृतीधर्माने आव्हानात्मक आहे. ग्रंथाच्या पहिल्या वाक्यातच आव्हान देण्यात आलेले आहे.

एक तमिळ कवी साहित्यातील मोठ्यात मोठ्यांच्या बरोबरीने बसण्याच्या योग्यतेचा आहे परंतु साहित्यिक जगाला त्याची माहितीही नाही, ह्या गोष्टींची आता इतक्या उशिरा साहित्यिक जगाची खात्री पटवणे सोपे नाही. परंतु कम्बन् यांच्या रामयणाच्या रूपाने जगाला अशा एक महाकाव्याचा लाभ झाला आहे की जे तुलनेने केवळ 'इलियड' किंवा 'ईनिड' आणि पॅराडाइझ् लॉस्ट' यांच्याच नाही तर त्याचे मूळ असलेल्या वाल्मिकी रायायणालाही आव्हान देत आहे. ही भाषा केवळ देशभक्तीपर उत्साहाची नाही. अनेक वर्षांच्या सखोल आणि काळजीपूर्वक अभ्यासाने हे मत तयार झाले आहे. माझी अशी आशा आहे की कोणाही निःपक्षपाती वाचकाची ह्या लेखाच्या वाचनाने अशी खात्री पटेल की माझे म्हणणे सत्य आहे आणि ह्या ग्रंथाच्या पानांतून जे दिव्यत्व व्यक्त झाले आहे त्यापेक्षाही आपल्याला ह्या कवीबद्दल अधिक माहिती मिळावी अशी त्याला इच्छा होईल.''

ह्यापुढेही असे म्हटले आहे, ''कंबन्'' ह्यांच्या रामायणाचे मूळ वाल्मिकीच्या कृतीत आहे असे मी म्हणालो. परंतु कम्बन् ह्यांनी वाल्मिकीचे केवळ भाषांतर केलेले नाही. त्या आर्य ऋषीने अजरामर केलेली केवळ गोष्टच त्याने घेतली आणि तिचा सर्व तपशील हुबेहूब घेतला असला, तरी त्याने एक संपूर्ण स्वतंत्र काव्य लिहिले आहे. पापच्या इलियडबद्दल बेंटली ह्याने म्हटले की हे काव्य सुंदर आहे. पण ते होमरचे आहे असे तुम्ही म्हणू नका. कंबन् ह्यांचा रामायणाबद्दल वरील वाक्याची थोडी उलटापालट करून आपल्याला म्हणता येईल की हे वाल्मिकीचे रामायण नाही; परंतु ते अधिक उत्तम काव्य आहे.

एखाद्या प्रांसगिक भाषणात किंवा लेखात अशा तऱ्हेची निश्चित विधाने करणे सोपे आहे. पण अय्यर ह्यांनी मात्र ही विधाने एका गंभीर ग्रंथामध्ये केली असून त्यांचा हेतू आपण जे म्हणत आहोत त्याबद्दल पुराव्यानिशी त्याची सत्यता पटविणे हा होता. काव्याच्या निरुपणाबद्दल ते काही वाङमयीन सिद्धान्त सांगतात. कथेचा बांधा आणि रचना ह्याबद्दलही ते काही सिद्धान्त मांडतात. महाकाव्यातील अतिमानवी घटकांचे स्थान आणि कथेतील निरनिराळ्या पात्रांचे स्वभाव दर्शन ह्यावरही ते भाष्य करतात. त्यांनी आपल्या चर्चेची कक्षा विशाल ठेवली आहे. ग्रीक आणि इंग्रजी ग्रंथकारांचा त्याचप्रमाणे संस्कृत आणि तमिळमधील थोर साहित्यिकांचा आधार ते घेतात. कोणतेही विधान केले तरी त्याला पुष्टी देण्यासाठी ते जागतिक वाङमयाचा पुरावा देतात. इतर महाकाव्यातील स्वभाव चित्रांचा तौलनिक अभ्यास करून कम्बन् त्यांपेक्षा कसे अधिक श्रेष्ठ आहेत हेही ते दाखवितात. कम्बन् ह्यांच्या रामायणातील सुमारे चार हजार श्लोकांचे त्यांनी इंग्रजीत बहुशः इंग्रजी पद्यात - रूपान्तर केले आहे. कंबन् ह्यांच्या रामायणाचा एक तृतियांश भाग भाषांतरीत करणे हेच एक संस्मरणीय कार्य आहे. ह्याशिवाय त्यांची तौलनिक गुणवत्ता सिद्ध करण्यासाठी त्यांनी जे प्रतिपादन केले आहे ते वेगळेच. अय्यर ह्यांची विशाल पांडित्यपूर्ण बहुभाषी विद्या आणि त्यांचा अभ्यास ग्रंथाच्या पानापानावर उत्कृष्टपणे दिसतो. वाङमयीन सिद्धान्तांसाठी त्यांनी ज्या महान साहित्यिकांची अवतरणे घेतली आहेत त्यात ॲरिस्टॉटल, होरेस, मिल्टन, बुआलो, वाल्मिकी, दंडी, शॅटूब्रियाँ आणि व्हर्जिल ह्यांचा समावेश आहे आणि ज्यांच्याशी त्यांनी कम्बनूच्या रामायणाची तुलना केली आहे त्यात वाल्मिकी, तुळशीदास आणि तेलुगू कवी भास्कर ह्यांच्या रामायणांचा तसेच होमर, व्हर्जिल व मिल्टन ह्यांच्या कृतींचा समावेश आहे.

काव्याचे निरुपण कालानुक्रमाने असावे की त्यामध्ये पाश्चात्यांनी सांगितलेली नाट्यपूर्ण अशा घटनाक्रमाच्या मध्यावर आरंभ करण्याची पद्धत अनुसरावी ? अय्यर ह्या संबंधी चर्चा करतांना म्हणतात, रामायणामध्ये नायकाच्या जन्मापासून आणि बाल्यावस्थेपासून त्याच्या विषय सूत्रात अनुस्यूत असलेल्या सर्व कृतींच्या अंतापर्यंत जीवनसदृश नैसर्गिक क्रम अनुसरला आहे. ह्या उलट युरोपमधील महाकाव्यात इलियडचे उदाहरण अनुसरून कथेचा आरंभ शक्य तितक्या तिच्या अंतापासून केलेला असतो असे दिसते. त्या आधीचे प्रसंग त्यांचा थोडाथोडा संदर्भ देऊन आणि उपाख्यानांचे निरुपण करून वर्णिलेले दिसतात. भारतीय महाकाव्यांपेक्षा ह्या महाकाव्यांच्या पद्धतीत काही फायदे आहेत हे स्पष्ट आहे. त्यांच्या नाट्यात्मक सुरुवातीने वाचकाची कल्पनाशक्ती काव्याच्या अगदी सुरवातीसच वेधली जाते. भारतीय महाकाव्यांच्या बाबतीत मात्र आधुनिक वाचकाचे लक्ष वेधण्यासाठी निरुपणाला गती यावी लागते. परंतु आपल्याकडील थोर महाकवींनी असे सिद्ध केले आहे की कथेने जरी कालानुक्रम पाळला तरी पुढील पिढ्यांना त्याचा लवकर विसर पडणार नाही असे काव्य लिहिता येते. पाश्चिमात्य आणि

पौर्वात्य काव्यशास्त्रातील अवतरणे ह्यापुढे दिली आहेत आणि दोन निरनिराळ्या पद्धतीच्या आरंभांबद्दल आणि त्यांच्या फायद्या - तोट्याबद्दल काही प्रमाणात प्रदीर्घ अशी चर्चा केलेली आहे.

ह्यानंतर काव्याच्या रूपाविषयी म्हणजेच त्याची बांधणी व रचना ह्यासंबंधी विचार केलेला आढळतो. ह्याबद्दल अय्यर म्हणतात, ''कंबन् ह्यांच्या रामायणाची बांधणी व रचना उत्कृष्ट आहे. काव्य आपल्या विविधतेने आणि त्याच्या विभागांच्या प्रमाण बद्धतेने आणि हे निरनिराळे विभाग एका सेंद्रीय एकतेकडे कसे जातात ह्या दृष्टीने मनाला अत्यंत समाधान देतात. ज्या ठिकाणी कंबन् वाल्मिकीचे अनुकरण करतात किंवा जेथे त्यापासून दूर जातात त्या दोन्ही ठिकाणी त्यांनी स्वतःचा श्रेष्ठ स्वभावगुण दाखविला आहे.

कंबन् ह्यांनी ज्या पद्धतीने कथा हाताळली आहे. त्याबद्दल अय्यर म्हणतात, ''आता हे जे कथानक आहे ते त्याच्या सर्व विभागांमध्ये वाल्मिकींचे अनुकरणे करते. परंतु वाल्मिकींकडून घटना घेऊन ते स्वतःच्या पद्धतीने हाताळतात. ज्या पद्धतीने घटनांचा विकास केला जातो किंवा प्रत्येक घटनेचा उच्चबिंदू ज्या पर्यायाने साधला जातो, घटनांच्या बाबतीत ज्या कौशल्याने प्रत्येक घटनेच्या क्षमतेचा विचार केला जातो त्या सर्वांमध्ये आपल्याला एका थोर कलावंताचा प्रत्यय येतो. वाल्मिकींच्या अभ्यासकाला कंबन् यांच्या कथानकातील प्रत्येक अवयवाचा आधीच परिचय असतो. परंतु कंबन् ह्यांचे सर्व काव्य वाचल्यावर त्याला असे उद्‌गार काढावेसे वाटतात की ही वास्तू उभारताना तोच नकाशा वापरला आहे ह्या शंका नाही. निर्मितीसाठी उपयोगात आणलेले घटकसाहित्यही तेच आहेत परंतु तरीही त्यात स्वतःचेही असे एक वैशिष्ट्य आहे.

स्वभावदर्शन हा दुसरा एक मुद्दा असा आहे की त्यातही कम्बन् यांनी मात केली आहे असे अय्यर म्हणतात. स्वभावदर्शनाच्या बाबतीत ते लिहितात कम्बन् यांची जगातील सर्वश्रेष्ठ कवींशी बरोबरी होते. स्वभावचित्रांच्या रेषा ठळकपणे आणि परिपूर्णतेने रेखाटल्या आहेत. इतक्या की काही वेळेस एखादे वाक्य किंवा कधीकधी एखादा वाक्यांशसुद्धा कोण विशिष्ट व्यक्ती बोलते आहे हे निसंशयपणे सांगता येते.

''येथेसुद्धा रामायणातील व्यक्तिरेखांवर वाल्मिकींनी आपला ठसा उमटविला आहे. परंतु कम्बन् यांनी हाताळल्यावर त्या अधिकच उत्तम दिसू लागतात. वाल्मिकींच्या वाचकाला प्रश्न पडेल की राम आणि भरत, रावण आणि कुंभकर्ण, वाली आणि हनुमान, सीता आणि कौसल्या आणि इतर पात्रात सुधारणा करणे कसे शक्य आहे ? परंतु कम्बन् यांचे नायक आणि नायिका वाल्मिकींच्या नायक नायिकांपेक्षा निश्चितच अधिकवरच्या दर्जाच्या आहेत.''

ही विधाने इतर विख्यात अभ्यासकांकडून आव्हानाविना जाऊ शकतील हे अशक्य होते. अय्यर यांना हे माहीत नव्हते असे नाही. म्हणून त्यांनी कम्बन्च्या रामायणाच्या एक तृतियांश भागाचे भाषांतर केले; हेतु हा की वाचकाला ह्याबाबतीत स्वतःचा निर्णय घेता

यावा. अय्यर हे स्वतः स्वतःच्या भाषेबद्दल आणि स्वतःच्या भाषेतील काव्याच्या नायकाबद्दल बढाई मारणारे उग्र देशाभिमानी नव्हते. त्यांना गर्दीला आवाहन करायचे नव्हते. त्यांना रस होता तो वरच्या दर्जाच्या वाङमय चर्चेत. ते ताबडतोब दुसऱ्याची खात्री पटवू शकले की नाही कोणजाणे; परंतु कम्बन् यांनी वाङ्मय क्षेत्रात जे मिळवले त्याबद्दल जे केवळ व्यक्तिगत पक्षपातीपणाच्या पलीकडे पाहू शकतात अशा अभ्यासकांमध्ये चर्चा व्हावी हा त्यांचा हेतू होता.

''कम्ब रामायाणम्- एक अभ्यास'' हा ग्रंथ १९५० मध्ये, अय्यर यांच्या निधनाला पाव शतक लोटल्यावर निधानोत्तर प्रकाशित झाला. प्रकाशनानंतर अठ्ठावीस वर्षात निरनिराळ्या प्रवृत्तींच्या अभ्यासकांनी त्याबद्दल आदर व्यक्त केला आहे. आज तमिळ विषयावरील उत्कृष्ट वाङमयीन टीकेचा नमुना म्हणून त्याला मान्यता मिळाली आहे.

काव्याचे भाषान्तर ही अवघड कला आहे. काव्याचे दुसऱ्या भाषेत पद्यमय रूपांतर करणे हे त्यापेक्षाही अवघड आहे. अय्यर यांनी याबाबतीत उल्लेखनीय यश मिळविले आहे. काव्याचा नायक राम ह्या व्यक्तिरेखेच्या लिखाणात प्रीतीची मृदुता यथातथ्य पद्धतीने प्रकट झालेली दिसते, अन्यायाविरुद्ध त्याच्या क्रोधाचा परिस्फोट, लक्ष्मणाच्या पतनानंतर त्याचा करुणविलाप आणि इतर अनेक अवस्थातून हे स्पष्ट दिसते. कम्बन् यांच्या स्वभावदर्शनाचा परिणाम अय्यर यांच्या भाषान्तरात स्पष्टपणे जाणवतो.

हे रामाने केलेले सीतेचे वर्णन. हनुमान तिच्या शोधाला निघत असतांना रामाने दिलेल्या ह्या अंतिम सूचना :

कमळाच्याही क्षीण पाकळ्या  
चंद्रावरती डाग,  
सदोषत्व हा आकाराचा अपरिहार्य भाग !  
असे कोणचे अपूर्णत्व पण  
तिच्या सुस्वरूपी नाही.  
वीणा, कोकिळ, पोपट आणिक बालांची बालिश भाषा  
ह्या साऱ्यांची तिच्या कंठरवी ब्रह्माने घडविली एकता.  
परंतु निर्मिति तिच्या स्वरांची, उच्चारांची  
ब्रह्मालाही जमली नाही, कालमात्रही जमणे नाही !  
अमृताच्या आस्वादाला स्वर्ग, भूवरी  
तुलना नाही. तिच्या ध्वनीच्या मधुरतेला  
मिळेल कधी का उपमा काही ?  
अमृत आणि मधुची मधुरता  
तोषविते का श्रवणइंद्रिया ?

इथे सीतेला सुवर्णमृगाची अभिलाषा उत्पन्न झाली. लक्ष्मण म्हणतो की आपण

सुवर्णमृग स्वतः आणलेला बरा. सीतेला ह्याचा राग येतो. तिला वाटते. हा आपल्या पतीच्या पराक्रमाचा अवमान झाला. ती रामाला म्हणते :

स्वर्गीय रसनिर्माते माणिकसम ओष्ठद्वयते
मुरूडुनी मधुरध्वनि शुकासम अस्फुट ती वदते
'मजसाठी पकडून तयाला आणित का नाही ?
वाहत अश्रूंचे ओघळ गालांवरूनी दूर.

दुःख तियेचे पाहणे रामास सहन जाहले नाही, वदे ''मम सुवर्णसुंदर, पाशबद्ध करुनी आणिन त्याला तुझिया पुढती निमिषार्धात पहा.''

क्रोधायमान रामाचे हे चित्रण पहा : जटायूकडून त्याने ऐकिले की रावणानेच सीतेला पळवून नेले :

उच्चारताच शब्द हे रक्तवर्ण जाहले
नेत्र रामाचे श्वासातून वादळ वाहू लागले
झाकोळले पौरुषयुक्त विशाल क्रोधाने. तारामंडल
भयाकूळ झाले, उल्लंघन कक्षेचे ताऱ्यांनी केले
क्रोधाग्नीच्या स्फोट भयाने त्रिभुवन अंग चोरुनी बसले
विनाश सूचक हास्य करीत वदे तो पक्षालागी
''बघ आपुल्या अचल आसांवर फिरणारे हे जग
आणि दृश्य बघत देव अविचल बसले
डोळ्यांदेखत असुराने हरण अबलेचे जै केले.
तू संरक्षणार्थ तियेच्या पडलास होऊनी विद्ध.
त्या सर्वांना एकजात मी धुळीस मिळवीन
निखळून सारे तारे कोसळतील, सूर्याच्या ठिकऱ्या होतील
आकाशाची पोकळी जळत्या विश्वासाच्या दीप्तीत
धगधगताना दिसेल, आपतेज वायू
सर्व सजिव सृष्टी नष्ट होऊन अणुगर्भ मात्र राहील.
ठरेल अंत स्वर्गातील देवांचा मम क्रोध
हे परिभ्रमणारे विश्व आणि त्यापलिकडील सारे
प्रवाहातील बुद्बुदासम फुटूनी नष्ट होईल !

सर्व शक्ती एकवटून इंद्रजित महेश्वर अस्त्राचा वापर लक्ष्मणाविरुद्ध करतो. त्यावेळेस इंद्रजित व लक्ष्मण यांच्या युद्धाचे चित्रण :

विश्वग्रासी अग्नी आता उसळत धगधगला
कटिस्थानातून त्याचा, प्रलयंकारी वारा अंतीम क्षणाच्या
सजीव सृष्टीच्या घोंगावू लागला

निर्माण झाले उदरात तयाच्या सप्तसिंधु पलिकडचे वारी
अवकाशातील अंधःकारे आकश काळोखुनी गेले
गर्भगळीत देव ऋषी भयाकूल वनप्रदेश सोडूनी गेले
वानरसेना निराशेने भोवळ येउनि पडली
चंद्रसूर्य आणि पृथ्वीने भीतीने कक्षा बदलली.
थरकाप जाहला बिभीषणाचा दृश्य हो बघुनी
पवित्र उच्चार रामनामाचा मुखाने तयाने केला
परंतु सिंह हृदयी लक्ष्मण नुसताच हसला ।।

परंतु लक्ष्मण इंद्रजिताच्या ब्रह्मास्त्राला बळी पडतो. तो मुर्च्छित अवस्थेत असतांना रामाने केलेला विलाप :

मरण मला आले नाही ऐकिली जै मी तातांची निधनवार्ता
राज्य तयांनी देऊनि टाकिले तरी मज शोक जाहला नाही
तुझ्या प्रीतीने शिकविले मज दुःख विसराया
तव मरणोत्तर काय मोल जीवाचे माझिया ?
आलो, आलो बंधो तुझ्या मागुती आता.
होतास का तू बंधू केवळ माझा ? होतास तू
पिता पुत्र माता आणि आशिर्वाद सकळांचा
गेलास तू आता, गेलास निरोप घेतल्याविना
अहह ! निष्ठूर होऊनि मृतदेह तुजा पाहतो
आणि दुःखाचा करुनि बहाणा जगणे सहन करतो
पाषाणाचे हृदय माझे जे द्रवते कधी नाही
तुझा वियोग असूनही मी चिटकून जिविता राही

''हिरण्य कश्यपूचे उपकथानक ही रामायणकथेला कम्बन् यांनी जोडलेली पुष्टी आहे. अशा तऱ्हेच्या फारच थोड्या पुष्टी त्यांनी जोडल्या आहे,'' असे अय्यर म्हणतात. ही नरसिंह अवताराची कथा बिभिषणाने रावणाच्या दरबारात सांगितली असून तीत विष्णूने रावणापेक्षा अधिक शक्तीशाली राक्षसाचा संहार केला असा त्याला इशारा दिला आहे.

वालीचा प्रसंगदेखील कंबनूनी वाल्मिकीपेक्षा अधिक परिणामकारक पद्धतीने वर्णन केला आहे असे अय्यर म्हणतात. वालीला खाली पाडल्यानतंर वाली व राम यांच्यात जो संवाद होतो तो दुर्दैवाने जागेच्या अभावी देता येत नाही.

लंकेमध्ये सीता न सापडल्यामुळे हनुमानाला जे दुःख झाले ते कंबन् यांनी पुढील प्रमाणे चित्रित केले आहे :

अहह, मणिरत्नमयी ती येथ कुठे नाही
या महादुर्गामाजी तयाने तियेचा वध तर केला नाही ?

कारण ती वश होऊन सौंदर्य अर्पी न तयाला ?
की ठेवी तो निर्घुण बंदीत तियेला
अन्य जगती कोठे ? मजकळेना विचार कोणता करावा ?

सीता त्याला आशा तऱ्हेने सापडते :

येथे कृष्णवर्णी राक्षसांच्या मध्यभागी
विद्युल्लतेच्या द्युतिसमान ती
वक्षांवर चमचमते नीलनभाच्या
की सूर्यफूल प्रफुल्लित स्मित करिते वक्षी
कौस्तुभमण्या परी विराजमान जे रामाच्या वक्षी

कम्बन्नी सीतेचे चित्रण केले आहे. त्या स्वभावचरित्राच्या अभ्यासाने आपला ग्रंथ पुरा करण्याची अय्यर यांची मनिषा होती परंतु तो दुर्दैवाने बेल्लरी तुरुंगात असता त्यांना तो पुरा करता आला नाही. पुढे अय्यर जरी चार वर्षे जगले तरी त्यांना पुन्हा हे काम हाती घेऊन पुरे करता आले नाही. परिणामतः पुस्तक अपूर्ण राहिले आणि ते प्रकाशितही झाले नाही. अय्यर यांच्या एका चहात्याने ते केवळ योगायोगाने पुरे केले आणि १९५० साली ते प्रसिद्ध झाले.

''तमिळ कवींचे सम्राट'' कम्बन् यांची तमिळ प्रदेशाबाहेर आज अय्यर यांच्या काळापेक्षा अधिक माहिती आहे. त्यांच्या रामायणाचे अंशतः भाषान्तर भारताचे थोर सुपुत्र श्री. राजगोपलाचारी यांनी केले असून ते युनेस्कोच्या वतीने प्रसिद्ध झाले आहे. परंतु अय्यर यांनी बऱ्याच मोठ्या प्रमाणात भाषान्तर केले. त्याचप्रमाणे त्यांनी कम्बन यांच्या कृतीचा चांगला अभ्यास करून तिची तुलना वाल्मिकीच्या आणि जगातील श्रेष्ठ काव्यकृतींशी केला. या वैशिट्यांनी अय्यर यांचा ग्रंथ आजही आपले स्थान राखून आहे.

---

# तमिळ गुरुकुलम्

बेल्लारी तुरुंगातून बाहेर आल्याबरोबर अय्यरंना त्यांची पत्नी व मुले भेटली. ती जवळच्याच तुंगभद्रा नदीच्या काठी असलेल्या स्वामी तारकनाथ यांच्या तुंगभद्रा आश्रमात राहात होती. अय्यर कुटुंब हम्पी आणि विजयनगर येथील देखावे पहाण्यासाठी दौऱ्यावर गेले. अय्यर यांना ललीत कला अतिशय प्रिय असत त्यामुळे मध्ययुगीन भारताच्या कलात्मक सौंदर्याचे मोठे आकर्षण होते. ह्या दोन्ही शहरात हे मध्ययुगीन कला वैभव अद्यापही पाहाता येई.

या भेटीनंतर अय्यर तिरुचीला गेले आणि तेथे वराहनेरी येथील आपल्या वडिलोपार्जित घरात राहिले. ते कॉंग्रेसच्या कार्यक्रमात भाग घेत आणि लवकरच ते तिरुची जिल्हा कॉंग्रेस समितीच्या कार्यकारिणीचे सभासद झाले.

तुरुंगामध्ये जाण्यापूर्वीच त्यांनी ''देशभक्तन्'' चा राजीनामा दिला होता म्हणून आता त्यांना नोकरी नव्हती. काशी येथे त्यांनी ज्या दोन शपथा घेतल्या होत्या. त्यापैकी एक म्हणजे आपण आपली मातृभाषा तमिळ हिच्या उद्धारार्थ झटू, ही शपथ त्यांनी काही अंशी पुरी करण्याचा प्रयत्न केला होतो. ''देशभक्तन्'' मधील त्यांचे काम आणि कंबन यांच्या रामायणावरील त्यांचा ग्रंथ या दोन्हीमध्ये काही अंशी त्यांनी आपले उद्दिष्ट पुरे करण्याचा प्रयत्न केला होता. परंतु त्यांना आता एक दर्जेदार तमिळ मासिक स्थापन करून तमिळ भाषेची अभिवृद्धी करण्याची तळमळ लागली होती. परंतु हे उद्दिष्ट साध्य करण्याआधी त्यांना आपली दुसरी शपथ पुरी करावयाची होती. ती म्हणजे राष्ट्रीय पातळीवर एक शिक्षण संस्था स्थापन करणे. एकदा शिक्षणसंस्था स्थापन झाली की मासिक, नियतकालिक तिला जोडणे शक्य होते.

नव्या पायावर शिक्षणसंस्था स्थापन करण्याची अय्यर ह्यांची कारणे द्विविध होती. एक, निग्रो पुढारी बुकर टी वॉशिंग्टन यांच्या जीवनाचा अभ्यास करीत असता, काम आणि शिक्षण यांचा मेळ घालून विद्यार्थ्यांचा अनेक दृष्टीने फायदा करता येतो. हे त्यांनी पाहिले

होते आणि दोन, म. गांधींच्या असहकाराच्या आंदोलनाच्या कार्यक्रमामध्ये सरकारी नोकऱ्या न्यायालये आणि शैक्षणिक संस्था ह्यावरील विविध बहिष्कारांचा अंतर्भाव होता. ही पोकळी भरून काढण्यासाठी सरकारी शिक्षणसंस्थापासून स्वतंत्र व अधुनिक राष्ट्रीय पद्धतीच्या शैक्षणिक संस्था स्थापन करण्याचा उपदेश गांधीजींनी केला होता. नोव्हेंबर १९२० मध्ये त्यांनी, अहमदाबाद येथे "गुजराथचे राष्ट्रीय विद्यापीठ" "गुजराथ विद्यापीठ" सुरू केले. तेथील अभ्यासाच्या पद्धतीमुळेच केवळ नव्हे तर सर्व राष्ट्रभर व्यवसायिक प्रशिक्षण दिल्यास स्वतंत्र्याच्या तत्त्वाचे पोषण होईल अशी गांधीजींची आशा होती. यानंतर पुढे क्रमाक्रमाने उच्च शिक्षणासाठी शाळा संघटित करून शहरांमध्ये शिक्षणाचा फैलाव करण्याचाही त्यांचा मानस होता. हे शिक्षण जनतेपर्यंत पाझरेल आणि त्यामुळे सुशिक्षित आणि अशिक्षित ह्यामध्ये आज दिसणारी आत्मघातकी दरी भरून निघेल. परिणामतः सभ्य मध्यम वर्गीय लोकांना औद्योगिक शिक्षण आणि औद्योगिक वर्गांना वाङमयीन शिक्षण देऊन संपत्तीच्या विषम वाटणीला आणि सामाजिक असमाधानाला मोठ्या प्रमाणात आळा घालता येईल."

तमिळनाडूमध्ये हिंडून अय्यर ह्यांनी आपल्या शिक्षणसंस्थेसाठी योग्य जागा धुंडण्याचा प्रयत्न केला. आपल्या संस्थेचे नाव तमिळ गुरुकुलम् असावे असे त्यांनी ठरविले होते. मद्रासच्या सरहद्दीवर कोलंबक्कम् येथे आणि तंजावर जिल्ह्यामधील मन्नार गुडी आणि वेन्नात्रीकराई येथे त्यांनी ज्या जागा पाहिल्या त्या त्यांना पसंत पडल्या नाहीत.

ह्याच सुमारास तिरुनेलवेली जिल्ह्यात कोईलपट्टी येथे एका कॉंग्रेस परिषदेचे अध्यक्षस्थान स्वीकारण्याची अय्यर ह्यांना विनंती करण्यात आली. परिषदेनंतर काही अंतरावर असलेल्या कल्लिदाई कुरिच्ची ह्या शहरामध्ये ते गेले. तेथील तालुका बोर्डाच्या शाळेच्या शिक्षकांनी गांधीजींच्या शासनाशी असहकार करण्याच्या हाकेला ओ दिली व शाळा सोडली. नंतर त्याच ठिकाणी टिळक विद्यालय ह्या नावाची राष्ट्रीय शिक्षण संस्था काढली. अय्यर त्या ठिकाणी गेले तेव्हा त्यांना ह्या विद्यालयाचा कार्यभार उचलण्याची विनंती केली गेली. अय्यर ह्यांनी मान्यता दिली. हे विद्यालय प्रथम कालिदाई कुरिच्ची येथील रामलिंग अय्यर थोट्टम् येथे होते, ते अय्यर ह्यांच्या तमिळ गुरुकुलमूचे केन्द्रबिन्दू बनले.

अय्यर ह्यांनी तमिळ गुरुकुलमूची सुरुवात केल्यानंतर टिळक विद्यालयामध्ये ज्या सोयी आणि साधने होती ती सर्व गुरुकुलमूच्या मालकीची झाली. त्यांनी तेथे भारद्वाज आश्रमाची स्थापना केली व ती गुरुकुलमूची व्यवस्थापन संस्था बनली.

अशा तऱ्हेने जरी सुरुवात झाली होती तरी हे विद्यालय अजून अय्यर ह्यांनी बाळगलेल्या स्वप्नापासून फार दूर होते. आत्तापर्यंत सर्व शिक्षण रूढ पद्धतीने दिले जात होते. फक्त सर्व निवासी विद्यार्थी कडक शिस्त पाळीत असत एव्हढाच काय तो बदल होता. ते सकाळी लवकर उठत स्वतःची भांडी आणि कपडे धूत, पद्धतशीरपणे प्रार्थना

म्हणत आणि भारतमातेला दररोज प्रणाम करीत. विद्यार्थी भजनाच्या कार्यक्रमात भाग घेत आणि विद्यालयासाठी तांदूळ जमा करीत. जवळच असलेल्या कल्याणी धबधब्याकडे वरचेवर सफरी निघत. ताम्रपर्णी नदीमध्ये पोहण्याच्या शर्यती भरविणे नित्यांचे असे.

अय्यर अजूनही आपल्या गुरुकुलमूसाठी योग्य जागेच्या शोधात होते. नजीकच्या अनेक जागा त्यांनी तपासल्या. जागेच्या अवतीभवती सुंदर निसर्ग शोभा असावी. आणि त्यामुळे शांतपणे अभ्यासाला स्फूर्ती मिळावी अशा तऱ्हेची जागा आपणास मिळावी अशी त्यांची तीव्र इच्छा होती. अशी एक जागा ताम्रपर्णी नदीच्या दक्षिणेस तीन मैलांवर आणि रेल्वे स्थानकापासून दीड मैलावर - त्यावेळी विक्रीस निघली. त्या ३० एकरांच्या सुपीक जागेत सुंदर छायेची झाडे, विहीर आणि दक्षिणेस १ मैलावर कोलुंदिया मलाईच्या आल्हाददायक टेकड्या होत्या. एकूण हे गुरुकुलासाठी आदर्श स्थान होते. आज ५० वर्षांनंतर सुद्धा ह्या स्थळावर अनेक झाडे आहेत. ह्यावरून अय्यर ह्यांनी आपली निवड करतांना दूरदर्शित्व दाखवून उत्कृष्ट जागा निवडली हे सिद्ध होते.

विक्रीसाठी ह्या जागेची तीन हजार रुपये किंमत ही सुद्धा मनाला मोह घलणारी होती. परंतु अय्यर ह्यांच्याजवळ रोख पैसे नव्हते. ते अक्षरशः कफल्लक होते. देशकार्यासाठी त्यांनी आपले सर्वस्व देऊन टाकले होते. निधी जमविण्यासाठी त्यांनी वृत्तपत्रात एक विनंतीपत्र प्रसिद्ध केले. सुदैवाने सधन नाट्टुकोट्टाई चेट्टियार जमातीतील दानशूर वायी. सु. षण्मुखम् हे कनाडुकठ्ठनूचे गृहस्थ पुढे आले त्यांनी खरेदीचा व्यवहार पुरा करण्यासाठी तीन हजार रुपयांची देणगी देऊ केली. एका शुभ दिवशी अय्यर ह्यांनी श्रमदेवी येथील नव्या जागी आपले तमिळ गुरुकुलम् हलविले.

अय्यर ह्यांची दुष्टी आदर्शवादी होती. गुरुकुलमने स्वतःच्या सर्व गरजा स्वतःच भागवाव्या असे त्यांना वाटे. ह्याबाबतीत त्यांना बुकर टी. वॉशिंग्टन ह्याच्या उदाहरणाने स्फूर्ती मिळाली. गुरुकुलमूच्या जमिनीचा काही भाग भातशेतीसाठी तर काही डाळींसाठी देण्यात आला. लागवडीचे सर्व काम गुरुकुलमूतील विद्यार्थ्यांनी गावातील अनुभवी लोकांच्या नेतृत्वाखाली करण्यास सुरुवात केली. नारळाच्या व आंब्याच्या झाडांमुळे खाण्यास योग्य अशी फळे मिळाली. उघड्या हवेत वर्ग भरविण्यासाठी काही प्रचंड वडाच्या झाडांनी आपल्या फांद्या विस्तारल्या व गर्द छायेचे वातावरण निर्माण केले. निसर्ग प्रेम, रोपे आणि झाडे यांची आस्थेने केलेली लागवड हे रोजच्या अभ्यासक्रमाचे भाग होते. ह्या भूमीवर काम करून विद्यार्थी भूविज्ञान, वनस्पतीशास्त्र खतांची भूमिका, पाण्याची उपयुक्तता आणि लागवडीचे अर्थशास्त्र हे विषय विद्यार्थी शिकत.

गुरुकुलमूच्या गरजा रोजच्या रोज वाढत असल्याने अधिक इमारतीची आवश्यकता भासत होती. अय्यरना अशावेळी बुकर टी. वॉशिंग्टन यांच्या उपदेशाचे पालन करणे योग्य वाटले. वॉशिंग्टनने शिक्षक आणि विद्यार्थी या दोघांनाही विटा कशा तयार करायच्या हे शिकवले आणि स्वतःसाठी इमारती स्वतःच बांधण्यास सुरवात केली. शर्मादेवी

गुरुकुलम्‌मधील सुरवातीच्या इमारती रचनेच्या दृष्टीने अत्यंत साध्या असत. जमीन आणि भिंती विटांच्या असत आणि छप्पर बाबूंच्या काठ्यांचे आणि नारळाच्या झावळ्यांचे असे. विद्यार्थी व शिक्षक पाया खणीत, तो दगडांनी भरून काढीत, तळकामासाठी वाळू आणीत, विटा पाडीत आणि त्या भट्टीत भाजत, चुन्याचे मिश्रण करीत, भिंतीसाठी विटा रचीत आणि भिंती पुऱ्या करून त्यांना रंगसफेती देत. स्वयंपाकसुद्धा आश्रमवासी स्वतः करीत. काही विवाहित शिक्षकांच्या बायका ह्या कामात मदत करीत. ही एक साधी सहकारी वसाहत होती, सर्व माणसे कामात आपापला वाटा उचलीत.

अय्यर यांनी गुरुकुलम्‌च्या ग्रंथालयाच्या इमारतीला अग्रक्रम दिला आणि ग्रंथालयासाठी आपली तीन हजार पुस्तके देणगी दाखल दिली. पुस्तके बाबूंच्या रॅकवर ठेवली जात. वाळवी पासून त्यांचे संरक्षण व्हावे, ह्यासाठी योग्य ती काळजी घेतली जाई. पांढऱ्या मुंग्यांपासून बचाव व्हावा म्हणून कडुनिबांच्या पाल्याचा उपयोग उत्तम असे. वरची जाड वेष्टणे आणि प्रत्यक्ष पुस्तके ह्यामध्ये थोडा पाला घातला तर ह्या पीडकांचे निवारण होई.

गुरुकुलम् श्रमदेवी येथे हलवल्यानंतर थोड्याच काळात एक मुद्रणालय स्थापन करण्यात आले. एक छापण्याचे पाययंत्र (ट्रेडल), ईगल् मुद्रणयंत्र आणि इंग्रजी व तमिळ ठसे आणण्यात आले. ह्याच मुद्रणालयातून अय्यर यांचे दुसरे स्वप्न त्यांचे मासिक व नियतकालिक- काही दिवसानंतर साकार होणार होते. आपल्या अल्प अस्तित्वात ह्या ''बालभारती'' हे नाव मिळालेल्या नियतकालिकाने आपला उच्च दर्जा कायम राखला. १९२५ मध्ये अय्यर यांच्या आकस्मिक निधनानंतर ते बंद करावे लागले.

मुद्रणालयाने अय्यर यांच्या ''तिरुवल्लुवर यांची वचने'' ह्या पुस्तकाची दुसरी आवृत्तीही मुद्रित केली. अय्यर यांच्या सर्व साहित्यकृती भारद्वाज आश्रमाला देण्यात आल्या. हेतू हाकी, ह्या पुस्तकांच्या विक्रीपासून जे उत्पन्न येईल, त्याचा संस्थेच्या आर्थिक गरजा अंशतः भागविण्यास उपयोग व्हावा.

गुरुकुलम् स्थापन करण्याचा अय्यर यांचा हेतू, त्यांच्या स्वतःच्या शब्दात सांगायचे तर, ''शूर तमिळांचा एक नवा वंश निर्माण करणे'' हा होता. हे तमिळ सुशिक्षित, सुसंस्कृत असून कार्यालयातून नोकऱ्यांची याचना न करता स्वतःच्या पायांवर उभे राहू शकतील असे असतील. शिकत असतांनाच त्यांना कुठलातरी एक व्यवसाय शिकवला जाईल. त्याचा व्यवहारातील उपयोगही अभ्यासक्रम चालू असताना त्यांना होऊ शकेल. गुरुकुलम् हा आणखी एक ''कारकुनांचा कराखाना'' राहणार नव्हता. तमिळ तरुणांनी संस्कारांनी वीर वृत्तीचे बनावे अशी त्यांची इच्छा होती.

तांत्रिक व्यवसायांशिवया विद्यार्थी वाङ्मय, तत्त्वज्ञान, ललित कला, विज्ञान, भूगोल, इतिहास, वैद्यक आणि समाजकल्याण यांचा अभ्यास करीत. गुरुकुलम्‌च्या एका जाहिरतीत लिहिले होते, ''इंग्रजी भाषेचे शिक्षण दिले जाईल आणि विद्यार्थ्यांची तयारी

बी. ए. समकक्ष राहील. तमिळ मध्ये विद्ग्ध वाङमय, यात संगम काव्य आणि टोल्काप्पियम् व्याकरण, शिकविले जाईल. वैज्ञानिक संशोधनाच्या युरोपीय पद्धतींचे विद्यार्थ्यांना प्रशिक्षण दिले जाईल. व्यवसायांमध्ये कातणे व विणणे, सुतारकाम आणि शेती यांचा अभ्यास विद्यार्थी करतील.''

काही काळ गेल्यानंतर आणि जसजशी मुद्रणालयाची प्रगती झाली, तसतसे खिळे जुळवणे (कंपोजिंग) आणि मुद्रण यांची शिकवीत असलेल्या विषयात भर पडली.

अय्यर यांना आपली शाळा स्वावलंबी करावयाची होती; परंतु सुरवातीला तरी हे शक्य झाले नाही. हत्यारे, यंत्रे आणि इतर साहित्य यांच्या खरेदीस भांडवली खर्च करावा लागला; नवीन कच्ची साधन सामग्री विकत घेण्यासही खर्च करावा लागला, स्वयंपाकघरात आवश्य ते साहित्य घ्यावे लागले आणि इमारत काम किंवा शेतीवर किमान वेतनावर मजूर नेमावे लागले. पैसा गोळा करणे हा अय्यर यांच्यापुढे नेहमीचाच प्रश्न असे. ते गुरुकुलमूच्या विद्यार्थी व शिक्षकांकरवी तसेच वृत्तपत्रातून विनंती पत्रे पाठवीत. ''नवशक्ती'', ''तमिळनाडू'' आणि ''कुमारन्'' ह्या तमिळ साप्ताहिकांनी तसेच ''स्वदेशमित्रन्'' ह्या तमिळ साप्ताहिकाने व इंग्रजी दैनिक ''हिंदू'' या सर्वांनी सहाय्य केले. अय्यर यांनी लोकमतावर ज्यांचा प्रभाव होता अशा पुढाऱ्यांच्या भेटी घेतल्या. अनेकांनी देणग्या देण्याचे वचन दिले. काहींनी ते पाळले. लंडन येथील ''इंडिया हाऊस'' चे जुने सहकारी डॉ. टी. एस्. एस्. राजन् हे तिरुची येथे प्रमुख शल्यचिकित्सक होते, त्यांनी बऱ्याच मोठ्या देणग्या पाठवल्या. मद्रास येथील सर्व राष्ट्रीय कार्यांचे उदार आश्रयदाते एस्. श्रीनिवास अय्यंगार यांनी मदतीचे आश्वासन दिले.

ह्या राष्ट्रीय संस्थेला तमिळ काँग्रेस समितीने सहाय्य करावे, असे अय्यर यांना वाटले. राजाजींनी अय्यरंना ह्या विरुद्ध सल्ला दिला. अशी मदत घेतल्यास अय्यरना संस्थेच्या व्यवस्थापनात जे स्वातंत्र्य आहे त्यावर परिणाम होईल असे राजाजींना वाटले. परंतु दुर्दैवाने अय्यरंनी हा सल्ला मानला नाही आणि त्यांचा त्यांना पुढे पश्चाताप करावा लागला. समितीने रू. १०,०० मंजूर केले आणि त्यातील रू. ५०००/- चा धनादेश देण्यात आला. त्याबाबत सुद्धा समितीमध्ये काही अंतर्गत मतभेद निर्माण झाले. राजाजींना वाटत असलेली अनिष्ट सूचना खरी ठरली आणि समितीचे अध्यक्ष डॉ. वरदा राजुलू नायडू यांच्या पुढाकाराने एक कटू चर्चा सुरू झाली आणि तीमुळे संस्था जवळपास मोडकळीला आली.

विद्यार्थ्यांकडून प्रत्येकी बारा रुपये शुल्क घेतले जाई. जे काही थोडे गरिबीमुळे काहीच देऊ शकत नव्हते त्यांना शिक्षण मोफत दिले जाई. पैशाची तातडीची टंचाई भासली की अय्यर मद्रासची फेरी करीत आणि जवळ जवळ पुरेसे पैसे घेऊन परत येत. पैशाबरोबरच पुस्तकांचे गठ्ठे येत आणि ग्रंथालयात मौल्यवान भर पडे. ह्या फेऱ्यांनंतर अय्यर नेहमी खूप उत्साही असत; आपण आपल्या गुरुकुलमूची दुसरी नालंदा किंवा तक्षशीला करू असे

ते म्हणत !

गुरुकुलमूचा दैनंदिन कार्यक्रम पहाटे चार वाजता सुरू होई. अय्यर सर्वात आधी उठत. प्रातर्विधी उरकून ते ४.३० ला आपली शिटी फुंकीत. सर्व सहनिवासी जागे होत. दात घासून ते व्यायाम करीत. नंतर ते प्रातर्विधीसाठी जात. कोणीही अविचारने वाटेल तेथे घाण करू नये म्हणून अय्यर अत्यंत कडक शिस्त पाळायला लावीत- प्रत्येकजण बरोबर एक लहानसे फावडे घेऊन जाई आणि निवडक जागी सहा इंच खोलीचा खड्डा खणीत असे आणि वापर झाल्यावर तो पुन्हा भरून काढी. महात्मा गांधींनी अशाच तऱ्हेची पद्धत आपल्या आश्रमात अवलंबली हे जाता जाता सांगावेसे वाटते.

व्यायाम, तालीम, कवायत, योगासने आणि कुस्ती ह्या सर्वांचा शालेय कार्यक्रमात समावेश झाला. अय्यरना स्वतःला शारीरिक क्षमतेची आवड होती. तेव्हा ते स्वतः ह्यातील कित्येक व्यायामात व खेळात भाग घेत.

स्वतःची भांडी घासून, कपडे धुऊन आणि अंघोळ करून सर्वजण स्फूर्तिकक्षात ७.३० ला जमत. अय्यर त्यांना थोरांची चरित्रे सांगत.

अन्न सात्विक असे. मुलांना अगर शिक्षकांना चहा कॉफी दिली जात नसे. सर्वजण कांजी घेत. चिंच आणि तांबड्या मिर्च्या यांचा सैपाकघरात वापर होत नसे; त्याऐवजी मिरी आणि लिंबू वापरली जात.

अय्यर एरवींच्या दिवशी संपूर्ण जेवण जेवीत नसत. सकाळी अकरा वाजता ते थोडे खोबरे, केळी आणि शेंगदाणे आणि भात खात. रात्री ते काही फळे, खोबरे आणि दाणे खात. फक्त अमावास्येच्या रात्री मेजवानी असे तेव्हा अय्यर इतरांच्या पंक्तीला बसून नेहमीचे जेवण घेत.

वैद्यकीय उपचार निसर्गोपचारी पद्धतीचे असत. अय्यर यांना रामलिंग स्वामीमल यांच्या स्तोत्रांची आवड असे आणि सकाळच्या प्रार्थनेच्या वेळी त्यातील श्लोक म्हटले जात. अय्यर मुलांना टिळकांच्या ''गीतारहस्याचे'' भाग वाचून दाखवीत व त्यांचा अर्थ सांगत. गुरु गोविंदसिंगांचे चरित्र लिहिल्यावर त्याचे हस्तलिखित त्यांनी मुलांच्या जमावापुढे वाचून दाखविले आणि नंतर ते मुद्रणालयाकडे पाठविले. कम्बन् यांच्या रामायणावरही अय्यर व्याख्याने देत.

आपली दुसरी शपथ पुरी करण्यासाठी अय्यर यांनी सुरू केलेले तमिळ मासिक ''बालभारती'' ऑक्टोबर १९२४ मध्ये प्रसिद्ध झाले, त्याला केवळ अकरा महिन्यांचे अल्प आस्तित्वच मिळाले कारण अय्यर यांच्या जून १९२५ मध्ये झालेल्या निधनानंतर ते बंद करावे लागले परंतु ह्या अल्प काळातही त्याने तमिळ वृत्तपत्राच्याजगात स्वतःचे स्थान मिळवले.

१९२० च्या सुरवातीस अय्यर यांनी एका मित्राला लिहिताना म्हटले, ''लोकांना सर्वज्ञान आणि सर्वकला तमिळ भाषेतच अवगत व्हाव्या, ह्यासाठी तमिळमध्ये

साहित्यकृती प्रसिद्ध करणे, हे मी माझे देशभक्तीपर कर्तव्य समाजतो. ह्या प्रमुख नियुक्त कार्यासाठी मी स्वतःला समर्पित करणार आहे. दैनंदीन गरजांमुळे अडकून न राहता मला हे करता यावे यासाठी मी कधी कधी इंग्रजी साहित्यकृतींचा आश्रय घेईन. . . माझ्या कम्बन् रामायणाच्या बालकाण्डम् प्रमाणे मी केवळ 'शिलाप्पादिकारन्', 'मणिमेखलाई' आणि 'जीविका चिंतामणी'च नाही तर संगम् काव्यकृतीही सुरेख मुद्रित आवृत्तीत प्रकाशित करणार आहे.

''परंतु माझी स्वप्ने यापेक्षाही अधिक महत्त्वाकांक्षी आहे. अलेक्झांडर डयुमाने ज्याप्रमाणे संपूर्ण फ्रेंच इतिहास मनोज्ञ कथांमधून वर्णन करून प्रत्येक फ्रेंच माणसाला आपल्या देशाच्या इतिहासाच्या थोरवीची जाणीव करून दिली. त्याप्रमाणे मला तमिळनाडूचा संपूर्ण इतिहास आकर्षक कल्पित कथांच्याद्वारा सांगावयाचा आहे. माझ्या कथांचे नायक पारी आणि नन्नन, कपिलार आणि नाक्किरार, कारिकलन् आणि सेंगुत्तुवन्, राजा आणि राजेंद्र व विजयालया, सुंदरमूर्तींसारखे नीयान्मार आणि रामानुज आणि देशिकसारखे वैष्णव आचार्य यासारखे थोर पुरुष राहतील. ह्या तमिळ नायकाच्या पौरुषयुक्त गुणांचा अविष्कार करण्याचे महाकृत्ये जर माझ्याकडून पार पडले तर पुढील पीढीत आणि त्यापुढे तमिळ वाङमय आणि तमिळ इतिहास त्यांचा कोण तिरस्कार करेल ?. . . हा दृष्टिकोन मनाशी ठेवून मी सरावासाठी माझ्या 'मंगायारक्कारसियन् कथाल' ह्या कथा लिहिल्या. ह्या अनुभवाच्या जोरावर मी अधिक मोठ्या ऐतिहासिक कल्पित कथा लिहू शकेन.'

अय्यर पुढे लिहितात 'ही सारी कामे पुरी करण्यासाठी हाताशी एक तमिळ नियतकालिक असलेले बरे. हे पत्र बंगालीमधील प्रभावी किंवा इंग्रजीत 'मॉडर्न रिव्ह्यू' प्रमाणे उत्साही मंडळींना प्रत्येक प्रकारच्या वाङमयाची निर्मिती करण्याच्या ह्या खेळामध्ये भाग घेता येईल. तीन हजार रुपयांची गुंतवणूक ही यासाठी किमान गरज आहे. तीस लोकांनी प्रत्येकी शंभर रुपयाचा एक भाग घेतला तर ते पुरेसे होईल. परंतु एक वर्षभर विनंती करूनसुद्धा फक्त चार लोकांनी आपण ह्याचा विचार करू असे म्हटले आहे. मी कधीही निराशावादी नव्हतो. मला अजूनही असे वाटते की हे उद्दिष्ट साध्य होईल. परंतु एक महत्कार्य सिद्ध होईपर्यंत रिकामे राहाणे शहाणपणाचे नसल्याने मी वर उल्लेखिलेल्या वाङमय कृतींच्या निर्मितीत मग्न राहीन-''

बालभारती हे एक सुबक मुद्रण केलेले आणि सुबक बांधणीचे नियतकालिक होते. त्याचे वेष्टण तिरंगी असून आत एक कलात्मक चित्र छापण्याचा कागदावर (आर्टपेपर) छापलेले असे व ते महिन्याच्या महिन्याला प्रसिद्ध होईल. तिरंगी वेष्टण व आतील चित्र या गोष्टी तमिळ वृत्तपत्रीय जगात पन्नास वर्षापूर्वी नवीनच होत्या. पहिल्या अंकात एका संपादकीयात मासिकाच्या नावाचे व हेतुचे स्पष्टीकरण होते. नाव निवडण्याचे कारण अय्यर यांनी लिहिल्याप्रमाणे सरस्वतीचे नाव कवी भारती यांच्या नावाशी जोडणे.

''भारती'' हे आमचे गुणसंपन्न मित्र. त्यांनी वीस वर्षांपूर्वी तमिळनाडूच्या जनतेला व भाषेला नवजीवन देण्यास सुरुवात केली.

''बालभारती'' मध्ये जगातील सर्व वाङ्मयावर लेख येतील- ''चीनपासून पेरूपर्यंत,'' चरित्रात्मक रेखाटणे आणि विज्ञानविषयक लेख, तसेच राजकीय चर्चा आणि टिपणे येतील असे अभिवचन दिले होते. पहिल्या अंकात पाच लेख, दोन कथा, एक क्रमशः येणारा लेख आणि दोन कविता होत्या, शिवाय राजकीय टिपणेही होती.

तमिळ वृत्तपत्रसृष्टीच्या आकाशात ''बालभारती'' ह्या नव्या ताऱ्याचे स्वागत झाले. काही अपवाद सोडले, तर सर्व ठिकाणी एक दर्जेदार नियतकालिक म्हणून त्याला मान्यता मिळाली. कदाचित् पूर्वस्मृतींच्या आकर्षणाने असेल पण बेल्लारी तुरुंगात झालेल्या मैत्रीच्या स्मरणामुळे अय्यर यांनी एकप्रत तेथील तुरुंगाधिकाऱ्यांना पाठवली. तेथील अनुमती असलेल्या बंद्यांमध्ये त्याचा प्रसार व्हावा असा त्यांचा हेतु. मद्रास सरकारच्या गुप्त पोलिस खात्याकडे चौकशीसाठी मासिक पाठविण्यात आले आणि त्यांनी त्यांचे सर्व शहाणपण वापरून आणि सखोल अभ्यासानंतर तुरुंगाधिकाऱ्यांना कळवले की हे नियतकालिक तुरुंगातील निवासियांना बघण्यास योग्य नाही !

---

# मित्रांची पुनर्भेट

१९२२ व १९२३ ही वर्षे अय्यर ह्यांना फारच कष्टाची गेली. १९२२ मध्ये सुरू झालेल्या तमिळ गुरुकुलमकडे सर्व लक्ष पुरवावे लागे. ह्या संस्थेला काही दिवस झाल्यानंतर जसा त्रास होतो, तसा त्रास आता सुरू झाला होता. वसतीगृहयुक्त शाळा आणि जी केवळ कला आणि विज्ञाने ह्यांचे शिक्षण देत असे एव्हढेच नव्हे, तर तीत व्यावसायिक तंत्र आणि शेतीचे शिक्षणही मिळावे ही नवी कल्पना होती. अय्यरना स्वतःला शिक्षणसंस्था कशी चालवावी ह्याचा अनुभव नव्हता. परंतु मोठ्या प्रमाणात सहनशीलता होती त्यांच्यामध्ये आणि त्यांची शिकण्याची इच्छा अमर्याद होती. लहानसहान गोष्टींकडे लक्ष पुरविण्याचा त्यांचा गुण लक्षणीय होता. दाराच्या फळ्यांसाठी किंवा खिडक्यांसाठी एखादे झाड कापणे असो किंवा विटांसाठी माती तयार करणे असो, ते स्वतः प्रत्येक कामाचा काळजीपूर्वक अभ्यास करीत आणि आपल्या दैनंदिनीत अत्यंत अवधानपूर्वक सर्व गोष्टींची नोंद करीत. दैनंदिनीतील नोंदींवरून असे दिसते की त्यांनी प्रत्येक गोष्टीचा हिशोब केला होता आणि पुढील मार्गदर्शनासाठी त्याची नोंद केली होती. उदाहरणार्थ एका विवक्षित झाडापासून किती ओंडके आणि किती फळ्या मिळाल्या किंवा एखाद्या त्या कामासाठी खणलेल्या खड्ड्यातून किती विटांची माती मिळाली. ज्या ठिकाणी कोणा विशेषज्ञाची मदत लागे अशा गोष्टी सोडून बाकी कामांची प्रत्येक बाब गुरुकुलाचे शिक्षक आणि विद्यार्थी स्वतः हाताळीत असत. वेळ मिळेल तेव्हा अय्यर सुद्धा त्यांना मदत करीत विहिरींचा गाळ काढण्याचे काम ते सर्व स्वतः करीत. ह्यामुळे बराच खर्च वाचे.

अय्यर वरचेवर प्रवास करीत व आपल्या दैनंदिनीत आपल्याला प्रवासात भेटलेल्या अगणित लोकांची नावे- संपूर्ण नाव - व्यवसाय व पत्र व्यवहारासाठी पोस्टाचा पत्ता यांची नोंद करीत. ते ज्यांना भेटत त्यांना उत्साहीत करीत. ह्या गोष्टींची त्यांच्या कार्याला मदत होई हे निसंशय !

जर कोणाला मलायाला पाठविता आले तर तेथे बऱ्याच देणग्या जमा करता येतील

अशी त्यावेळेस कोणीतरी अय्यरना सूचना केली. अय्यर यांनी आपले मुख्य मदतनीस टी. आर. महादेव अय्यर यांना पाठविले. महादेव अय्यर हे वकील होते परंतु त्यांनी गांधीजींच्या आवाहनाप्रमाणे आपला व्यवसाय सोडून राष्ट्रकार्याला वाहून घेतले होते. ते गुरुकुलमूचे उपआचार्य होते आणि संस्थेच्या समर्पित कार्यकर्त्यांपैकी एक होते. त्यांना मलाया येथे मिळालेला प्रतिसाद लक्षणीय होता. काही पैसे गोळा झाले. पुष्कळशी आश्वासने मिळाली. महादेव अय्यर भारतात परतले. परततांना त्यांनी पैसे गोळा करण्याचे काम पुरे करण्याबद्दल आणि जमलेले पैसे भारतात पाठविण्याबद्दल सूचना दिल्या.

डिसेंबर १९२३ मध्ये अय्यर काकीनाडा कॉंग्रेसच्या अधिवेशनास हजर राहिले. अधिवेशनाचे अध्यक्षस्थान मौ. महंमद अल्ली ह्यांनी भूषविले होते. अधिवेशनाच्या खुल्या चर्चेच्या वेळी संपूर्ण स्वातंत्र्य हे भारताचे ध्येय असावे अशा तऱ्हेचा ठराव मांडण्याची अय्यर ह्यांची इच्छा होती. अध्यक्ष महंमद अल्ली ह्यांनी त्यांना परावृत्त करण्याचा प्रयत्न केला. परंतु अय्यर ह्यांनी आग्रह धरला. अय्यर ह्यांनी ठराव मांडला व त्यावर भाषणे केली. परंतु ठरावाला अनुमोदन देण्यास कोणीही मिळाले नाही आणि त्यामुळे ठराव बारगळला. ह्या आशयाचा ठराव करण्यास कॉंग्रेसला आणखी सहा वर्षे लागली.

काकीनाडाहून परत आल्यावर अय्यरनी वृत्तपत्रात एक विनंती पत्र प्रसिद्ध केले. आपल्याला विख्यात समाजसेवक आणि वरिष्ठ न्यायालयाचे एक न्यायमूर्ती टी. व्ही. शेषगिरी अय्यर ह्यांचे सहाय्य आहे असे सांगून अय्यर यांनी लहानात लहान देणगी स्वागतार्ह आहे असे म्हटले. ''आपल्या सर्व देशबांधवानी ज्यांना पुढील पिढीच्या हिताबद्दल अस्था आहे त्यांनी आपण तमिळ गुरुकुलाला जी मदत देऊ ती आपल्या मुलाच्या दृष्टीने विम्याच्या रक्कमेसारखी संरक्षण देणारी किंवा मुलांच्या हितासाठी वार्षिक निवृत्ती वेतनासारखी आहे याचे स्मरण ठेवावे. गुरुकुलाला दरवर्षी शेकडो रुपये मदत देणे काही थोड्यांना शक्य होईल. परंतु महिन्याला निदान एक रूपया तरी देणे कोणास शक्य होईल असे नाही. या संस्थेचा विकास होण्याची आवश्यकता पटल्यास अगदी गरिबातील गरिबास सुद्धा आठवड्यातून एक दिवस आपली कॉफी न घेता महिन्याला एक रुपया गुरुकुलासाठी वाचवता येईल. आपले देशबांधव जर जागे होतील आणि गुरुकुलाला सहाय्य करतील तर माझी अशी खात्री आहे की, एक वर्षाच्या अवधीतच गुरुकुलाचा विद्यापीठात विकास होईल आणि हे विद्यापीठ मदुराई आणि कांची, तक्षशीला आणि नालंदा या प्राचीन विद्यापीठांची तसेच मँचेस्टर, कोलंबिया आणि शार्लटेनबर्ग ह्या विद्यापीठांची बरोबरी करीन जे शहर किंवा लोकसमूह महिन्याला पंधरा रुपये देणगीचे आश्वासन देईल. त्याला एका विद्यार्थ्यास गुरुकुलात शिक्षण घेण्यास पाठविण्याचा अधिकार राहीन.

जसजसे दिवस गेले. तसेतसे भिन्नभिन्न व्यवसायातील अधिकअधिक लोक गुरुकुलाच्या उपयुक्ततेवर विश्वास ठेवू लागले. ह्या प्रयत्नानी तमिळनाडूमध्ये एक प्रमुख शिक्षणसंस्था उभी राहील असे दिसू लागले.

डिसेंबर १९२४ मध्ये बेळगाव येथे भरणाऱ्या कॉंग्रेस अधिवेशनासाठी अय्यर जाण्यास निघाले. त्या अधिवेशनाचे अध्यक्षस्थान म. गांधीकडे होते. गांधीजींनी नुकताच हिंदु-मुसलमान ऐक्यासाठी एकवीस दिवसांचा उपवास केला होता. असहकारितेचे आंदोलन स्थगित करून कॉंग्रेसमधील स्वराज्यवादी गटाला निवडणुका लढविण्यास अनुमती द्यावी किंवा नाही हा अधिवेशनाच्या कार्यक्रमपत्रिकेवरील प्रमुख विषय होता.

अय्यर अधिवेशनास उपस्थित राहिले. बहुधा त्यांची व म. गांधींची गाठ पडली असावी. जुन्या मित्रांच्या ह्या भेटीनंतर दुसरी एक अशीच पुनर्भेट घडून आली सावरकर ह्यांना अंदमानमधून भारतात आणले होते व त्यांना रत्नागिरी येथे स्थानबद्ध करून ठेवले होते. ही दुसरी भेट म्हणजे अय्यर व सावरकर ह्यांची.

सावरकरांना भारतात पुन्हा आणण्यात आले, त्याची पार्श्वभूमी अशी : मार्च १९२१ मध्ये दिल्ली येथील कौन्सिल ऑफ स्टेटचे सभासद सन्माननीय के. व्ही. रंगस्वामी अय्यंगार ह्यांनी सावरकर बंधूंची सुटका व्हावी, ह्या अर्थाचा प्रस्ताव मांडला. दोघेही सावकर बंधू राजद्रोहाच्या आरोपाखाली अंदमान येथे जन्मठेपेची शिक्षा भोगीत होते. सरकार ह्या गोष्टीला सहजगत्या राजी होत नव्हते. रंगस्वामी अय्यंगार ह्यांनी असे सांगितले, की आपण सावरकरांच्या वतीने जामीन देण्यास तयार आहोत. ह्यामुळे सरकारने आपले मत बदलले आणि सावरकर बंधूंना भारतात आणण्याची आज्ञा देण्यात आली. वडील बंधू गणेश सावरकर ह्यांची गंभीर आजारामुळे १९२२ साली सुटका करण्यात आली होती. विनायक दामोदर सावरकर ह्यांच्या सुटकेबद्दल सार्वजनिक दृष्ट्या मोठा आरडाओरडा झाला. काकीनाडा कॉंग्रेस अधिवेशनात त्यांच्या सुटकेबद्दल ठराव करण्यात आला. त्यानंतर त्यांना रत्नागिरी येथे स्थानबद्ध करण्यात आले. त्यांनी पाच वर्षांपर्यंत राजकारणात भाग घेऊ नये आणि शहराच्या बाहेर जाऊ नये, ह्या अटी त्यांच्यावर घालण्यात आल्या.

रत्नागिरी हे मुंबईच्या दक्षिणेस सुमारे १२५ मैलांवर असलेले समुद्रकिनाऱ्यावरील शहर आहे.

कॉंग्रेस अधिवेशनानंतर अय्यर आणि त्यांचे एक तरुण मित्र टी. सदाशिवम् हे गोव्याला निसर्गदृश्ये पाहाण्यासाठी सफरीवर गेले. ''स्वराज्य'' ह्या तमिळ दैनिकामध्ये प्रसिद्ध झालेल्या अय्यर ह्यांच्या विषयीच्या आपल्या आठवणीत सदाशिवम् म्हणतात, ''ज्या काही थोड्या लोकांना ह्या महापुरुषाच्या अगदी निकट राहून फिरण्याचा योग आला त्यात सुदैवाने मी होतो. हद्दपारीनंतर ते परत आले, तेव्हा मी त्यांना प्रथम भेटलो. परंतु माझा त्यांचा जिव्हाळ्याचा परिचय बेळगाव कॉंग्रेस अधिवेशनानंतरच झाला. अधिवेशनानंतर आम्ही दोघे मार्मागोवा, पणजी, रत्नागिरी आणि मुंबई येथे गेलो. त्यांच्या सहवासातील प्रत्येक क्षण हा एक आनंददायी अनुभव होता. त्या महापुरुषाचे विचार नेहमीच प्रगाढ आणि आत्मिक समाधान देतील असे असत. त्यांचे बोलणे सर्व वेळ देशभक्ती व तमिळ

भाषेबद्दल असे.

कवि कंबनूवर इतके प्रगाढ प्रेम असलेली दुसरी व्यक्ती मी पाहिली नाही. अय्यर स्वतः कवीच होते असे म्हटले पाहिजे. कवी सुब्रम्हण्य भारती ह्यांची काव्यमय भावना त्यांच्या अंतःकरणात बंदिस्त राहू शकत नव्हती. तिचा वारंवार परिस्फोट होत असे. अय्यर ह्यांच्या बाबतीत मात्र त्यांची काव्यभावना अंतःकरणात राहू शके. ह्यामुळे त्याने चांगल्या काव्यातील सूक्ष्म आणि सुंदर भागाचे रसग्रहण करता येत असे आणि त्यांतून त्यांना अपरिमित आनंद मिळे. क्षितिजावर आलेला उगवता सूर्य, प्रकाशमान् चंद्र, चमचमणारे तारे, विस्तीर्ण नभोमंडळ, विशाल सागर, घनदाट अरण्ये, भव्य पर्वत, नद्यांतील पुराचे वेगाने वाहणारे पाणी आणि धबधब्यांची गरजणारी शक्ती ह्या निसर्ग दृश्यांच्या दर्शनाने अय्यर यांना अपरिमित आनंद होत असे. पणजीच्या समुद्रकिनाऱ्यावर संध्याकाळी आम्ही दोघे वाळूवरून चालत हवा खात होतो आणि संभाषणात अगदी गढून गेलो होतो तेव्हा अय्यर एकदम उद्गारले, सदाशिवम्, आपले लोक आकाशाकडे मुळी बघतच नाहीत. आता ताऱ्याकडे पहा. नंतर ते निरनिराळी नक्षत्रे ओळखून माझ्यासाठी त्यांची भारतीय नावे सांगू लागले 'ही अश्विनी, ही भरणी इत्यादी. . . ह्यानंतर आम्ही गोव्याच्या जुन्या भागातील प्रसिद्ध ख्रिस्ती देवालयाकडे गेलो.''

नंतर सदाशिवम् रत्नागिरीला जाऊन आपण सावरकरांची भेट कशी घेतली याचे वर्णन करतात.

ते म्हणतात, ''२ जानेवारी १९२५ ला शुक्रवारी आम्ही महान देशभक्त आणि वीर पुरुष वि. दा. सावरकर ह्यांना भेटण्यास त्यांच्या स्थानबद्धतेच्या स्थळी, रत्नागिरीस गेलो. ह्या दोन थोर पुरुषांची गाठ पंधरा वर्षांनी पडत होती. ते एकमेकांना पूर्वकालीन ऋषींप्रमाणे कडकडून मिठी मारून भेटले. त्या दोघांना एकत्र पाहाणे हा एक दिव्य योग होता. आम्ही सावरकरांकडे सारा दिवस होतो आणि संध्याकाळी आम्ही त्यांचा निरोप घेतला. सावरकर काही अंतरापर्यंत आम्हाला पोचवायला आले. ह्या वेळापर्यंत पोलीसही आमचा माग काढीत आले होते. सावरकरांनी स्मित करून म्हटले, ''आपले अय्यर पोलिसांकडून सुरक्षित आहेत का ? त्याचा अर्थ असा की पोलीस नेहमी रत्नागिरीस आणि सावरकरांकडे येणाऱ्यांबद्दल सावधगिरीने वागत पण अय्यर त्यांना गुंगारा देऊन आले यात काही आश्चर्य नाही. अखेर एकमेकांचा निरोप घेताना सावरकर अय्यर यांच्याकडे पाहात हसत हसत म्हणाले, 'आपण आणखी किती वर्षांनी भेटणार ?'' अय्यर चट्टदिशी उतरले, 'छे, छे, आपण लवकर लवकर भेटू.' ''नंतर त्यांनी एकमेकांना पुन्हा आलिंगन दिले. दोघांच्याही मनात संशयसुद्धा आला नाही की हे आपल्या उभयतांच्या प्रेमळ मैत्रीचे अखेरचे अलिंगन ठरणार आहे !''

''आम्ही नंतर मुंबईस गणेश सावरकरांच्या घरी गेलो आणि तेथे आम्ही एकमेकांचा निरोप घेतला. नंतर आमची भेट दोन तासांसाठी मदुराई येथे २७ फेब्रुवारी १९२५ ला

झाली आणि आमच्या खूप गप्पा झाल्या. ही आमची शेवटची भेट.''

सदाशिवम् यांनी हे जे लिहिले आहे त्याशिवाय सावरकरांनी आपल्या आणि अय्यर यांच्याशी झालेल्या भेटीची आठवण काहीशा तपशीलाने दिली आहे. अय्यर यांच्या जून १९२५ मध्ये झालेल्या निधनानंतर ''मराठा'' पत्रात सावरकरांनी आपल्या लंडन येथील भेटींबद्दल आणि ब्रिक्सटन् तुरुंगातील भेटीनंतर आपल्याला वाटलेल्या निराशेबद्दल लिहून पुढे म्हटले :

ही गोष्ट १९१० सालची. चौदावर्षे उलटली आणि अशक्य ते प्रत्यक्षात आले. मृत्यूच्या अजस्त्र साम्राज्याच्या सरहद्दीशी जवळीक करणाऱ्या अत्यंत भयकारक व वक्र अशा जीवनाच्या भूम्यंतर्गत मार्ग, उपमार्ग आणि आडमार्गांवरून प्रवास करून झाल्यावर मी श्रीयुत अय्यर यांना दोन महिन्यांपूर्वी भेटलो. ते मद्रास ते मुंबई हे अंतर प्रवास करून आम्हाला आनंदाच्या रोमांचकारी मदिरेचे दर्शन देण्यासाठी काही तास भेटायला आले होते. काही काळपर्यंत आम्ही क्लेशकारक व यातनामय भूतकाळाची कटुता विसरणे आणि मोठ्या सुटींनंतर एकमेकांना भेटणाऱ्या शाळासोबत्यांप्रमाणे एकमेकांशी आनंदवृत्तीने गप्पा मारीत बसलो. त्यांनी माझा निरोप घेतला.ते दिसेनासे होईपर्यंत मी त्यांना पाहात राहिलो आणि मनाशी म्हटले, आता मी त्यांना केव्हा वाटेल तेव्हा पाहू शकेन.'

''पण ते लवकरच मानवाच्या बोलावण्याच्या पलीकडे जाऊन अदृश्य होणार होते याची मला काय कल्पना ? मानवी बुद्धी नकारार्थी मान हलवून 'अशक्य' असे उद्गारली तेव्हा परिस्थितीने अशक्य ते शक्य करून दाखविले आणि जेव्हा बुद्धीने आनंदाने स्वतःला आश्वासन दिले की 'आता मला जेव्हा वाटेल तेव्हा,' त्यावेळेस भावितव्यतेने कठोरतेने म्हटले 'नाही, मुळीच नाही.' अशा तऱ्हेने आपले दैव कोठल्याही उच्चतर हेतूंनी न वागता मानवाने जे कल्पिले असेल त्याची कुचेष्टा करून त्याचा मानभंग होईल अशा तऱ्हेने वागत असते !''

# गुरुकुलम् वाद

व. वे. सु. अय्यर ह्यांचे तमिळ गुरुकुलम् सुरवातीच्या काळातील अनेक अडथळ्यांना तोंड देत असता वादळात सापडले आणि आधीचेच ते निःशक्त तारू अगदी मोडकळीस आले. प्रथम हे एक चहाच्या पेल्यातील वादळ होते. परंतु लवकरच त्याचा प्रचंड वणवा झाला. ते एका अत्यंत मर्मभेदी अशा प्रश्नांसंबंधी होते. हा प्रश्न अत्यंत नाजूक होता. तो जातीय वरिष्ठतेच्या ढोंगासंबंधी होता. ह्या सगळ्याची सुरुवात दोन ब्राह्मण विद्यार्थ्यांना सार्वत्रिक जातीविरहित भोजन गृहात जेवण न घेण्याची सवलत दिल्याने झाली. त्यामध्ये एवढा क्षोभ निर्माण झाला की म. गांधींना मध्यस्थीची विनंती करावी लागली. ह्याने सुद्धा समजुतीचा तोडगा निघू शकला नाही आणि कटुता वाढली. प्रकरण तमिळनाडू कॉंग्रेस समितीकडे नेण्यात आले. समितीने गुरुकुलमूला पाच हजार रुपयांची देणगी दिली होती. समितीमध्येही तीव्र स्वरुपाचे मतभेद झाले. बहुमताने जेव्हा आपले मत सर्वांवर लादले तेव्हा सी. राजगोपालीचारींसारख्या प्रमुख सभासदांनी राजीनामा दिला.

ह्या सर्व घटना मुळातच दुःखकारक होत्या. परंतु ज्या तऱ्हेने ह्या सर्वाचा शेवट झाला, ती गोष्ट तर अधिकच शोककारक होती. अनेक महिन्यांच्या कटू वादविवाद आणि आंदोलनानंतर वास्तववादाची सरशी झाली. संबंधित पक्षांनीच एक मार्ग काढला. तो प्रत्यक्षात आणण्याचा क्षण आला होता. परंतु ह्या आणीबाणीच्या क्षणी निष्ठूर दैवाने स्वतः एक आघात केला. त्याने अय्यरंना आकस्मात् परलोकात नेले आणि मागे केवळ गोंधळ राहिला. अय्यर ह्यांची प्रतिष्ठा पुन्हा प्रस्थापित झाली. परंतु गुरुकुलमूचे व्यवस्थापन सामान्यांच्या हाती गेल्यामुळे गुरुकुलमूचा नाश झाला. अखेरीस ते बंद करावे लागले. ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर ह्यांच्या मनात परस्परांबद्दल संशय येणे ही ह्या वादाची विषारी बाजू होती. ती मुळे सार्वजनिक जीवनावरील परिणाम दीर्घकाळपर्यंत टिकला.

पन्नास वर्षांपूर्वी जेव्हा अय्यर ह्यांनी गुरुकुलाची स्थापना केली त्यावेळच्या सामाजिक व राजकीय परिस्थितीप्रमाणे सर्व संस्थांमधील सार्वजनिक व खाजगी वसतिगृहांच्या

व्यवस्थेमध्ये जातीय तत्त्वावर वर्गीकरण केलेले असे. ब्राम्हण आणि ब्राम्हणेतर ह्यांच्यासाठी वेगळी भोजनगृहे आणि स्वयंपाकघरे असत. प्रगत आणि राष्ट्रीय संस्थांमध्ये मात्र जातीप्रमाणे भेद न करता सर्वांना एक समान भोजन गृह असावे, असा प्रयत्न केला जाई. अय्यर ह्यांनीसुद्धा अशा तऱ्हेचे जाती विरहित भोजनगृह ठेवण्याचा प्रयत्न केला. परंतु लवकरच दोन ब्राम्हण विद्यार्थ्यांच्या पालकांनी आपल्या पाल्यांसाठी भोजनाची वेगळी व्यवस्था व्हावी असे सुचविले. अगदी सुरुवातीला अय्यर ह्यांनी समान भोजन व्यवस्थेचा आग्रह धरला नव्हता. ते दोघे पालक गुरुकुलमूचे उत्साही आश्रयदाते होते.

ह्या पेचप्रसंगात सापडल्यामुळे अय्यर ह्यांनी त्या दोन विद्यार्थ्यांचा अपवाद केला आणि त्यांना जेवण देण्याची तात्पुरती व्यवस्था केली. सैंपाकघरात जाणारा जो बंदिस्त रस्ता होता त्याचा उपयोग कोठीच्या खोलीसारखाही होत असे. तेथे त्यांना जेवण देण्यास सुरुवात झाली.

ह्यांने सुध्दा काही त्रास झाला नसता. परंतू सुट्टी आली. मुले घरी गेली आणि आपल्या शाळेचे आकर्षक वर्णन घरच्या लोकांजवळ करू लागली. अगदी निरागसतेने त्यांनी असेही सांगितले की दोन ब्राम्हण विद्यार्थी प्रथम आपल्या बरोबर जेवण घेत होते परंतू आता त्यांना वेगळे जेवण करण्याची परवानगी देण्यात आली आहे. दुर्दैवाने सामाजिक सुधारणेमध्ये रस असणाऱ्या काही पालकांना हे अपमानकारक वाटले. त्यांनी हे कृत्य म्हणजे आधी केलेल्या समान भोजन व्यवस्थेच्या विरोधी आहे असे म्हणण्यास सुरुवात केली. अय्यर ह्यांनी स्पष्टीकरण केले की गुरुकुलाच्या नियमाप्रमाणे ज्या पालकांना आपल्या पाल्यांसाठी वेगळी भोजन व्यवस्था हवी असेल त्यांच्यासाठी ती करण्यात येईल. सुधारकांच्या दृष्टीने हे एक भयप्रद चिन्ह होते. जर दोन ब्राम्हण मुलांच्या बाबतीत आज अपवाद केला गेला तर कालांतराने आणखी अपवाद कशावरून केले जाणार नाहीत ? फक्त दोन ब्राम्हण मुले वेगळी जेवत होती आणि इतरांमध्ये अनेक ब्राम्हण विद्यार्थी आणि अय्यर ह्यांच्यासह अनेक शिक्षक सामाईक भोजन गृहामध्ये जेवत होते, ह्याचा त्यांनी विचारच केला नाही. अय्यर ह्यांच्या स्वतःच्या उदाहरणाने त्यांची निश्चित मते सिध्द होत होती. परंतु ते स्वतः आदर्शवादी होते आणि त्यांना दुसऱ्यांवर सामाजिक सुधारणा लादावयाची नव्हती. आपल्या स्वतःच्या उदाहरणाने आणि काही काळ गेल्यानंतर ज्या दोघांचा अपवाद केला गेला होता तेही आपला आग्रह सोडून सामाईक भोजन व्यवस्थेत सामील होतील अशी अय्यरंना आशा होती. सुधारणावाद्यांना मात्र सुधारणेची गती वाढवावयाची होती.

जवळपास एक वर्ष गेले. प्रथम तोंडी चाललेली चर्चा वर्तमानपत्रांकडे गेली. डॉ. पी. वरदाराजलु नायडू तमिळनाडू कॉंग्रेस समितीचे अध्यक्ष स्वतः ब्राम्हणेतर होते आणि त्यांनी ह्या प्रकरणाचा अती गंभीरपणे विचार करण्यास सुरुवात केली- कॉंग्रेस समितीच्या दोघांपैकी एका चिटणीसांनी ई. व्ही. रामस्वामी नायकर ह्यांनी- नायडू ह्यांना जोराचा

पाठिंबा दिला. ते स्वतः ब्राम्हणेतर होते आणि तातडीच्या व निकराच्या सामाजिक सुधारणेचे आग्रही समर्थक होते.

डॉ. वरदाराजलू नायडू ह्यांनी ''तमिळनाडू'' ह्या लोकप्रिय साप्ताहिकात तमिळ गुरुकुलम्‌बद्दल लिहिले आणि गुरुकुलातील भोजन व्यवस्थेवर ब्राम्हणेतरांबाबत भेदभाव होत असल्याचा आरोप केला. अय्यर ह्यांनी हे नाकारून एक व्यापक प्रश्न, सर्वच जातीय प्रश्न सोडविण्याचा उपाय केला पाहिजे असे सांगून हा प्रश्न आपल्या मनाला भेडसावीत आहे असे म्हटले. गुरुकुलम्‌चा नियम विद्यार्थ्यांच्या पालकांना ज्या तऱ्हेची भोजनव्यवस्था पाहिजे ती त्यांना देणे अशी असल्याचे सांगून अय्यर ह्यांनी पुढे म्हटले की हिन्दू समाजातील जातीसंबंधीचा कटकटीचा प्रश्न कसा सोडवावा ह्या संबंधी आपण विचार करीत आहोत. शिखांच्या जातीविहीत समाज व्यवस्थेने आपण प्रभावीत झालो असून तशा तऱ्हेचा समाज तमिळनाडूमध्ये प्रस्थापित व्हावा, असे आपल्याला वाटत आहे. पर्यायी व्यवस्था म्हणून आपल्याला तमिळ समाजाचे पुनर्वर्गीकरण करण्याची इच्छा आहे. ह्या वर्गीकरणाचा पाया जन्म नसून आपण जे काम करतो, तो असावा असे आपले मत आहे. ह्यावर चर्चा करून ही व्यवस्था प्रत्यक्षात कशी आणावी ह्यासाठी आपण सन्माननीय, पुरोगामी समाजसेवक काव्यकान्त गणपती शास्त्री ह्यांनी परिषद बोलवावी आणि जातींचे केलेल्या कामाच्या पायावर पुनर्वर्गीकरण करावे ह्या प्रश्नाचा विचार करावा असे सुचवीत आहोत असे सांगितले. काव्यकान्त ह्या वेळेस काशी येथे गेले होते आणि त्यांच्या दक्षिणेतील पुनरामगनाची सर्वजण उत्कंठेने वाट पहात होते.

आपण सुचविलेला जाती प्रश्नावरील सर्वंकष तोडगा सर्वांना सोत्साह मान्य होईल अशी अय्यर ह्यांची अपेक्षा होती. परंतु प्रत्यक्षात त्या उलट डॉ. नायडू आणि ई. व्ही. रामस्वामी नायकर हे हिन्दू धर्मातील वर्णाश्रमाच्या मूलभूत संकल्पनेला विरोधी असल्यामुळे त्यांनी ह्या 'नव्या संकटाविरुद्ध' आपली मते उच्च स्वरात मांडली. आर्यपूर्व तमिळ समाजामध्ये जात अस्तित्वात नव्हती ह्या मुद्यावर त्यांनी दोघांनीही भर दिला आणि आपल्याला नंतरच्या वर्णाश्रम पद्धतीकडे जाण्यापेक्षा ही जुनी पद्धत पुन्हा आणणे अधिक पसंत आहे असे म्हटले.

१९२४ च्या अखेरीस काव्यकान्त गणपती शास्त्री दक्षिणेत परत आले आणि तिरुवन्नमल्लाई येथे तमिळनाडू कॉंग्रेस समितीच्या वार्षिक प्रांतिक परिषदेच्या स्वागत समितीचे अध्यक्ष म्हणून निवडले गेले. ह्या परिषदेच्या अध्यक्षपदी ई. व्ही. रामस्वामी नायकर ह्यांची निवड झाली. रामस्वामी नायकर ह्यांची पुढील दशकात 'पेरियार' म्हणजे समाजसुधारणेचे जाज्वल्य समर्थक म्हणून ख्याती झाली. समाजसुधारणा तातडीने अंमलात आणल्याच्या आवश्यकतेवर काव्यकान्त आणि रामस्वामी नायकर ह्या दोघांनीही भर दिला. आंतरजातीय भोजनपद्धत असावी ह्या कल्पनेस काव्यकान्तांनी संपूर्ण पाठिंबा दिला.

१९२५ च्या आरंभी, जानेवारी १७ ला तमिळनाडू काँग्रेस समितीने एक तीन सदस्यांची समिती नेमली. समितीने गुरुकुलमला रू. १०,००० मंजूर केले होते आणि त्यातले रू. ५००० देऊनही टाकले होते. समितीत काव्याकांत गणपती शास्त्री, त्यागराज चट्टिआर, के. एम्. थंगपेरुमल पिल्ले हे सभासद होते. गुरुकुलमूमधील सहभोजनाचा प्रश्न सामोपचाराने सोडवावा हा समितीपुढे प्रश्न होता. ही त्रिसदस्य समिती तोडगा काढण्यात अयशस्वी ठरली. त्यानंतर डॉ. वरदराजलू नायडू आणि ई. व्ही. रामस्वामी नायकर यांनी काँग्रेस समितीने गुरुकुलमूला अधिक पैसे देऊ नयेत असे ठरविले आणि पुढे मिळणार असलेल्या इतर देणग्या रोखण्याचा निर्णय घेतला. ह्या देणग्यांपैकी रू. २०,००० चे आश्वासन मलायामधून मिळाले होते आणि त्यापैकी काही जमाही झाले होते.

डॉ. नायडूंनी गुरुकुलमूच्या आश्रयदात्यांची एक बैठकही बेलावली. ह्या बैटकीला डॉ. राजन् सारखे ब्राह्मण आश्रयदाते उपस्थित राहिले नाहीत. बैठकीत अय्यर यांच्या भूमिकेवर टीका करण्यात आली आणि त्यांनी दोन ब्राह्मण विद्यार्थ्यांसाठी केलेली विभक्त भोजन व्यवस्था रद्द करावी अशी त्यांना विनंती करण्यात आली. ही विनंती मान्य झाली नाही तर गुरुकुलमूचा ताबा घेण्यासाठी 'सत्याग्रह' करण्यात येईल असा धाकही त्याबरोबर देण्यात आला. ह्याच्या पाठोपाठ सार्वजनिक सभांमधून एक कठोर आणि कर्कश्श अशी दमदाटी आणि शिव्यागाळीची मोहीमही उघडण्यात आली.

दरम्यान त्या वर्षीचे काँग्रेसचे अध्यक्ष महात्मा गांधी दक्षिणेत केरळ येथील वायकोम येथे येत असल्याची बातमी आली. वायकोम येथील प्रसिद्ध देवालयात हरिजनांना प्रवेश मिळावा ह्यासाठी गांधीवादी पद्धतीने एक सत्याग्रह मोहीम सुरू झाली होती. ह्या सत्याग्रहात भाग घेणाऱ्यांमध्ये रामस्वामी नायकर होते.

डॉ. वरदराजलू नायडू आणि व. वे. सु. अय्यर हे दोघेही महात्मा गांधींना प्रथम वायकोम येथे व नंतर पुन्हा मद्रासला भेटले. महात्माजींशी त्यांची चर्चा बंद दाराआड झाली आणि तिला वृत्तपत्रे किंवा जनता प्रतिनिधी यांचा प्रवेश नव्हता. म. गांधींनी चार ओळी लिहिल्या आणि मूळप्रत डॉ. नायडूंना देऊन अय्यरंना प्रत दिली. या चार ओळी काय होत्या हे अधिकृतरित्या केव्हाच कळू शकले नाही. गांधीजींच्या म्हणण्याप्रमाणे अय्यर यांनी आपली भूमिका थोडी मर्यादित केली. गुरुकुलमूमध्ये आंतरजातीय भोजनाच्या बाबतीत आणखी कोणताही अपवाद केला जाणार नाही अशी त्यांनी हमी दिली.

आता ज्या दोन मुलांचा अपवाद केला होता त्यांचे काय म्हणणे·हा प्रश्न राहिला होता. कारण इतरांच्या बाबतीत समदर्शी पद्धती अवलंबिली जाईल असे आश्वासन देण्यात आले होते आणि पाळलेही होते. डॉ. नायडू आणि रामस्वामी नायकर यांचे यामुळे समाधान व्हायला हवे होते पण तसे झाले नाही. दोन्ही बाजूंनी महात्माजींचा आपल्याला पाठिंबा असल्याचा दावा केला.

आंतरजातीय भोजनव्यवस्थेमध्ये गांधीजींची भूमिका नक्की काय होती ?

''यंग इंडिया'' साप्ताहिकाच्या १५ एप्रिल १९२५ च्या अंकात गांधीजींनी या प्रश्नाबाबत एक धोरणविषयक निवेदन केले.

''सहभोजन'' या शीर्षकाखाली लिहितांना गांधीजी म्हणतात, ''एक पत्रलेखक विचारतात'' वेगवेगळ्या जातीच्या आणि एकाच वस्तीगृहात राहाणाऱ्या मुलांना सामाहिक भोजनगृहात एकत्र जेवायला लावणे योग्य आहे काय ? प्रश्न फारसा चांगल्या पद्धतीने विचारलेला नाही, परंतु ज्या तऱ्हेने जो विचारला आहे त्याचे उत्तर असे- मुलांना सहभोजन करायला लावता येणार नाही, परंतु जे कोणी आपल्या भोजनगृहात दाखल होतील त्यांनी सहभोजन केलेच पाहिजे असा नियम कोणीही भोजनगृह व्यवस्थापकाला करता येणार नाही असा कोणी आग्रह धरला तर ? याचा अर्थ ज्यांना अशा अटीशिवाय प्रवेश दिला आहे, त्याच्यावर भिन्न जातीच्या मुलांबरोबर जेवणाची सक्ती केल्यासारखी होणार नाही. याविरुद्ध जोपर्यंत नियम नाही तोपर्यंत माझ्या कल्पनेप्रमाणे वेगळी भोजनव्यवस्था करणे आवश्यक आहे असा नियम लागू होईल. हा सहभोजनाचा प्रश्न गोंधळात टाकणारा आहे आणि माझ्या मते त्याबद्दल कोणताही कडक नियम करता येणार नाही. सहभोजन ही अत्यावश्यक सुधारणा आहे, याची मला व्यक्तिशः खात्री नाही. तरीही त्याला प्रतिबंधक असा नियम पूर्णपणे मोडण्याची प्रवृत्ती आहे हे मला माहीत आहे. प्रतिबंध करण्याच्या बाजूने किंवा विरुद्ध कारणे देता येणे शक्य आहे. मी सुधारणेची गती शीघ्र करण्याचा प्रयत्न करणार नाही. एका व्यक्तीने दुसऱ्या व्यक्तीबरोबर जेवणाचे नाकारले तर ते पाप आहे असे मी मानीत नाही. किंवा दुसऱ्या कोणी सहभोजनाची बाजू घेतली तर तेही पाप झाले असे मी मानीत नाही. मात्र दुसऱ्याच्या भावनांची कदर न करता नियम मोडण्याच्या प्रवृत्तीचा मी प्रतिकार करीन आणि उलट कोणाच्या सद्सद्विवेक बुद्धीला सहभोजन पटत नसेल तर त्या विकल्पाची मी बुज ठेवीन.'' महात्माजी बोलून गेले ते सक्तीने सहभोजन लादण्याच्या विरुद्ध असून दुसऱ्याच्या मनात जर विकल्प असेल तर त्याचा आदर करावा याबद्दल आग्रही होते हे स्पष्ट होते. त्यांच्या निर्णयामुळे अय्यर यांच्या मताला पाठिंबा मिळाला हेही उघड झाले.

परंतु ''यंग इंडियामध्ये'' म. गांधींचे टिपण देण्यापूर्वीच डॉ. नायडूंनी महात्माजींचा सल्ला मानीत नसल्याचा अय्यर यांच्यावर आरोप करण्यास सुरुवात केली. डॉ. नायडू आणि त्यांचे एक सहाय्यक तिरु वि. कल्याणसुंदर मुदलियार यांनी आग्रह धरला की गांधीजींची भूमिका आपल्याला समजायची असून ती पुढीलप्रमाणे आहे. अय्यर यांनी देणगीदारांची इच्छा मानवी आणि जर संस्था देणगीदारांच्या इच्छेविरुद्ध चालवायची असेल तर देणग्या परत करण्यास तयार व्हावे. बंद दाराआड जी चर्चा झाली तीत गांधीजींनी हा सल्ला दिल्याचाही त्यांनी दावा केला हे खरे होते की नव्हते याबद्दल काहीच कळणे शक्य नव्हते. ते काही असले तरी सुधारणावाद्यांनीसुद्धा गांधीजींचा सल्ला मानन्यास कबुली दिली असल्याने त्यांनी गांधीजींनी यंग इंडियामध्ये दिलेला उघड सल्ला दुर्लक्षून आपली

प्रतिकारात्मक चळवळ चालू ठेवावी हे विचित्र होते.

डॉ. वरदराजलू नायडू यांचे पुढचे पाऊल म्हणजे त्यांनी ''गुरुकुलाचा कबजा घेण्यासाठी सत्याग्रहाच्या'' निश्चित योजनेची केलेली घोषणा. ह्यासाठी जी मोहीम उघडली गेली त्याची सुरुवात त्यांच्या जन्मशहरी सालेम येथे भरलेल्या एका सार्वजनिक सभेत त्यांनी केली. त्यावेळी ते म्हणाले, ज्या अन्याय पद्धतीने ब्राह्मणेतर मुलांना गुरुकुलामध्ये वेगळे करण्यात आले ती असह्य होती.'' आपण आपला लढा शेवटपर्यंत नेणार असून वेळ आलीच तर आपण कॉंग्रेस सोडण्यासही मागेपुढे पाहाणार नाही. अय्यर यांना त्यांनी इषारा दिला, ''महिनाअखेर (एप्रिल १९२५) जर तुम्ही गुरुकुलाचा ताबा दिला नाही तर आपण श्रमदेवी येथे सत्याग्रह करू आणि गुरुकुलाचा ताबा घेऊ.''

आता डॉ. नायडूंचा इरादा कोणता होता ? सहभोजनाच्या प्रश्नावर तोडगा काढण्यात त्यांना रस होता अशी कल्पना करणे कठीण दिसते. ते आता अय्यर यांनी स्थापन केलेल्या गुरुकुलाचा ताबा घेऊन स्वतःच्या पद्धतीने चालवण्याच्या मनस्थितीत होते आणि ह्यासाठी त्यांनी रणशिंग फुंकले होते. गांधीवादी दृष्टिकोनापासून सुरुवात होऊन त्यांच्या मोहिमेचा आता ऱ्हास होऊन तिला एका संस्थेचा जबरदस्तीने कबजा घेण्याचे हिंसात्मक वळण लागले होते. एकसाथ पाठिंबा मिळाला नाही. तसेच डॉ. नायडू यांच्या मताचे कॉंग्रेसमधील सर्व ब्राह्मणेतरांनी स्वागत केले नाही. उदाहरणार्थ ॲडव्होकेट एम्. भक्तवत्सलम् यांनी एक लांबलचक निवेदन काढले आणि त्यात डॉ. नायडू ''हे सर्व साधारण ब्राह्मणेतरांची स्वतःच्या विपर्यस्त निवेदनाने दिशाभूल करीत असून ते जातीवादाचा देशाला वीट आला असतांना त्याचे पुनर्जीवन करीत आहे,'' असे म्हटले. आता अय्यर यांनी महात्मा गांधींच्या सूचनेला मान्यता दिली असल्याने यापुढे चळवळ करण्यात काहीच अर्थ नाही. गांधीजींची सूचना म्हणजे दोन विद्यार्थ्यांचा अपवाद सोडता इतरांसाठी सामाहिक भोजनगृहाची व्यवस्था करणे ही होती.

अय्यर यांनी आपल्या विरुद्ध होणाऱ्या आक्षेपक निवेदनांबद्दल अद्यापपर्यंत मौन पाळले होते. अखेर त्यांनी एक निवेदन काढले आणि त्यात म्हटले, ''मी जाहीरपणे आणि अंतिम निणर्यात्मक असे सांगतो की, ब्राह्मणेतर मुलांना ब्राह्मण मुलांबरोबर गुरुकुलात जेवायला बसण्याची बंदी आहे हे खोटे आहे. फक्त दोन ब्राह्मण मुले मी त्यांना परवानगी दिल्यामुळे वेगळे बसत आहे. यापुढे कोणीही विद्यार्थ्याला गुरुकुलात प्रवेश दिल्यानंतर सामाहिक भोजनगृहामधून कुठल्याही तऱ्हेची सूट देण्यात येणार नाही.'' गुरुकुलमूची मालमत्ता अय्यर यांनी दाखवून दिल्याप्रमाणे त्यांच्या स्वतःकडे प्रतिष्ठान म्हणून होती आणि ते स्वतः लवकरच एक विश्वस्त मंडळ निर्माण करणार होते. ''श्रीमान नायडू आणि इतरांनी ज्या लोकांनी आता आपले मत बदलले आहे व ज्यांनी पूर्वी गुरुकुलम् निधीला पैसे दिले आहेत. त्यांचे पैसे परत मिळावेत अशी मागणी केली आहे. त्यासंबंधी अय्यरनी सांगितले की आपण स्वतः जर गुरुकुलमूच्या मालमत्तेचे आणि निधीचे मालक असतो, तर एका

क्षणाचाही विचार न करता सर्व पैसे परत केले असते. परंतु आपण गुरुकुलम्चे विश्वस्त असल्यामुळे आणि गुरुकुलम् ही एक चालू सार्वजनिक संस्था असल्यामुळे आपल्याला तिच्या निधीच्या किंवा मालमत्तेच्या कोणत्याही भागाची विल्हेवाट लावण्याचा अधिकार नाही. आपण फक्त या गोष्टींचा विनियोग जनतेला त्यांची उपयुक्तता वाटत राहील अशा तऱ्हेने करू शकतो. अय्यर यांचे हे निवेदन निव्वळ योगायोगाने गांधीजींचे ''यंग इंडिया'' मध्ये ज्या दिवशी टिपण आले, त्याच दिवशी प्रसिद्ध झाले.

परंतु टिपण किंवा अय्यर यांचे निवेदन ह्यांच्या निंदकांचे शत्रूत्व कमी करू शकले अशा या वेळी संस्थेला वाचविण्यासाठी अय्यरना असे वाटले की, संस्थेच्या नेतृत्वाचा आपण राजीनामा देणे चांगले. २१ एप्रिलला त्यानी आपला राजीनामा पाठविला आणि गुरुकुलाच्या शिक्षक मंडळींना अशी विनंती केली की, त्यांनी नवा नेता निवडावा व त्यांच्याकडे सर्व मालमत्तेचा ताबा द्यावा. ''मला माझी जबाबदारी सोडून द्यावीशी वाटते कारण मग तुम्हाला तुमच्या प्रतिस्पर्ध्यांशी वाटाघाटी करता येतील. या मंडळींनी माझ्या संबंधी काही विशेष प्रकारची तिरस्काराची भावना जोपासलेली दिसते.'' असेही अय्यरनी म्हटले.

''हिंदू पत्राने'' हे सर्व होईपर्यंत अगदी तटस्थ भूमिका घेतली होती आणि गुरुकुलम् आंदोलनाचे वृत्त अगदी निपक्षपातीपणे दिले होते. या त्यांच्या समानतेच्या दृष्टीबद्दल डॉ. नायडूंनी त्यांची स्तुतीही केली होती. ''हिंदू'' ने अग्रलेख लिहून अय्यर यांच्या राजीनामाचे स्वागत केले आणि अशी आशा व्यक्त केली की दोन्ही पक्ष आता देवाण घेवाणीचे धोरण घेतील आणि ह्या आत्मघातकी आणि नाशकारक वादंगाचा शेवट करतील. त्यांनी विनंतीपूर्वक असेही सांगितले की भेकडपणाने पळून जाण्याने किंवा ज्यांची संमती नाही अशांच्या घशात सुधारणा कोंबण्याच्या प्रयत्नाने सामाजिक प्रश्न सोडवणे शक्य नाही.

परंतु अय्यर यांच्या राजीनाम्याने डॉ. नायडूंचे समाधान झाले नाही. गुरुकुलाची व्यवस्था ती घेण्यास नाखूष असलेल्यांकडे सोपवण्याचा हा कुटील डाव आहे असे त्यांना वाटले. एका जाहीर निवेदनात त्यांनी म्हटले, ''श्री. व. वे. सु. अय्यर यांच्या राजिनाम्याने परिस्थिती बदलत होती. मे च्या पहिल्या आठवड्यात मी श्रमदेवी येथे जाण्यास निघणार आहे. मी गुरुकुलाच्या प्रमुख देणगीदारास स्वतःच्या मालमत्तेचे त्यांना रक्षण करता यावे यासाठी त्यांनी श्रमदेवी येथे जावे अशा तऱ्हेच्या तारा करीत आहे. उत्तरेतील जनतेला व वृत्तपत्राला मी असा इषारा देण्याची परवानगी घेतो की, ब्राह्मणी वृत्तपत्राच्या गैर प्रचाराला त्यांनी बळी पडू नये. ''हिंदू'' आणि ''जस्टिस'' या पत्रांनी बऱ्याच प्रमाणात यथातथ्य बातम्या दिल्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. सर्व जातीजमाती आणि पक्षातील मित्रांना, ज्यांना गुरुकुलम् मोहिमेमध्ये मला सहाय्य करण्याची इच्छा आहे. त्यांना माझी अशी विनंती की, त्यांनी मला २९ व ३० एप्रिलला प्रसन्न व्यंकटेश्वरराव ह्यांच्या त्रिचनापल्ली

येथील वाड्यात भेटावे. ज्या मित्रांना आवश्यकता असेल त्यांना प्रवासखर्च दिला जाईल.''

तेव्हा आता हा प्रश्न आंतरजातीय भोजन सक्तीने किंवा स्वच्छेने असावे किंवा नसावे ह्यासंबंधी राहीला नव्हता. त्याला आता ''मालमत्तेचे संरक्षण'' आणि ''प्रवासखर्च देणे'' अशा तऱ्हेचे स्वरूप आले होते. डॉ. नायडू यांनी सर्व ब्राह्मण वृत्तपत्रांचा निषेध केला परंतु त्यात व्याजोक्ती अशी की ''हिंदू'' ची स्तुती करण्यात ते ब्राह्मण मालकी असणाऱ्या सर्वात मोठ्या वृत्तपत्राची स्तुती करीत होते !

त्रिचनापल्ली हे स्थळ निवडण्याचे कारण असे होते की तमिळनाडू कॉंग्रेस समितीची सर्वसाधारण सभा त्या दोन दिवशी तेथे भरणार होती आणि गुरुकुलमूचा प्रश्न सभेच्या कार्यक्रम पत्रिकेवर होता.

---

# कॉंग्रेस समितीत मतभेद

तमिळनाडू कॉंग्रस समिती तिरुची येथे एप्रिल २९ ला दुपारी २ वाजता तंग वातावरणात भरली. जसजशी बैठकीची तारीख जवळजवळ येत चालली तसे दोन्हीही शिबिरातल्या वातावरणात वाद वाढू लागले. निवेदन, कृती स्वमत प्रचार आणि सौदाबाजी यांचा हा परिणाम होता.

तमिळनाडू कॉंग्रेस समितीचे एक सभासद एम्. के. आचार्य यांनी एका ठरावाची सूचना दिली. ठरावात म्हटले होते की, ''सर्व बिगर राजकीय बाबतीत समिती पूर्णपणे तटस्थता पाळील आणि ज्या संस्थांना कॉंग्रेसकडून मदत मिळाली असेल त्यांना सर्व बिगर राजकीय बाबतीत संपूर्ण कृती स्वातंत्र्य देईल.''

एक मान्यवर ज्येष्ठ कॉंग्रेस नेते डॉ. नायडूंना लिहिलेल्या पत्रात म्हणतात, ''मी तुम्हाला वैयक्तिकरित्या सांगितल्याप्रमाणे माझे ठाम मत असे आहे की, गुरुकुलम् संबंधीच्या वादविवादाने कॉंग्रेस समितीत फूट पाडू देऊ नये. माझी अशी खात्री आहे की, कॉंग्रेसने गुरुकुलाला रू. ५००० ची देणगी दिली ती राष्ट्रीय शिक्षणाच्या कार्यासाठी. जोपर्यंत ह्या पैशाचा विनियोग तो ज्या कारणासाठी दिला, त्यापेक्षा अन्य कारणासाठी केला जात नाही. तोपर्यंत समितीला गुरुकुलाच्या व्यवस्थापनात ढवळाढवळ करण्याचा अथवा स्वयंपाक करण्याच्या, सहभोजनाच्या किंवा धार्मिक शिक्षणाच्यासुद्धा तपशीलात जाण्याचे काही कारण नाही. ह्या गोष्टींना ब्राम्हण-ब्राम्हणेतर ह्या जातीय दृष्टिकोणातून काही महत्त्व असले तर असेल, परंतु कॉंग्रेस कमिटीत ब्राम्हण, ब्राम्हणेतर आहेत, इतकेच नव्हे तर मुसलमान आणि ख्रिस्ती सभासदही आहेत तेव्हा तिला ह्या पूर्णपणे विशिष्ट जमातीतील भांडणात कोठलाही पक्ष घेण्याचे कारण नाही. . . . म्हणून मी आपल्याला अध्यक्ष म्हणून अशी विनंती करतो की ह्या प्रकरणाची चर्चा कॉंग्रेसच्या व्यासपीठावर करण्यास आपण अनुमती देऊ नये; कारण जर हे प्रकरण तेथे गेले आणि एक लहानशा अल्पसंख्य गटाला सुद्धा स्वीकारार्ह नसलेला निर्णय घेतला गेला, तर तो बहुमताच्या जुलमाचा एक प्रकार

होईल आणि माझी अशी खात्री आहे की अशा तऱ्हेचा आरोप समितीवर यावा हे आपल्याला कधीही रुचणार नाही.''

ह्या पत्राच्या प्रती डॉ. नायडूंकडे आणि प्रसिद्धीला वृत्तपत्रांकडे पाठवताना याकूब हसन यांनी लिहिले, ''आता गुरुकुलवादासंबंधी काँग्रेस समितीने काही मत व्यक्त करावे किंवा समितीने गुरुकुलाला दिलेल्या देणगीबद्दल काही कृती करावी, ह्यावर असा आग्रह डॉ. नायडू धरणार नाहीत अशी मला अपेक्षा आहे.''

परंतु तसे व्हायचे नव्हते. कारण तमिळनाडू काँग्रेस समितीच्या कार्यकारिणीने ह्या प्रश्नाची चर्चा केलीच आणि एक कार्यकारिणीचा अधिकृत ठराव काँग्रेस समितीपुढे आणला. ह्या ठरावात म्हटले होते ''गुरुकुल संस्थेने आपण राष्ट्रीय धोरणाशी एकनिष्ठ आहे असे जाहीर केलेले नाही आणि जातीयवादी भांडणे उकरून काढली ह्यामुळे गुरुकुलाला रू. ५००० ची देणगी दिल्याबद्दल तमिळनाडू काँग्रेस समितीला खेद होत आहे.''

श्रमदेवी येथे तमिळं गुरुकुलम्चे आणि भारद्वाज आश्रमाचे निवासी यांनी तमिळनाडू काँग्रेस कमिटीच्या बैठकीच्या आदल्या दिवशी तिरुचीला २८ एप्रिलला एक बैठक घेतली आणि तीत श्री. व. वे. सु. अय्यर यांचा राजिनामा खेदपूर्वक स्वीकारला आणि यांच्या जागी. टी. आर. महादेव अय्यर यांची गुरुकुलम्चे प्रमुख म्हणून निवड केली. एका निवेदनात आश्रमवासियांनी जाहीर केले की आपण गुरुकुलाच्या मालमत्तेचे रक्षण करण्याचा प्रयत्न करू.

ह्या घडामोडींमुळे तमिळनाडू काँग्रेस समितीची तिरुची येथील सभा जवळ येऊन ठेपलेल्या आगामी संकटाच्या जाणीवेतच भरली. चाळीस व्यक्ती उपस्थित होत्या. अध्यक्ष डॉ. वरदराजलू नायडू आणि ई. व्ही. रामस्वामी नायकर (दोघा सचिवापैकी एक) यांच्याशिवाय उपस्थित राहिलेल्या प्रमुख सभासदात सी. राजगोपालाचारी, डॉ. टी. एस्. एस्. राजन्, सालेमचे बॅरिस्टर टी. आदिनारायण चेट्टियार, एम्. के. आचार्य, तिरु वि. कल्याणसुंदर मुदलियार, एस. रामनाथन्, एस्. रामनाथम्, एन्. एस्. गरूडाचारी, मौलनी सय्यद मुर्तझासाहेब आणि के. सन्तानम् यांचा समावेश होता.

बैठकीच्या अध्यक्षस्थानावरून डॉ. नायडू यांना सांगितले की दुसऱ्यांच्या अग्रहावरून समितीपुढे गुरुकुल प्रकरण आपण आणावे असे आपले मन वळविण्यात आले. समितीने ५००० रुपयांची देणगी दिली असल्याने गुरुकुलाच्या कार्यात तिला रस होता. अधिकृत ठराव जर सभासदांना मान्य नसेल तर त्यांनी आपल्या विरुद्ध निंदाव्यंजक ठराव मंजूर करावा असेही त्यांनी सांगितले.

अय्यर यांनी सार्वजनिक भोजन व्यवस्थेची हमी घेतली होती काय ह्या प्रश्नावर थोडी चर्चा झाली आणि तशा तऱ्हेची लेखी हमी दिलेली नव्हती हे स्पष्ट झाले. डॉ. नायडू आणि रामस्वामी नायकर यांनी मात्र सांगितले की अय्यरंनी आपण सर्व मुलांना समान वागणूक

देऊ असे तोंडी वचन दिले होते. नायकर यांनी असाही आरोप केला की रू. ५००० च्या देणगीचा धनादेशही आपल्याला न सांगता संयुक्त सचिव के. एस्. सुब्रह्मण्यम यांनी देणगी देण्याबद्दलचा ठराव मंजूर झाल्याबरोबर दिला. त्यावेळेस आपण आणि इतर परगावी गेलो होतो. कार्यकारिणीचा ठराव औपचारिकपणे मांडला गेला वर सभासदांनी चार उपसूचना मांडल्या. पहिल्या उपसूचनेप्रमाणे अधिकृत ठरावातील ''परतफेड करण्याचे ठरले. ह्याऐवजी देणगी दिल्याबद्दल खेद वाटतो, हे शब्द घालावे असे सुचविले होते. दुसऱ्या उपसूचनेप्रमाणे समितीने रू. ५००० हजाराची मदत केल्याबद्दल खेद वाटतो. हे शब्द ठेवावे परंतु गुरुकुलमूच्या संघटनांकडून गुरुकुलाच्या पद्धती आणि कार्यप्रणाली यासंबंधी निश्चित निवेदन घेतल्याबद्दल कार्यकारिणीला दोष दिला होता.

सी. राजगोपालाचारींनी तिसरी उपसूचना मांडली ती पुढीलप्रमाणे होती. १. श्रमदेवी गुरुकुलमूसारख्या संस्थांच्या अंतर्गत व्यवस्थापनात बाहेरच्या मंडळींचा जो हस्तक्षेप होत आहे त्याबद्दल तमिळनाडू कॉंग्रेस समिती तीव्र खेद व्यक्त करीत आहे. समितीचे असे मत आहे की अशा संस्थांची कार्यवाही ज्यांच्याकडे आहे त्यांनी राष्ट्रीय ऐक्य आणि प्रगती यांच्याआड येणारे आणि संस्थेत चालत आलेले पूर्वग्रह यांच्या अडचणी आपणच स्वतः निर्णय घेऊन सोडवाव्या. हा निर्णय घेण्याची प्रत्येक बाबतीतील अडचणी आणि परिस्थिती यांचा योग्य तो विचार करावा. २. जे आंदोलन सुरू केले आहे त्याचा विचार करता तमिळनाडू कॉंग्रेस समिती श्रमदेवी गुरुकुलमूच्या संस्थाचालकांना असा सल्ला देत आहे, की गुरुकुलामधील सर्व विद्यार्थ्यांनी यापुढे कोठलाही भेदभाव न मानता एकत्र भोजन करावे.''

एस्. रामनाथन् यांनी मांडलेली चौथी उपसूचना पुढीलप्रमाणे, ''ही समिती अशा मताची आहे की जन्मावर आधारलेल्या गुणांची क्रमानुक्रमे मांडणी भारतीय सामाजिक जीवनात पाळली जाऊ नये. समिती अशी शिफारस करीत आहे की, हे तत्त्व राष्ट्रीय आंदोलनात सहभागी होणाऱ्या सर्व संघटनांनी पाळावे. ही समिती ह्या तत्त्वाची अंमलबजावणी श्रमदेवी गुरुकुलमूमध्ये होत आहे हे पाहाण्यास खाली सद्गृहस्थाची नियुक्ती करीत आहे : देवकोट्टाईचे श्री. व्ही. त्यागराज चेट्टियार, मायावरमूचे एस्. रामनाथन् आणि एरोड्याचे रामस्वामी नायकर.''

आपली उपसूचना मांडतांना सी. राजगोपालाचारी म्हणाले की श्रमदेवी येथे सध्या काम करीत असलेल्या संस्थेच्या स्वरूपाची संस्था सुरू करणे कठीण आहे. म्हणून त्यांनी विनंती केली की तिची अंतर्गत व्यवस्था जे ती चालवतात त्यांजकडे संपूर्णपणे सोपवावी. ज्या किरकोळ अडचणी येतील त्या सोडविण्याचा प्रयत्न करण्यास व. वे. सु. अय्यर निःसंशय तयार होतील. सहभोजनाचा प्रश्न अंतिमतः सुटेलच परंतु ह्या सुधारणेबाबत जो पर्यंत ती देशात मान्य होत नाही, तोपर्यंत घाई करण्यात अर्थ नाही. वेगळी भोजनव्यवस्था वसतीगृहे, शाळा, कॉलेज, देवालये आणि धर्मशाळांमध्ये - मग ती खाजगी असोत की

सरकारी मालकीची असोत- पाळली जाते. जोपर्यंत हा भेदभाव सर्व देशात पाळला जात आहे तोपर्यंत एकाच संस्थेबद्दल तक्रार करण्यात काही अर्थ नाही.

बेळगाव काँग्रेसने राष्ट्रीय शिक्षणासंबंधी मान्य केलेला एक ठरावही राजाजींनी वाचून दाखविला. आणि त्यातील सर्व अटी गुरुकुलम्‌कडून पाळल्या जातात असे म्हटले. त्यांनी असा सल्ला दिला की जी ध्येये नमूद करण्यात आली आहेत, ती प्रत्यक्षात आणण्याचे स्वातंत्र्य संस्थाप्रमुखांना मिळायला हवे. अय्यर ह्यांनी फार मोठा त्याग केला असून आपले जीवन गुरुकुलासाठी समर्पित केले आहे. आपण त्यांच्यावर विश्वास ठेवला पाहिजे आणि गुरुकुलम् योग्य तऱ्हेने चालविण्याची त्यांना संधी दिली पाहिजे.

ह्या उपसूचनेला अनुमोदन देतांना डॉ. सी. एस्. एस्. राजन् ह्यांनी सांगितले की दुसऱ्या कोणाहीपेक्षा आपले आणि व. वे. सु. अय्यर यांचे जिव्हाळ्याचे संबंध आहेत. कोणत्याही देशाच्या प्रगतीसाठी सहभोजनाची आवश्यकता नाही. ज्या अडचणींबद्दल आता तक्रार केली जाते, त्यांच्या पायावर जातीय हेवेदावे वाढविता कामा नयते. आपण स्वतः एकदा अस्पृश्य वस्तीत जाऊन त्यांना स्वच्छतेची कल्पना देण्याचा प्रयत्न केला. परंतु त्या आदिद्रवीड मंडळींनी हे आगमन म्हणजे आपल्यावर आलेली एक आपत्ती आहे असे मानले. त्यांनी आपली गाडगी मडकी फोडली आणि पळून जाण्याचा प्रयत्न केला. आजचे ब्राम्हण ब्राम्हणेतरांबरोबर जेवले तरी त्यांना अडचणींतून तोड काढता येणार नाही. ब्राम्हणेतर तरी पंचम लोकांबरोबर जेवण्यास तयार होतील का ? असेही त्यांनी विचारले.

डॉ. राजन् पुढे म्हणाले, ''व. वे. सु. अय्यर ह्यांनी देणगीदारांशी काही करार केले असतील. परंतू काँग्रेस समितीने सहभोजनाचा आग्रह धरणे योग्य होणार नाही. आपल्या स्वतःच्या माहितीप्रमाणे समितीला कुठलीही हमी देण्यात आलेली नाही आणि कुठलेही अभिवचन मागण्यात आलेले नाही. पहिले तीन चार महिने सहभोजन चालू होते. पण काही अडचणींमुळे अय्यर ह्यांनी दोन ब्राम्हण विद्यार्थ्यांच्या बाबतीत अपवाद केले, कारण त्यांच्या पालकांच्या आग्रहाची कदर करणे अवश्य होते. गुरुकुलम् आणि काँग्रेस समिती ह्यांचे परस्पर संबंध तरी काय आहेत ? पाच हजार रूपयांचे दिलेले अनुदान हाच काय तो त्यांच्या मधील दुवा होता. खादीच्या कामासाठी अनेक व्यक्तींना जे तीन लाखांचे अनुदान दिले गेले, त्यासंबंधी आपण काय केले आहे ? ह्या रक्कमेची परतफेड होण्यासाठी कांही प्रयत्न केले गेले आहेत का ? ज्यासाठी अनुदान दिले गेले, त्या कार्यासाठी ते वापरले गेले किंवा नाही हे कोणी शोधून काढले का ? अय्यर ह्यांनी पै न् पै गुरुकुलम् संस्थेसाठी खर्च केली आहे हे सर्वांना माहीत आहे.

कार्यकारी समितीच्या मूळ ठरावाला पाठिंबा देतांना तिरु. बी. कल्याणसुंदर मुदलियार ह्यांनी सांगितले, की आपण आणि अय्यर त्या दिवसापर्यंत अत्यंत खेळीमळीने एकमेकांशी वागत होतो. अय्यरनी आणि आपण तमिळ गुरुकुलम्‌ची जी कल्पना काढली

ती काही एक दिवसासाठी किंवा एक महिन्यापुरती नव्हती, तर कायमची होती. अजून सुद्धा अय्यर आणि आपण मित्र आहोत आणि तमिळच्या अध्ययनाबद्दल अय्यर ह्यांनी आपल्याला नुकतीच एक योजना सुचविली आहे. अय्यर ह्यांनी म. गांधींनी दिलेला निवाडा जर स्वीकारला असता, तर ह्या वादविवादाला आज आले तशा तऱ्हेचे गंभीर स्वरूप कधीच आले नसते.

एस्. रामनाथन् ह्यांनी मांडलेल्या चौथ्या उपसूचनेला पाठिंबा देतांना ई. व्ही. रामस्वामी नायकर ह्यांनी म्हटले की आपण सर्व शक्तीनिशी डॉ. नायडू ह्यांना केवळ पाठिंबाच देऊन थांबू नये, तर त्यांच्यावरील आपला गाढा विश्वास प्रकट करावा. प्रश्न केवळ सहभोजनाचा नाही. एका जातीची वरिष्ठता आणि दुसऱ्या जातीची कनिष्ठता ह्या गोष्टी नष्ट झाल्या पाहिजेत. केवळ ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर ह्यांच्यामधील भेद नाहीसे होऊन चालणार नाही. पंचम हे सुद्धा आपल्याला समान आहेत असे आपण मानले पाहिजे. ही परिस्थिती मान्य करण्याइतपत देशात जर अद्याप परिपक्वता आली नसेल, तर ह्या स्थित्यंतराच्या बाजूने सार्वमत तयार करण्याचे आपले कर्तव्य आहे.

वाय. एस्. षण्मुखम् चेट्टियार हे समितीचे सभासद नव्हते. परंतु त्यांनी गुरुकुलम्ची जागा खरेदी करण्यास मदत केली होती. अध्यक्षांनी त्यांना समितीपुढे ह्या प्रश्नावर बोलण्याची परवानगी दिली. त्यांनी सांगितले की तमिळ गुरुकुलम् चालविण्यात ज्यांनी मोठा रस घेतला, त्यापैकी आपण आहोत. आपण गुरुकुलमूच्या जागेची किंमत म्हणून तीन हजार रुपये दिलेले आहेत. आपल्याला असे वाटत होते की अय्यर ह्यांच्या नेतृत्वाखाली ब्राह्मणेतरांशी वागण्यात कोणताही भेदभाव केला जाणार नाही. आपण स्वतः श्रमदेवी येथे जाऊन भांडण मिटविण्याचा प्रयत्न केला. परंतु आपल्याला यश आले नाही. त्यांनी सभासदांना कार्यकारी मंडळाचा ठराव मान्य करण्याची विनंती केली.

नामादकलच्या महंमद उस्मान यांनी आणि मद्रासच्या हमीदखान ह्यांनी मुख्य ठरावाला विरोध केला.

रात्री उशिरापर्यंत बसून समितीने सर्व मुद्यांवर मतदान केले. अधिकृत ठराव आणि सर्व उपसूचना अयशस्वी झाल्या. ह्याला अपवाद म्हणून केवळ एस. रामनाथन् ह्यांची चौथी उपसूचना, - जीत तीन सदस्यांची समिती नेमावी असे सुचविले होते. ती मान्य झाली. ह्या उपसूचनेवरील मतदान १९ विरुद्ध ७ असे झाले.

तमिळनाडू कॉंग्रेस समितीच्या बैठकीनंतर समितीच्या चार प्रमुख सभासदांनी सी. राजगोपालाचारी, डॉ. टी. एस्. एस. राजन्, के. संतानम् आणि डॉ. टी. व्ही. स्वामीनाथ शास्त्री यांनी आपले समितीचे राजिनामे जाहीर केले.

'हिंदू' ला मुलाखत देतांना सी. राजगोपालाचारी म्हणाले, "आपण प्रांतिक कॉंग्रेस समितीचा राजीनामा दिला, कारण आपल्याला अध्यक्ष डॉ. नायडू ह्यांनी जे धोरण आखले आणि ज्या पद्धती अनुसरल्या त्यांच्याशी आपला संबंध नाही हे जाहीर करावयाचे

होते. डॉ. नायडू ह्यांच्या चीड आणणाऱ्या आणि प्रक्षोभक पद्धतींमुळे जातीय कटुता आणि हिंसक वातावरण निर्माण झाले आहे. आपण अशा मताचे आहोत की कोणाच्याही दृष्टीमुळे अन्नाचे प्रदूषण होते, हा एक धर्मभोळेपणाचा प्रकार आहे. गुरुकुलातील सर्व विद्यार्थ्यांनी एका कटुंबातल्या प्रमाणे एकत्र जेवले पाहिजे. परंतु ज्यांच्यावर संस्था चालविण्याची जबाबदारी आहे त्यांच्या सद्‌बुद्धीवर हा प्रश्न सोपविला पाहिजे. व. वे. सु. अय्यर ह्यांनी आपला विश्वास गमावला आहे असे मुळीच नाही. अशा संस्थांच्या अंतर्गत व्यवस्थापनाच्या तपशीलात जाऊन बाहेरच्या लोकांनी ढवळाढवळ करणे योग्य नाही.

एका वृत्तपत्रीय निवेदनात डॉ. टी. एस्. एस्. राजन् म्हणाले बेळगाव काँग्रेस अधिवेशनानंतर मद्रासमध्ये फारसे स्पृहणीय कार्य झालेले नाही .ह्या नाकर्तेपणाबद्दल प्रत्येक काँग्रेस सदस्याला वाईट वाटणे सहाजिकच आहे. परंतु प्रांतातील प्रत्येक प्रामाणिक हितचिंतकाला डॉ. वरदराजलू नायडू आणि त्यांचे देशबांधव ह्यांनी श्रमदेवी गुरुकुलाच्या सामाईक भोजनगृहासंबंधी जे वादळ आणि धूळ उठविली त्याबद्दल दुःख झाल्याशिवाय राहाणार नाही. जातीय वैमनस्य, आणि परस्पर अविश्वास ह्यांना हे लोक जबाबदार आहेत ह्यात काही शंका नाही. डॉ. राजन् पुढे म्हणाले केवळ एकत्र जेवण्यासाठी जेवावे, ह्या गोष्टीबद्दल मला फारसे प्रेम नाही. मी सर्व तऱ्हेच्या माणसांबरोबर जेवण घेतले आहे. श्री. व. वे. सु. अय्यर ह्यांनी ज्या तऱ्हेची भोजनव्यवस्था आपल्या गुरकुलम्‌मध्ये केली, तिचा मी समर्थक नाही. माझ्या मुलाला अशा गुरुकुलम्‌मध्ये पाठविण्यास मी नकार देईन. गुरुकुल वादामध्ये अय्यर ह्यांनी जी गोंधळाची निवेदने केली त्यांनाही माझा पाठिंबा नाही. मला असे वाटते की अय्यर ह्यांच्या मनातील हा गोंधळ सर्व जमातींना मान्य होईल, अशा तऱ्हेचा एक समझोता करावा अशा त्यांच्या इच्छेमुळे झाला असावा. असे असले तरी देणगीदारांचे धोरण स्थिर राहिलेले नाही. सामाईक भोजनव्यवस्थेच्या मागणीपासून सुरुवात करून ते गुरुकुलम्‌च्या व्यवस्थेमध्ये ढवळाढवळ करण्यापर्यंत गेले आहेत. आपल्या इच्छा जर पुऱ्या झाल्या नाहीत तर देणग्या परत कराव्यात अशीही त्यांनी मागणी केली आहे. गुरुकुलम्‌ला भरीव देणग्या देणाऱ्या देणगीदारांपैकी मी एक आहे. परंतु देणगीदारांच्या एका गटाने - तो गट कितीही बलशाली असला तरीही - दिलेल्या निर्णयास माझी संमती नाही. कारण ह्या निर्णयापर्यंत येत असतांना त्यांनी ज्या लोकांनी गुरुकुलम्‌च्या निधीसाठी थोडासा का होईना पण आपला वाटा उचलला आहे त्यांना हेतुपुरस्सर वगळले आहे.

अखेरीस डॉ. राजन् ह्यांनी म्हटले श्री. व. वे. सु. अय्यर ह्यांची कृती सर्वाथा समर्थनीय आहे असे मला वाटत नाही. परंतु दोष परिहार करण्यासाठी श्री. नायडू आणि नायकर ह्यांनी जी पद्धत अवलंबिली तिच्याशी मी सहमत नाही. एका वारूळाचा फार मोठा पर्वत करण्यात आला आहे म्हणून अत्यंत दुःखाने मी ह्या कार्यकर्त्यांच्या गटाशी माझे असलेले संबंध तोडण्याचे ठरविले आहे. ह्या गटाबरोबर काम करण्याचे सद्‌भाग्य मला

लाभले त्यांच्याबरोबर सत्याग्रह आणि असहकाराच्या महत्त्वाच्या वेळी मी कष्ट भोगले. ब्राह्मणांना जर काँग्रेसचेच कार्य करायचे असेल, तर त्यांनी ते शांततेने व मूकपणे करावे. चरख्याला जात माहीत नाही आणि सहभोजनाशी त्याचे भांडण नाही. म. गांधींनी आपल्याला मार्ग दाखवून दिला आहे आणि त्यांच्या चरख्याने देशाचे भाग्य ठरणार आहे. ह्या तऱ्हेने विचार करून मी माझा तमिळनाडू खादी मंडळाशी आणि तमिळनाडू प्रांतिक काँग्रेस समितीशी असलेला संबंध तोडून टाकीत आहे.

---

# प्रपाताची हाक

सी. राजगोपालाचारी आणि इतरांच्या तमिळनाडू कॉंग्रेस समितीतील राजिनाम्याचा डॉ. वरदराजुलू नायडू आणि त्यांचे सहाय्यक यांच्यावर कोणताही परिणाम झाला नाही. डॉ. नायडू यांनी आपण श्रमदेवी येथील तमिळ गुरुकुलम् ''हस्तगत'' करणार असल्याच्या उच्चस्वराने घोषणा केल्या होत्या; त्या योजना त्यांनी चालूच ठेवल्या. परंतु त्यांना टी. आर. महादेव अय्यर हे तुल्यबल प्रतिस्पर्धी भेटले. अय्यर यांच्या जागी ते नवे आचार्य म्हणून निवडून आले होते. महादेव अय्यर यांनी सर्व बाहेरच्या लोकांपासून गुरुकुलमूचे संरक्षण करण्याची सिद्धता जाहीर केली. डॉ. नायडूंच्या कृत्यांवर गुरुकुलमूच्या शिक्षकांपैकी एका ब्राह्मणेतर शिक्षकाने कडक टीका केली. कुंभलिंगम् पिल्ले ह्या त्या शिक्षकांनी एका निवेदनात सांगितले की गुरुकुलमूच्या शिक्षकवर्गापैकी आपण पहिलेच ब्राह्मणेत्तर असून आता तेथे दोनवर्षांवर आहो. त्यांनी पुढे म्हटले, ''मी माझ्या ब्राह्मणेतर मित्रांची पुन्हा एकदा खात्री करू इच्छितो की गुरुकुलाच्या अधिकारी मंडळींच्या स्वप्नातसुद्धा आपण ब्राह्मणेतरांना कनिष्ठ तऱ्हेची वागणूक द्यावी, असे येणार नाही.'' ब्राह्मणेतर समितीने गुरुकुलमूला भेट द्यावी आणि स्वतः परिस्थिती काय आहे ते पाहावे असे त्यांनी आमंत्रण दिले. ''ज्यांना राष्ट्रीय शिक्षणात रस आहे त्यांनी श्रीमान् अय्यर यांच्याशी सहकार्य करून ह्या संस्थेला आकाशदीपाचे स्वरूप द्यावे'' असेही त्यांनी सांगितले.

तंजावर येथे सु. सुब्रह्मण्यम मुदलियार यांच्या अध्यक्षतेखाली एका सार्वजनिक सभेत डॉ. नायडू यांच्यावर हल्ला करण्यात आला. ते गुरुकुलवादातून जातीय भेदांना उत्तेजन देत आहेत.'' आपण आणि आपले मित्र डॉ. नायडू यांच्या ''तथाकथित सत्याग्रहाविरुद्ध'' प्रति आंदोलन करण्यास तयार आहो असे सभेच्या अध्यक्षांनी सांगितले. त्यांनी सुमारे २२० लोक ह्या प्रति आंदोलनासाठी जमविले होते आणि ते गुरुकुलम् येथे जाऊन तेथील कामात ढवळाढवळ होणार नाही यावर लक्ष ठेवणार होते. ह्याच प्रमाणे सालेम् जिल्ह्यांतील नामाकिलचे उस्मान साहेब आणि तिरुचीचे हमीद खान यांनी ही डॉ. नायडूंच्या

चळवळीविरुद्ध प्रति आंदोलन सुरू करण्याची सूचना केली. वेंकटचल रेड्डियार यांनी त्यांना ह्याबाबतीत पाठिंबा दिला.

ह्या वातावरणात तमिळनाडू कॉंग्रेस समितीने नेमलेल्या एस्. रामनाथन्, ई. व्ही. रामस्वामी नायकर आणि व्ही. त्यागराज चेट्टियार ह्यांच्या त्रिसदस्य समितीने गुरुकुलमूला भेट देऊन अय्यर ह्यांची गाठ घेतली. ही मंडळी १२ मे १९२५ ला अमावास्येला येऊन पोचली. त्यांना अय्यर तर्पण करीत आहेत असे दिसले. हा पूजाविधी बहुधा अमावास्येच्या दिवशी केला जातो. तो पाहून बुद्धिवादी रामनाथन् आणि नास्तिक रामस्वामी नायकर अगदी अस्वस्थ झाले. अय्यर ह्यांच्याशी त्यांची चर्चा झाली. पण त्यामुळे परिस्थिती सुधारली नाही. फक्त जुन्या भुमिकांचा पुनरुच्चार झाला.

ह्यानंतर थोड्याच दिवसांनी विद्वान आणि पुरोगामी मतांचे पंडित काव्यकान्त गणपती शास्त्री यांनी गुरुकुलमूला भेट दिली. दोन्ही पक्ष त्यांना मोठा मान देत. त्यांच्या ध्यानात असे आले की मतभेदाचे मुद्दे फारच कमी असल्याने काही कामचलाऊ व्यवस्था होऊ शकेल. आत्तापर्यंत डॉ. नायडू ह्यांनी आपल्या काही आत्यंतिक मागण्या सौम्य केल्या होत्या व त्यामुळे तडजोड होण्याची शक्यता बरीच आहे असे काव्यकांतांना वाटले. त्यांनी सर्वांना सहाय्य करण्याची विनंती केली व 'सत्याग्रह आणि प्रतिसत्याग्रह' ह्याची सर्व भाषा सोडून देण्यास सांगितले. ह्या विनंतीला प्रतिसाद म्हणून महंमद उस्मान आणि व्यंकटचलम् रेड्डियार ह्यांनी डॉ. नायडू ह्यांच्या विरोधी अशा व्यासपीठावरील सर्व चळवळी आपण तात्पुरत्या स्थगित केल्या असल्याची घोषणा केली. परंतु त्यांनी दोन्ही पक्षांना इशारा दिला की गुरुकुलाच्या आजी व माजी आचार्यांना तत्त्वाचा बळी देऊ नये. गुरुकुलमूचे व्यवस्थापन बाहेरच्या एखाद्या समितीने करावे, ही गोष्ट धोकादायक आहे असेही त्यांनी सांगितले.

जवळजवळ दोन वर्षांच्या मेघगर्जना आणि कडकडाट कटू शब्द आणि क्लेशकारक कृतींनंतर वातावरण आता निवळत होते. काव्यकान्तांच्या मध्यस्थीमुळे परिस्थितीत पुन्हा विवेकशीलता प्रस्थापित होते होती. अंतिम समय जवळ आल्याची चिन्हे दिसत होती. गुरुकुलमूमध्ये मोठी सुधारणा करून त्याची उपयुक्तता सर्वांनी मिळून वाढवून एक नवा विस्तीर्ण प्रदेश दृष्टिपथात येत होता. काळ्या कुट्ट रात्रीनंतर विश्वास बसणार नाही, इतकी उज्ज्वल पहाट उगवत होती.

पण ती खरी उषा होती का ?
सगळीकडे अशा आणि प्रफ्फुल्लता असतांना
एका भावनोत्कट नाट्याचा सुखात्मक शेवट होत असतांना
कडवट भवितव्यतेने अनपेक्षित खेळी केली.
दैवाने आधीच विस्कटलेल्या चित्रावर एक बॉम्ब गोळा टाकला.

अय्यर ह्यांच्या अनपेक्षित आणि वीरवृत्तीला साजेशा व एका प्रपाताखाली घडून

आलेल्या निधनाची सुन्न करणारी वार्ता वज्राघाताप्रमाणे येऊन कोसळली.

वार्ता आली तेव्हा कोणाचाही तिच्यावर विश्वास बसेना. इतकी ती धक्कादायक होती.

बाहेरच्या जगाला मद्रासच्या हिंदूने ४ जून १९२५ ला बातमी दिली :

तमिळनाडूचे एक थोर सुपुत्र
व. वे. सु. अय्यर यांचे
अपघाती निधन

(आमच्या विशेष बातमीदाराकडून)

तीनवेल्ली, जून ४

श्रमदेवीहून आलेल्या खात्रीलायक बातमीवरून असे कळते की व. वे. सु. अय्यर ह्यांना पापनाशम् धबधब्याजवळ प्राणघातक अपघात झाला.

विद्यार्थ्यांच्या एका गटाला बरोबर घेऊन आणि स्वतःच्या मुलीसह श्री. अय्यर कल्याणतीर्थम् नदी ओलांडित असतां, मुलीचा पाय एका घसरड्या खडकावरून निसटून ती प्रवाहात पडली आणि वाहून जाऊ लागली. मुलीला वाचविण्यासाठी श्री. अय्यर तिच्या पाठोपाठ गेले. हाती आलेल्या वृत्ताप्रमाणे दोघेही वहात गेले आणि धबधब्यावरून खाली पडले. त्यांचा अजून पत्ता लागलेला नाही.

श्री. व. वे. सु. अय्यर ह्यांना वाचविण्यासाठी आश्रमातील एका मुलानेही नदीत उडी मारली आणि तोही प्रवाहाबरोबरा वहात गेला. परंतु त्याला वाचविण्यात आले.

अय्यर ह्यांच्या निधनाचे हे पहिले वृत्त स्थूलमानाने बरोबर होते. परंतु त्याचा तपशील चुकीचा होता.

प्रत्येकाला असे वाटत होते की, अजूनही एखादी बातमी यावी आणि पहिली बातमी खोटी ठरावी. अय्यर हे पट्टीचे पोहणारे म्हणून नावाजलेले होते आणि ज्या ठिकाणी अपघात झाला, तेथे कल्याणतीर्थम् नीदचे पात्र फारसे रूंद वा खोलही नव्हते. त्यामुळे अय्यर प्रवाहातून वहात जाऊन सुमारे १०० एक फुटांवर असलेल्या धबधब्यातून खाली पडले नसावेत अशी अशा करण्यास जागा होती.

दुर्दैवाने नंतर आलेल्या बातम्यांनी पहिल्या शोकमय वृत्ताला दुजोराच मिळाला. अनेक हृदयद्रावक तपशील हाती आले.

अय्यर हे स्वतः उत्कट निसर्ग प्रेमी होते आणि निसर्गप्रेमाचा संस्कार गुरुकुलातील विद्यार्थ्यांवर व्हावा ह्याबद्दल ते सदा उत्साही असत. जेव्हा संधी मिळेल तेव्हा ते विद्यार्थ्यांना खुल्या हवेत सहलीसाठी घेऊन जात. अशा तऱ्हेच्या सहलीत त्यांनी कोलुंदाना टेकड्या, पापनाशम् धबधबा, कोटलिम् धबधबा, कन्याकुमारी, तिरुचेन्दुर आणि इतर प्रेक्षणीय स्थळांना भेटी दिल्या. विद्यार्थ्यांच्या गटांबरोबर बहुधा शुद्धानंद भारती किंवा इतर शिक्षक असत. अय्यर ही बऱ्याच वेळा त्यांच्याबरोबर जात. अय्यर बरोबर असले की चालण्याचे व ओझी उचलण्याचे सर्व श्रम हलके होत. कारण वाटेत जात असतांना अय्यर विद्यार्थ्यांना

निसर्गाचे चमत्कार दाखवित आणि त्यांना वनस्पती आणि पशू यांच्याबद्दल माहिती देत. हातात एक दुर्बीण घेऊन ते विद्यार्थ्यांना दूरच्या टेकड्या व पर्वत आणि त्यांच्या कड्यांवरून कोसळणारे, सूर्य प्रकाशात चांदीप्रमाणे चमचम करणारे प्रताप किंवा पावसाळ्यात दिसणारे कृष्णमेघ, त्वरेने पुढेपुढे जाणाऱ्या ढगांनी आच्छादलेल्या पर्वतांच्या कुशींवर दिसणारे, सदा बदलणारे रंग क्षणात हिरवे मग निळे आणि सोनेरी- लहान लहान ओहळ व नद्या ही निसर्ग दृश्ये दाखवीत. त्यामुळे मनाला विश्रांती मिळे आणि श्रमपरिहार होई. पाण्यात पोहून मुले गारीगार होत आणि अय्यर त्यांच्याइतकेच तरुण होऊन ह्या मौजमजेत भाग घेत. पोहण्यानंतर उपहारामुळे सहलीच्या मोहकतेत भर पडे.

१९२५ मध्ये वार्षिक परीक्षा संपल्यानंतर मे च्या शेवटच्या आठवड्यात डोंगरावर सहलीसाठी जाणे हे ओघानेच आले. ह्यावेळेस श्रमदेवी येथून १५ मैलांवर असलेल्या पापनाशम् धबधब्याला त्यांनी पुन्हा भेट देण्याचे योजले. अय्यर ह्यांनी मुलांना तेथे पूर्वी एकदा नेले होते आणि तेथील सौंदर्याने त्यांना मंत्रमुग्ध केले होते. ह्या सहलीवर त्यांनी एक लेखही लिहिला होता आणि तो वर्तमानपत्रात प्रसिद्धही झाला होता. आताच्या वेळी मात्र अय्यर सहलीत दाखल झाले नाहीत. कारण गुरुकुलम्मधील एक शिक्षक आजारी पडले आणि त्यामुळे अय्यर ह्यांना थांबावे लागले. गुरुकुलमूचे विद्यार्थी आणि शिक्षक ह्यांचा गट पापनाशम् सहलीसाठी सोमवार ता. १ जून १९२५ ला निघाला.

परंतु प्रपाताचे आवाहन आणि भवितव्यतेचा एखाद्या मायाविनीप्रमाणे ऐकू आलेला मोहक भीषण स्वर अय्यर आणि त्यांची प्रिय कन्या सुभद्रा ह्यांना बोलावीत होते. भवितव्यतेने अय्यर कन्येचे रूप घेतले. वडील सहलीला जात नसल्याने प्रथम सुभद्रा वगळली गेली होती आणि त्यामुळे तिची मोठी निराशा झाली होती. आता तिने वडिलांच्या मागे सारखे टुमणे लावले की आपणही सहलीला निघू आणि मग पुढे गेलेल्या मुख्य तुकडीला जाऊन मिळू. मुलीने सतत केलेल्या आग्रहाने अय्यर ह्यांचे मन द्रवले आणि ते आपली मुलगी आणि मुलगा ह्यांच्यासह मंगळवार ता. २ जूनला संध्याकाळी पापनाशम्ला जाण्यासाठी निघाले. अंबासमुद्रम् रेल्वेस्थानकावर पोचून त्यांनी तेथे रात्र घालवली. आणि बुधवारी ३ जूनला सकाळी आठ वाजता पापनाशम् येथे गुरुकुलमूच्या तुकडीला ते जाऊन मिळाले.

पापनाशम् हे स्थळ पापनाशम् नावाच्याच धबधब्याजवळ वसले आहे. पापनाशम् धबधबा हा कोटलिम् धबधब्याच्या खालोखाल प्रसिद्ध आहे. तिरुनेलवेल्ली जिल्ह्यातील एकुलती एक महत्त्वपूर्ण नदी ताम्रपराणी ही सत्तर मैल लांबीची आहे. १८७९ मध्ये ए. जे. स्टुअर्ट ह्यांनी तिनवेल्ली जिल्ह्याची मार्गदर्शिका लिहिली आहे. तीत म्हटले आहे की फार पुरातन काळापासून ही नदी ज़िल्ह्याचा प्रमुख भाग बनली आहे. ही नदी म्हणजे एक सतत वाहाणारा प्रवाह आहे. नदीवर आठापेक्षा जास्त धरणे असून त्यांचा बांध भरभक्कम आहे. ते बहुधा पूर्वीच्या पिढ्यांनी केलेले असावे. ताम्रपरणी नदी पर्वताच्या

घाटमाथ्यावरून, डोंगरावरील वनातून, झुडपांच्या जंगलातून, ताडामाडांच्या रानातून वहाते. तिच्यावर अनेक धबधबे, चंदेरी पाण्याचे प्रपात असून तिच्या लहान लहान उपनद्या आणि शाखा आहेत. विहंगम दृश्यामध्ये ही नदी म्हणजे 'एक अरुंद, हिंरवी वळणावळणाची फीत असून तिच्या मध्यभागी चंदेरी रेषा दिसते. ही फीत ताम्रपरणी नदी आणि तिच्या पाटबंधाऱ्यांनी निर्माण झालेला हिरवा प्रदेश दर्शविते.

पापनाशम् धबधबा पोथिया टेकड्यामध्ये बऱ्याच उंचीवर आहे. पुराणातील अगस्ती ऋषी ह्यांचे हे वसतीस्थान आहे असे परंपरा सांगते. अगस्ती ऋषी दक्षिणेकडे येऊन तमिळ भाषा आणि तमिळ संस्कृती ह्यांचे प्रेरणा स्थान बनले. उंच पर्वतावरून वाहाणारी कल्याण तीर्थम् नदी अरूंद आणि उथळ पाण्याची जणू एक फीतच आहे. ती सहज ओलांडता येते परंतु प्रवाहाला जोर असल्यामुळे हे ओलांडणे धोक्याचे आहे. येणारे प्रवासी ह्या ठिकाणी नदी ओलांडतात. प्रवाहाच्या दिशेला दीडशे फूटांवर नदीचे पाणी एक उत्तुंग धबधब्याच्या रूपाने खडखडामधून उड्या मारीत सुमारे २५० फूटावरून खाली कोसळते. धबधब्याच्या पायथ्याशी एक प्रचंड डोह आहे. यात्रेकरू त्याचा उपयोग स्नानासाठी करतात. धबधब्यापासून जवळच पापविनाश् आणि लोकनायका यांचे देऊळ आहे. जवळचे दुसरे देऊळ अगस्ती ऋषींचे आहे. आपण प्रथम धबधब्याच्या पायथ्याशी येतो आणि नंतर टेकडी चढून धबधब्यावर जाते. तेथील भोवतालच्या मनमोहक दृश्यांची जादू अनुभवता येते.

अय्यर आपली मुलगी सुभद्रा आणि मुलगा कृष्णमूर्ती यांच्यासह पापानाशम् येथे आले आणि तेथे काही वेळ त्यांनी धबधब्याच्या पायथ्याशी घालविला. अय्यर यांनी आपली खादीची खांदापिशवी अगस्तीच्या देवालयात राहणाऱ्या चिद्भवानंद नावाच्या श्रीराम कृष्णमठातील ब्रम्हचार्याकडे दिली. चिद्भवानंद अय्यर यांच्या ओळखीचे होते.

चिद्भवानंद पापनाशमूला राहण्यास आले ते अय्यर यांच्यामुळेच. काही काळापूर्वी चिद्भवानंद आगगाडीतून दक्षिण मद्रास येथील तिरुवेल्लवेल्ली जिल्ह्यातील कोटलिम् येथे जाण्यास निघाले होते. तेथे एकांत स्थळी ध्यान धारणा व चिंतन करावयाचे होते. गाडीमध्ये त्यांची टी. आर. महादेव अय्यर यांच्याशी आकस्मात गाठ पडली. अय्यर आणि ते एकाच डब्यातून प्रवास करीत होते. अय्यर यांना श्रमदेवीच्या गुरुकुलमूला जावायचे होते. महादेव अय्यरने या तरुणाची चौकशी केली. परंतु चिद्भवानंदांनी आपली ओळख द्यावयाची नव्हती म्हणून त्यांनी मौन पाळले. जवळ जवळ एकतर्फी संभाषणात महादेव अय्यर, व.वे. सु. अय्यर त्यांच्या गुरुकुलमबद्दल बोलले त्या तरुणाने मनातल्या मनात ह्या गोष्टींची नोंद केली. परंतु त्यावेळेस त्याचे त्यांना विशेष काही वाटले नाही.

श्रमदेवी येथे गाडीतून उतरून महादेव अय्यर यांचे मन मोडता न आल्यामुळे चिद्भवानंद यांच्याबरोबर गुरुकुलम् आणि भारद्वाज आश्रमात गेले. तेथे त्यांची व. वे. सु. अय्यर यांच्याशी गाट पडली.

चिद्भवानंदांनी व. वे. सु. अय्यर यांना पाहिले त्याचक्षणी हा एक कोणीतरी ऋषी आहे असे त्यांना वाटले. अय्यर यांच्या उदात्त व्यक्तिमत्त्वाने त्यांच्या अंतःकरणात वादळ निर्माण झाले.

महादेव अय्यरांनी त्या तरुणाची ओळख करून दिली आणि अय्यर यांनी त्यांच्या प्रवासाची आणि त्यांच्या उद्दिष्टांची प्रेमळपणे चौकशी केली. त्यांना जेव्हा कळले की तो तरुण कोटलिम् येथे चिंतनासाठी जात आहे, तेव्हा त्यांनी पित्याच्या ममतेने त्यांना सांगितले कोटलिम् हे स्थान तितकेसे सोयीचे नाही; त्यापेक्षा पापनाशम् येथे गेल्यास अधिक चांगले. पापनाशमूच्या धबधब्याच्या पायथ्याशी अगस्ती ऋषींचे एक देवालय आहे. ते ग्रामीण आणि निःस्तब्ध अशा परिसरात आहे. म्हणून शांतपणे ध्यान करण्यासाठी पापनाशम् ही जागा उत्तम ठरेल.

अय्यर ह्यांच्या शब्दांनी चिद्भवानंद इतके प्रभावित झाले की त्यांनी आपले लक्ष्य बदलले आणि ते पापनाशम् येथे राहाण्यास गेले.

अशा तऱ्हेने अय्यर आणि त्यांची मुले येऊन पोचली, तेव्हा चिद्भवानंद पापनाशम धबधब्याच्या पायथ्याशी राहात होते. अय्यर ह्यांनी आपली पिशवी सुरक्षित राहावी म्हणून त्यांच्याकडे दिली आणि ते गुरुकुलमूच्या मुख्य गटाला येऊन मिळाले. पिशवी परत मागण्यासाठी ते कधीही परतले नाहीत.

अय्यर ह्यांनी धबधब्याच्या पायथ्याशी असलेल्या डोहात स्नान केले आणि पोहत ते मध्यभागी असलेल्या एका खडकावर बसून भोवतालच्या रमणीय दृश्याचे चिंतन करू लागले. स्नान आणि न्याहारी झाल्यावर गुरुकुलमूची सर्व मंडळी डोंगर चढून वर आली. तो एकादशीचा दिवस, म्हणजे अय्यर ह्यांच्या उपवासाचा दिवस होता. तरीही अय्यर त्या तरुणांबरोबर चालत राहिले. श्रमदेवीचे विभागीय उपदंडाधिकारी गुरुराव ह्या मंडळीबरोबर बरेच अंतर चालून गेले. आणि नंतर आपल्या शिबिरात परत आले.

ही सर्व मंडळी धबधबाच्या वर असलेल्या कल्याणतीर्थम् नदीजवळ येऊन पोचली. येथे पुन्हा भवितव्यतेने सुभद्रेकरवी काम साधले. सुभद्रेने ह्या अरूंद जागी नदी ओलांडून जाण्याची इच्छा व्यक्त केली. नदीत फारसे पाणी नव्हते. परंतु प्रवाह जलद होता. ज्यांच्यावरून उड्या मारायच्या ते खडक निसरडे होते. प्रथम सर्व मंडळींना ह्या ठिकाणाहून नदी ओलांडू देण्यात अय्यर नाखुष होते. कारण दीडशे फुटांच्या अंतरावरच नदीचे रूपांतर पापनाशमूच्या भव्य धबधब्यामध्ये होत होते.

परंतु भवितव्यतेचे आवाहन कोण टाळू शकणार ? सुभद्रेचा आग्रह यशस्वी ठरला आणि सर्व मंडळींनी नदी ओलांडण्यास सुरुवात केली. एका खडकाजवळ प्रवाहात अय्यर उभे राहिले. त्या ठिकाणी पाणी जलद वाहात होते. तेथून अय्यरनी सर्व मुलांना एका मागून एक जाण्यास मदत केली. मुलांनी तशी नदी ओलांडली तशी सुभद्रेलाही मध्ये असलेल्या खडकावरून किनाऱ्यावर असलेल्या दुसऱ्या दगडावर उडी मारायची होती. परंतु अय्यर ह्या

गोष्टीस कबूल नव्हते. त्यांना वाटले की तिच्या पायघोळ परकराने (पाव दाई) तिला नीट उडी मारता येणार नाही. सुभद्रेला ह्याचा राग आला. आणि तिने प्रश्न केला, ''मला नेहमी झांशीची राणी हो असं सांगणारे माझे वडील तुम्हीच का ? आता जाऊ नकोस असे म्हणत आहात'' हा अक्षरशः भवितव्यतेचाच निर्घृण स्वर होता.

ह्या अनुत्तरित करणाऱ्या प्रश्नाने अय्यर गप्प झाले आणि त्यांनी सुभद्रेला एका दगडावरून दुसऱ्यावर उडी मारण्यास मदत केली व शेवटी तिला दुसऱ्या तिरावरील एका पक्क्या खडकावर उभी केली. नंतर मागे वळून ते दुसऱ्या एका मुलाला मदत करू लागले तेव्हढ्यात त्याना 'आप्पा' अशी हाक ऐकू आली. त्यांनी मागे वळून पाहिले तर सुभद्रा पाण्यात पडून धडपड करतांना दिसली. वडिलांची पाठ वळली असतांना, ती घसरून पाण्यात पडली होती.

निमिषार्धात मुलीला वाचविण्यासाठी अय्यर ह्यांनी नदीत उडी मारली.

प्रवाहाला जोर होता आणि खडक निसरडे होते तरी सुद्धा अय्यर आपल्या मुलीजवळ येऊन पोचले. मुलीच्या केसांना धरून तिला पाण्याबाहेर आणतांना ते एकदा दिसले पण हे केवळ एका निसटत्या क्षणापुरतेच. मुलीचे केस त्यांच्या हातून निसटले व गदगदणाऱ्या पाण्यात सुभद्रा वाहून जातांना दिसली धबधब्याच्या कडेच्या अती जलद प्रवाहात अय्यरही वाहू लागले आणि प्रचंड प्रपाताच्या कड्यावरून खाली कोसळले.

प्रथम सर्वांना असे वाटले की अय्यर व सुभद्रा दोघेही धबधब्यामधून खाली पडले. परंतु नंतर असा शोध लागला की सुभद्रेचे शरीर धबधब्याच्या वर खडकाच्या एका कपारीत अडकून राहिले होते. अय्यर एकटेच धबधब्यातून खाली फेकले गेले.

आश्रमातील एक मुलगा राघव पोडुवाल नदीत पडला. हिंदूने बातमी दिल्याप्रमाणे त्याने अय्यरना वाचविण्यासाठी उडी घेतली नव्हती. जलद वेगाने घडून आलेल्या प्रसंगांनी तो भयचकित झाला आणि अपघाताने नदीत घसरून पडला. नदीच्या मध्यभागी असलेल्या एका खडकाला आपला जीव वाचविण्यासाठी त्याने घट्ट धरले आणि तेथे तो लोंबकळत राहिला. तेथे आलेल्या एका गुलाम घोष नावाच्या शूर मुसलमान प्रवाशाने त्याला महप्रयासाने वाचविले.

ह्या दुहेरी दुःखमय प्रसंगाची वार्ता श्रमदेवी, काल्लिदायी कुरुच्ची, अंबासमुद्रम् व भोवतालच्या सर्व शहरात व खेड्यात पसरली आणि सर्वांवर जणू वज्राघात झाला. टी. आर. महादेव अय्यर, कालिदायी कुरुच्ची येथे होते. गात्रे बधीर करणारी ही बातमी ऐकून ते पापनाशम् येथे त्वरेने गेले. उपविभागीय दंडाधिकारी गुरुराव ही अपघातस्थळी येऊन पोचले. अजून प्रेते मिळाली नव्हती. वरच्या कल्याणतीर्थ नदीपासून सर्व लहान लहान धबधबे आणि पायथ्याशी असलेल्या डोहामध्ये कसून शोध सुरू झाला. शोध करणे सोपे जावे म्हणून प्रवाहाचा वेगही कमी करण्यात आला.

अय्यर ह्यांच्या पत्नी भाग्यलक्ष्मी आम्मल तिरुची जिल्ह्यातील कुलिटालाई ह्या गावी

आपल्या काही नातेवाईकांकडे राहायला गेलेल्या होत्या. त्यांना तारेने ही बातमी कळविण्यात आली. त्या तिरुची पर्यंत एका मालगाडीने आल्या आणि तेथून एका प्रवासी गाडीने अपघाताच्या दुसऱ्या दिवशी त्या पापनाशम् येथे येऊन पोचल्या.

सुभद्रेचे प्रेत चार दिवसांनंतर धबधब्याच्या वर कल्याणसुंदर नदीमध्ये एका कपारीत अडकलेले सापडले. अय्यर ह्यांचा देह दुसऱ्या दिवशी धबधब्याच्या तळाशी सापडला.

---

# ''राष्ट्राचा दीर्घोद्योगी सेवक''

अय्यर यांच्या निधनाने त्यांच्या जन्मगावी तिरुची येथे विषादाची छाया पसरली.

डॉ. टी. एस्. एस्. राजन् अय्यर यांचे बालमित्र आणि क्रांतिकार्यातील लंडनच्या इंडिया हाऊसमधील सहकारी यांना ही बातमी कळल्यावर ते पाच मिनिटे निःशब्द उभे राहिले. त्यांचे अश्रू गालावरून ओघळत होते. डॉ. राजन् यांच्या आठवणीत अय्यर मद्रास विद्यापीठाचे प्रदिप्त प्रज्ञेचे पदवीधर होते. तिसऱ्या तिरुचीच्या सेंट जोसेफस कॉलेजमधून ते पहिल्या श्रेणीत बी. ए. उत्तीर्ण झाले. ज्या थोड्या ब्राम्हण विद्यार्थ्यांनी लॅटीन ही दुसरी भाषा घेतली. त्यापैकी अय्यर एक होते. लॅटीनप्रमाणे संस्कृत, तमिळ आणि फ्रेंचचेही ते पंडित होते. लंडनच्या लिंकनस् इन् मध्ये रोमन कायद्यामध्ये पहिले आले. नंतरच्या परीक्षातही ते सहज उत्तीर्ण झाले. परंतु क्रांतिकारी चळवळीत संपूर्ण मग्न झाल्यामुळे त्यांनी त्यात लक्ष घातले नाही.

''अय्यर यांचा जन्म जरी गरीब आईवडिलांच्या पोटी झाला असला तरी अय्यर यांच्या जीवनक्रमात स्वभावतः व्यक्तिवैशिष्ट्ये होते. त्यांचे खाजगी जीवन पराकाष्टेचे शुद्ध होते आणि त्यांनी काही मूलभूत गुणांच्या अनुरोधाने ते व्यथित केले. हे मूलभूत गुण म्हणजे त्यांची जिवंत निष्ठा होती.

सालेमहून डॉ. पी. वरदराजलू नायडू यांनी ''हिंदू'' ला एक तार पाठविली आणि तीत म्हटले ''गुरुकुलवादातील निर्णय दृष्टीसमोर असता अय्यर यांचे निधन हे खरोखर दुःखदायक आहे. अय्यर यांचे वाङ्मयीन व देशभक्तीपर गुण संशयातीत होते.''

ई. व्ही. रामस्वामी नायकर यांनी व्हिक्टोरिया मार्केटमधील एका सभेत डॉ. वरदराजलू नायडू यांच्या अध्यक्षतेखाली अय्यर यांना श्रद्धांजली वाहिली. गेल्याच आठवड्यात आपण गुरुकुलम्‌ला भेट दिली तेव्हा जवळ जवळ सर्व मुद्यावर निर्णय झालेला होता असे त्यांनी सांगितले. एक उद्योगपती डब्ल्यु. पी. इगूनॅशिअस हे कट्टर राष्ट्रवादी होते. ते एका निवेदनात म्हणाले.'' गुरुकुलम आंदोलनामुळे कदाचित अशी समजूत झाली असेल की

अय्यर सामाजिक बाबतीत प्रतिगामी होते. पण तसे मुळीच नव्हते. त्यांनी जी बाजू घेतली तिचे कारण सुधारणा अंमलात आणण्यापूर्वी योग्य मनोभूमिका तयार करण्याची त्यांची इच्छा होती. त्यांनी मला हे स्वतः त्यांच्याशी मी बोललो तेव्हा अधिकृतपणे सांगितली. इतरांचे त्यांच्याशी मतभेद असतील आणि त्यांच्याविरुद्ध प्रामाणिकपणे त्यांच्या लढाया झाल्या असतील पण त्यांचा स्वतःच्या मनावर विश्वास होता. व्यक्तिशः ते सर्व जातीचे आणि धर्माच्या लोकांबरोबर जेवीत. आपण दुसऱ्यावर काही मेहरबानी करीत आहो अशी त्यांची भावना नव्हती.

मौलानी सय्यद मुर्तझा साहेब, विधान सभेचे सभासद, तिरूची येथे एका शोकसभेच्या अध्यक्ष स्थानावरून म्हणाले की अय्यर हे त्यांच्या शालेय जीवनापासून देशाच्या खेदजनक परिस्थितीबद्दल दुःखी असत. ही परिस्थिती सुधारणे त्यांच्या सदैव मनात असे. ते वकील असताना व्यावसायिक कामासाठी फारसा वेळ खर्च करीत नसत परंतु आपल्याशी आणि इतरांशी देशाची प्रगती कशी होईल ह्याबद्दल तासनूतास बोलत असत. ते देशभक्त आहेत हे इंग्लंडला जाण्यापूर्वीच सर्वांना माहीत होते.

तिरू. वि. कल्याणसुंदर मुदलिया आपल्या नवशक्ति साप्ताहिकात संपादकीय लिहिताना म्हणतात," तमिळनाडूने जीवन समर्पित करणारा आपला पुत्र गमावला आहे, कम्बन् यांनी आपला जीवश्च कंठश्च सहचर गमावला आहे, आपण आपला प्राणप्रिय मित्र गमावला आहे." अय्यर हे सर्वगुणांची मूर्तिमंत प्रतिमा होते आणि एखाद्या ऋषीप्रमाणे लोकात वावरताना त्यांच्या मुद्रेवर मधुर स्मित असे

महात्मा गांधींनी "यंग इंडिया" मध्ये एक लहानसे टिपण लिहिले. ते त्यात म्हणतात," श्रीयुत व. वे. सु. अय्यर यांच्या बुडून झालेल्या निधनामुळे मला जे दुःख झाले त्यात "यंग इंडिया" चे सर्व वाचक सहभागी होतील. अनेक वर्षापूर्वी मला त्यांना लंडन येथे भेटण्याचा सुयोग आला होता. तेव्हा ते जहाल अराज्यवादी होते. परंतु नंतर ते मवाळ झाले. तरीही देशभक्तिची ज्योत त्यांच्या हृदयात तितक्याच तेजाने तेवत होती. ते कट्टर असहकारवादी होते आणि अलीकडे श्रमदेवी गुरुकुलमूला आपले जीवन समर्पित करावे अशी त्यांची इच्छा होती. ते एक विशुध्द, निष्कपट आणि राष्ट्राचे दीर्घोद्योगी सेवक होते. त्यांच्या आत्म्यास सद्‌गती मिळो."

परंतु सर्वात हृदयस्पर्शी प्रशंसोद्‌गार काढले ते विनायक दामोदर सावरकर यांनी. "मराठा" पत्रात प्रसिद्ध झालेल्या काव्यमय गौरव लेखात त्यांनी म्हटले :

"आमच्या जीवनात दारुण दुःखांनी अनेक वेळा कटुता आली. परंतु हे मित्रा, तुझ्या आकस्मिक निधनाने आम्हाला जे दुःख झाले त्याने आमच्या सहनशीलतेचा अंत पाहिला. त्या महत्त्वपूर्ण वर्षांच्या आणि कसोटीच्या क्षणांच्या स्मृती भरतीच्या लाटांप्रमाणे आक्रमण करून प्रकट होण्यासाठी धडपडत आमच्या हृदयाच्या कवाडांवर पुनः पुन्हा आघात करतात. त्या सर्व निवेदन करता याव्या आणि आमच्या स्मृतिवृत्तांतपट उलगडावा ही

आमची केवढी इच्छा ! परंतु आम्हाला आमचे ओठ मिटून मोहबंद करून ठेवले पाहिजेत. जेव्हा तुझा द्रोह केला तेव्हा तू अविचल राहिलास आणि ज्यांनी तुला धिःकारले त्यांची तू सेवा केलीस. अज्ञात आणि मर्यादाशील होतास तेव्हा तू किती क्लेश भोगलेस आणि सुविख्यात झालास तेव्हा त्याबद्दल कधी अवाक्षरही काढले नाहीस. इतका तुझा चांगूलपणा आणि विनम्रवृत्ती. ह्या जीवनाची उदात्त कथा आज, किंबहुना सदैव, अकथित राहील. कारण ज्यांना ती माहीत आहे ते जिवंत असेपर्यंत ती सांगण्याची वेळ आलेली नसेल आणि जेव्हा ती वेळ येईल तेव्हा जे सांगण्याजोगे आहे ते दडून राहणार नाही तर उत्कटतेने ऐकले जाईल परंतु तोपर्यंत जी पीढी ते सांगू शकली असती. ती या लोकातून निघून गेली असेल. तुझ्या महत्तेच्या तेजात कधी मालिन्य येणार नाही पण दृष्टिपथात न येणाऱ्या हिमालयाच्या उत्तुंग शिखराप्रमाणे ते अगम्य राहील. एखादा भव्य प्रसादाचा पाया जसा भूमित दडलेला राहतो. तशी तुझी सेवा व स्वार्थ, त्याग काळोखात बुडून राहील. हा मजूकर सावरकर यांनी १९२५ मध्ये लिहिला. तो स्वातंत्र्यपूर्व काळ होता हे लक्षात ठेवले पाहिजे. त्यावेळेस राष्ट्रवादी चळवळीवरील दडपशाही अत्यंत तीव्र होती. आर. ए. पी. परिपूर्ण पुष्प अनुभवाने समृद्ध भोगलेल्या क्लेशांनी परिपक्व जनसेवेत आणि ईशसेवेत सदा मग्न हिंदू संघटनेच्या कार्याचा तो म्हणजे एक उत्कृष्ट आणि अग्रिम असा कैवारी झाला असता.

"१९०७ साली किंवा त्या सुमारास एक दिवस लंडनमधील प्रख्यात इंडिया हाऊसच्या मोलकरनीने आम्ही भोजनासाठी खाली जात असता आमच्याकडे एक भेटपत्र दिले आणि सांगितले की एक सद्गृहस्थ दिवाणखान्यात वाट पाहात आहे. थोड्याच वेळात दार उघडले आणि अद्यावत पद्धतीकडे कल असलेल्या व्यवस्थित युरोपीयन पोषाखातील सद्गृहस्थांनी आमच्याशी आतीव स्नेहाने हस्तांदोलन केले. आपण रंगून येथे वकील होतो आणि इंग्लंडला बॅरिस्टरची उपाधी मिळविण्यासाठी आलो आहो असे त्यांनी आम्हाला सांगितले. आपली इंग्रजी संगीत शिकण्याची इच्छा व त्याबरोबरच नृत्याचे काही पदन्यास शिकण्याची मनिषाही त्यांनी बोलून दाखविली. ते स्वतः वयाने तिशीच्यावर दिसत होते. आणि आम्ही देखील इतके तरुण असल्याबद्दल त्यांनी आश्चर्य व्यक्त केले. आम्ही नेहमीप्रमाणे सौम्य निषेध करून म्हटले, आपल्या समोर महत्त्वाच्या समस्या उभ्या असताना तरुणपणातील शक्ती सवंग करमणुकीत फुकट जाते. सद्गृहस्थांची खात्री पटलेली दिसली नाही. परंतु त्यांच्यावर प्रभाव मात्र पडलेला दिसला. आपण वरचेवर येऊ असे त्यांनी आम्हाला अभिवचन दिले. हे गृहस्थ म्हणजे व. वे. सु. अय्यर.

"१९१० साली मार्चच्या सुमारास ब्रिस्टल येथे लंडनच्या त्या भयानक तुरुंगात कैदी म्हणून नुकतेच दाखल झालो होतो. पहारेकऱ्यांनी भेटीसाठी येणाऱ्यांच्या नावाचा पुकारा केला. आम्ही काळजीपूर्वक उत्सुकतेने कैद्यांच्या रांगेतून भेटण्याच्या जागेकडे गेलो. आम्ही गजाआड उभे राहिलो. आम्हाला भेटायला येऊन लंडन पोलिसांची इतराजी ओढवून घेणारे कोण असेल याचे आम्ही आश्चर्य करीत होतो. कारण भेटायला येऊन आमची ओळख

दाखवणे ही अखेर तुरुंगाच्या गजाआड जाण्याची निश्चित पायरी होती. भेट घेणारांना आत येऊ दिले. ते खिडकीजवळून गेले. लवकरच एक उमद्या व्यक्तिमत्त्वाची व्यक्ती आमच्या समोरील बंदिस्त जागेत येऊन उभी राहिली. ही व्यक्ती म्हणजे व. वे. सु. अय्यर. त्यांची दाढी छातीला चिटकून रुळत होती. त्यांचा पोषाख गबाळा होता. ते आता पूर्वीसारखे अत्यंत व्यवस्थित आधुनिक पद्धतीचा पोषाख केलेले 'जंटलमन' नव्हते. त्यांची शरीर यष्टी आता जीवित समर्थणाच्या ध्येयाने पालटून गेली होती. ''नेताजी !'' ''त्यांनी भावनापूर्ण स्वरात आम्हाला संबोधिले. तुम्ही पॅरिस सोडून का आलात ?'' आम्ही त्यांचे सांत्वन करीत म्हटले. ''याची चर्चा येथे करण्यात काय अर्थ आहे ? बरोबर असो की चूक असो मी येथे तुरुंगात अडकलेला आहे. आणि यातून उत्तम मार्ग म्हणजे पुढे काय करायचे आणि वर्तमानाला तोंड कसे द्यायचे हा आहे.

आम्ही पुढील बेताची चर्चा करीत असताना घंटा झाली. द्वाररक्षक पळत आले. त्यांनी दरडावून आम्हाला सांगितले, ''आता वेळ झाली'' जड अंतःकरणाने आम्ही एकमेकांच्या डोळ्याकडे पाहिले. कदाचित ही एकमेकांना पाहाण्याची शेवटचीच वेळ आहे. हे आम्हाला कळले. अश्रू उभे राहिले ते आवरून आम्ही म्हटले, ''छे छे ! आपण हिंदू आहोत आपण गीता वाचली आहे. ह्या सहानुभूतीशून्य लोकांच्या घोळक्यांपुढे रडता उपयोगी नाही. आम्ही हिंदीत बोललो. जिज्ञासू इंग्रज लोकांचा घोळका तरुण भारतीय बंडखोर आणि त्यांचा मित्र यांच्याकडे पहात होता. आम्ही एकमेकांपासून दूर झालो ते दिसेनासे होईपर्यंत मी त्यांच्याकडे पाहिले आणि म्हटले, ''अरेरे ! ह्या प्रेमळ माणसाची भेट होणे आता जवळजवळ आवश्यक आहे कारण भवितव्यात माझ्यापुढे दोन गोष्टींपैकी कोणतीतरी एकच उभी राहाणार होती. फाशी किंवा अंदमान ! आणि ह्या दोन्हीमध्ये माझ्या मित्रांना पाहाणे अशक्यच होते.

''ही गोष्ट १९१० सालची चौदा वर्षे उलटली आणि अशक्य ते प्रत्यक्षात आले. मृत्यूच्या अजस्त्र साम्राज्याच्या सरहद्दीशी जवळीक करण्याच्या अत्यंत भयकारक व वक्र अशा जीवनाच्या भूम्यंतर्गत मार्ग, उपमार्ग आणि आडमार्गांवरून प्रवास करून झाल्यावर मी श्रीयुत अय्यर यांना दोन महिन्यापूर्वी भेटलो ते मद्रास ते मुंबई हे अंतर प्रवास करून आम्हाला आनंदाच्या रोमांचकारी मदिरेचे दर्शन देण्यासाठी काही तास भेटायला आले होते. काही काळपर्यंत आम्ही क्लेशकारक व यातनामय भूतकाळाची कटुता विसरलो आणि मोठ्या सुट्टीनंतर भेटणाऱ्या शाळा सोबत्याप्रमाणे एकमेकांशी आनंदीवृत्तीने गप्पा मारून त्यांनी माझा निरोप घेतला. ते दिसेनासे होईपर्यंत मी त्यांना पाहात राहिलो आणि मनाशी म्हटले, 'आता मी त्यांना केव्हा वाटेल तेव्हा पाहू शकेल.'

पण ते लवकरच मानवाच्या बोलण्याच्या पलिकडे जाऊन अदृश्य होणार होते याची मला काय कल्पना ? मानवी बुद्धी नकारार्थी मान हलवून 'अशक्य' असे उद्‌गारली तेव्हा परिस्थितीने अशक्य ते शक्य करून दाखविले आणि जेव्हा बुद्धीने आनंदाने स्वतःला

आश्वासन दिले की 'आता मला जेव्हा वाटेल तेव्हा', त्यावेळेस भवितव्यतेने कठोरपणे म्हटले, 'नाही, मुळीच नाही !' अशा तऱ्हेने आपले दैव्य कोठल्याही उच्चतर हेतूंनी न वागता मानवाने जे योजले असेल त्याची कुचेष्टा करून त्याचा मानभंग होईल अशा तऱ्हेने वागत असते !

''अय्यर यांच्या राजकाराणाबाबत आम्हाला येथे बोलता येणार नाही. एक व्यासंगी अभ्यासूमित्र, हिंदू सद्‌गृहस्थाचा उत्तम आदर्श, कुरळचा भाषांतरकार, ज्याचे जीवन सतत त्याग आणि उपासनेत गेले असा साधुत्ववृत्तीचा आत्मा, त्याच्याबद्दल आम्ही आज प्रमुक्त कंठाने विलाप करीत आहो आणि या दिवंगत उदारधीबद्दल आम्हाला जाहीरपणे गौरव व्यक्त करता येत नाही ह्याबद्दल आमची चडफड व्यक्त करीत आहो. अरेरे ! कोण ही आमच्या पिढीची दुर्दशा ! आपल्यातील सर्वोत्तम असे बुडतात आणि वाहत जाऊन मृत्यूच्या किनाऱ्याला लागतात तर अपात्र सुखेनैव जीवन प्रवाहात पोहत राहतात.

परंतु मित्रा तू तुझे कर्तव्य पार पाडले आहेस. तू मानवी प्रेमासाठी जगलास आणि हुतात्मा म्हणून प्राण अर्पण केलेस तेही मानवी प्रीतीसाठी.

हे देवाच्या सैनिका, तुला जीवनात शांती माहीत नव्हतीच परंतु मृत्युनंतर तुला शांती लाभो. हे मित्रा, तुझ्या बरोबर शांती असो आणि तुला दिव्य विश्रांती मिळो !

काव्यकान्त गणपतीशास्त्री यांच्या अविश्रांत प्रयत्नांनी गुरुकुलम् वादात अंतिम समझोता झाला. परंतु तो प्रत्यक्षात येण्यापूर्वीच मृत्यूने अय्यर हिरावून नेले. ते अय्यर यांच्या निधनाबद्दल लिहितांना एक जुना संस्कृत श्लोक उधृत करतात :

**रात्रिर्गमिष्यति भविष्यति सुप्रभातम्**
**भास्वान उदेष्यति हसिष्याति पंकजातम् ।**
**इत्थम् विचितयति कोशगते द्विरेफे**
**हा हन्त हन्त नलिनीम् गज उज्जहार ॥**

(रात्र संपेल आणि सुप्रभात होईल, सूर्य उगवेल आणि कमळ फुलेल. अशा प्रकारे फुलाच्या कोशात अडकलेला भ्रमर विचार करीत असता अरेरे ! हत्तीने कमळ तोडून टाकले.)

---

# उपसंहार

अय्यर यांना गेल्याला आता ५५ वर्षे होऊन गेली. अय्यर यांची अभ्यासक म्हणून कीर्ती ह्या पन्नासपंचावन्न वर्षांत चांगली प्रस्थापित झाली आहे. तमिळनाडूच्या सार्वजनिक जीवनाला त्यांनी जी देणगी दिली, तिलाही सार्वजनिक मान्यता मिळाली आहे.

अय्यर यांच्या निधनानंतर श्रमदेवी (आता हे नाव चेरन महादेवी असे लिहिले जाते) गुरुकुलम्‌ला विविध अवस्यातून जावे लागले. दुसऱ्याच्या हाती गेल्यावर संस्थेची उपयुक्तता संपुष्टात आली. तिचे आश्रयदाते कमी झाले आणि ती बंद करावी लागली. परंतु तिच्या मालकीची ३१.५ एकरांची जमीन बरेच वर्षांपर्यंत संघर्ष विषय बनली. १९३० च्या सुमारास ही मालमत्ता गांधीजींच्या मध्यस्थीने हरिजन सेवक संघाच्या तमिळनाडू शाखेला हस्तांतरित करण्यात आली. संघाने गुरुकुलम्‌च्या वास्तूत हरिजनांसाठी एक शाळा चालवली.

१९५० च्या सुमारास हरिजन शाळा बंद करण्यात आली किंवा दुसरीकडे कुठेतरी नेण्यात आली. गुरुकुलाची विस्तीर्ण जमीन आणि जुन्या इमारती कोणा दुसऱ्याच्या ताब्यात देखभाल करण्यासाठी माफक भाड्याने देण्यात आल्या. ह्या लोकांनी जमिनीची नीटशी निगा राखली नाही आणि अय्यर यांचे नावचिरस्थायी करण्यासाठी काही केले नाही. उलट अशाही एका मागणीचा विचार केला गेला की ही मालमत्ता अक्षरशः तिची जबाबदारी टाळण्यासाठी विकून टाकावी. अय्यर यांच्या चहात्यांना ह्याचा धक्का बसला आणि ते पुन्हा कामाला लागले. एक नवे विश्वस्त मंडळ नेमण्यात आले. स्वामी चिद्‌भवानंद यांना अध्यक्ष नेमण्यात आले आणि अय्यर यांचे चिरंजीव डॉ. कृष्णमूर्ती आणि इतर चौघे सभासद झाले. ह्या प्रस्थानाची जानेवारी १९७२ ला नोंदणी करण्यात आली. नव्या विश्वस्तांनी मालमत्तेचा ताबा १९७३ पासून घेतला तेथे भारद्वाज आश्रम चालवला जातो. एक निवासी संन्यासी तेथे प्रभारी म्हणून काम करतात. जिल्ह्यात ४/५ केंद्रांवर मासिक गीता व्याख्याने केली जातात. २ एप्रिलला संस्थापक दिन साजरा करण्यात येतो. सांस्कृतिक विषयांवर प्रसंगोपात एखादे व्याख्यान कधी कधी नेले जाते.

१९२४ च्या गुरुकुलम् वादात अय्यर यांची कीर्ती मेघाच्छादित झाली होती ती त्यांच्या निधनोत्तर पूर्णपणे प्रस्थापित झाली. त्यांचे सर्वात कठोर टीकाकार डॉ. नायडू आणि

रामस्वामी नायकर यांनी गौप्यस्फोट केला की अय्यर यांच्या आकस्मिक निधनाच्या आधी एक मित्रभावाचा निर्णय घेण्यात आला होता. त्यांनी अय्यर यांचा न्यायीपणा, हातचे काही राखून न ठेवता मान्य केला. ह्या सगळ्याची नोंद आहे. अय्यर यांच्यावर जातीय सहानुभूती शून्यतेचा आरोप करून त्यांचे नाव बद्दू करण्याचे पुढे जे प्रयत्न केले गेले ते ह्या पार्श्वभूमीवर पाहावे लागतील.

अय्यर यांनी साहित्यसम्राट कम्बन् आणि त्यांचे रामायण ह्याच्या योग्य रसग्रहणाची जी देणगी दिली ती आता मद्रास आणि मदुराई विद्यापिठाच्या पदव्यूत्तर वर्गात मौल्यवान साधन म्हणून वापरली जाते. अय्यर यांच्या "कुरळ अथवा तिरुवल्लुवर यांची वचने" आणि "कम्बरामायण एक अभ्यास" यांची गुणवत्ता मान्य झाली असून आंतरराष्ट्रीय क्षेत्रात हे ग्रंथ उधृत केले जातात.

अय्यर यांची जन्मशताब्दी १९८१ मध्ये साजरी केली गेली.

त्यांचे जीवन म्हणजे देशाची राजकीय, सांस्कृतिक आणि औद्योगिक सुधारणा व्हावी ह्यासाठी केलेले अविरत प्रयत्न. गांधीजींनी त्यांचे "देशाचा दीर्घोद्योगी सेवक" हे केलेले वर्णन यथार्थ आहे. आज निःस्वार्थी सेवेचे तत्त्व पुनरुज्जीवित होत असता अय्यर यांच्या उदात्त जीवनाने आपल्याला नक्की लाभ होऊ शकेल.

---

